# डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या

[ एक टीकात्मक अभ्यास ]



लेखक
डॉ. द. न. गोखले,
बी. ए. (ऑ.), बी. टी., पीएच. डी.

जोशी ब्रदर्स
प्रकाशक व पुस्तक विक्रेते
गौळीगुडा, हैद्राबाद.

मूल्य रु. २-१५-०

व्हीनस प्रकाशन : पुणें



श्रीमती शीलवतीबाई केतकर

यांना

सादर समर्पण



# लेखकाचें निवेदन

डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांवर आतापर्यंत अनेक स्फुट लेख प्रसिद्ध झाले आहेत. मराठी कादंबरीवाङ्मयाचें समीक्षण करीत असतांनाहि केतकरांच्या कादंबऱ्यांवर लिहिलें गेलें आहे. या लिखाणानें केतकरांच्या कादंबऱ्यांचीं बरींच अंगोपांगें स्पष्ट झालीं; पण या लिखाणाचें स्वरूपच असें होतें कीं, त्याला कांहीं स्वाभाविक मर्यादा पडल्या. तें पुरेसें समावेशक, सुश्लिष्ट नि साधार होऊं शकलें नाहीं. प्रस्तुत निबंधांत केवळ केतकरांच्याच कादंबऱ्यांचा विस्तारशः विचार केला आहे. तेव्हा तो अधिक समावेशक, सुश्लिष्ट नि साधार व्हावा, अशी माझी अपेक्षा आहे.

येथे, केतकरांच्या सर्व कादंबऱ्या व त्या कादंबऱ्यांचीं सर्व ठळक अंगें एकत्र व परस्परसापेक्ष विचारांत घेण्याचा प्रयत्न केला आहे. एक कादंबरी घ्यावी, तिची विविध दृष्टींनी पाहाणी करावी, मग दुसरी कादंबरी घ्यावी, असें न करतां, एका दृष्टीनें सर्व कादंबऱ्यांची पाहाणी करावी, मग दुसऱ्या दृष्टीनें पुन्हा सर्व कादंबऱ्यांची पाहाणी करावी, असा क्रम स्वीकारला आहे. यामुळे ' केतकरी कादंबरीचें ' संकलित दर्शन घडून तिचें विशिष्ट स्वरूप स्पष्ट होऊं शकेल, असें वाटतें.

गेलीं अनेक वर्षें डॉ. केतकरांचें साहित्य पुणें, मुंबई व नागपूर येथील विद्यापीठांत एम.ए.च्या परीक्षेसाठी नियुक्त केलें जात आहे. परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांना तें थोड्याफार प्रमाणांत भांबावून सोडतें, असा अनुभव येतो. केतकरांच्या कादंबऱ्यांच्या परीक्षणाच्या वेळीं कोणते निकष वापरावे, कोणती भूमिका पतकरावी, याचाच बहुतेकांना संदेह पडतो. या निबंधांत एक ठाम भूमिका घेतली असून त्या भूमिकेवरून सर्व कादंबऱ्यांचा विचार केला आहे. तेव्हा, भांबावणारे परीक्षार्थी विद्यार्थी आणि त्यांच्यासारखे इतर जिज्ञासु वाचक यांना साह्य मिळेल व ते समाधानाचा निःश्वास सोडतील असें वाटतें. मीं घेतलेली भूमिका कितपत योग्य आहे, हें तज्ज्ञांनी ठरवावें, अशी त्यांना नम्र विनंती आहे.

डॉ. केतकर केवळ कादंबरीकार नव्हते. ते ज्ञानकोशकार, समाजशास्त्रज्ञ,

इतिहाससंशोधक, अर्थशास्त्रादि नाना शास्त्रांचे पंडित, समाजसुधारक, राजकारणी आणि एक विशाल व जटिल व्यक्तिमत्वाचे गृहस्थ होते. तेव्हा, त्यांच्या इतर लेखनाकडे व जीवनाकडे न पाहातां त्यांच्या कादंबऱ्यांचा सुटा अभ्यास केला तर त्यांत अपूर्णता व सदोषता राहाणार, हें नक्की. त्यांच्या कादंबऱ्यांची पार्श्वभूमि नीट कळण्यासाठी त्यांचें सर्व लेखन व जीवन अभ्यासलें पाहिजे. प्रस्तुत निबंध लिहिण्यापूर्वी मी तशा अभ्यासाचा प्रामाणिक प्रयत्न केला आहे. अर्थात् कादंबऱ्यांच्या सुट्या अभ्यासानें उत्पन्न होणारी सदोषता व अपूर्णता या निबंधांत टळली असावी, असें मानण्यास प्रत्यवाय नाही.

निबंधलेखन पर्यंकवाचक दृष्टीसमोर ठेवून केलेलें नाही. निदान जे पदवीधर विद्यार्थी आहेत किंवा जे प्रौढ, सुज्ञ व बुद्धिशील वाचक आहेत ते लेखनाच्या वेळीं माझ्या दृष्टीसमोर होते. साहजिकच निबंधाचें स्वरूप कांहीसें जड किंवा भारदस्त व अर्थघन होणें अपरिहार्य होऊन बसलें.

माझ्या पी.एच.डी.च्या डॉ. केतकरांवरील प्रबंधामध्ये त्यांच्या कादंबऱ्यांचा विचार झाला आहे. तो प्रबंध आर्थिक अडचणीमुळे अद्यापि प्रकाशित होऊं शकलेला नाही. त्यांत कादंबऱ्यांसंबंधी जें एक प्रकरण आहे त्यावरच हा निबंध आधारून तयार केला आहे. अर्थात् हा निबंध प्रकाशित झाल्यानें मूळ प्रबंध अंशतः प्रकाशांत आल्यासारखें होईल. मूळ प्रबंध पूर्णपणें केव्हा प्रकाशित होईल तेव्हा होवो. त्या प्रबंधाच्या रचनेच्या वेळीं ज्यांनी ज्यांनी मला साह्य केलें त्या सर्वांचे आभार मी या ठिकाणीं मनःपूर्वक मानीत आहें.

या निबंधाला शेवटीं एक परिशिष्ट जोडलें असून त्यांत सर्व कादंबऱ्यांचीं कथानकें साररूपानें दिलीं आहेत. हेतु हा, की मूळ कादंबरी उपलब्ध नसेल तर हा निबंध वाचणारांची गैरसोय होऊं नये. साररूपांतल्या कथानकांमुळें कादंबरी चटकन दृष्टीसमोर उभी करण्यासहि साह्य होईल.

निबंधाचें लेखन म. सा. परिषदेच्या लेखननियमांस अनुसरून केलें आहे.

२५३।७ लिमये वाडी,
जोगळेकर बंगला,
पुणें २.

—द. न. गोखले
दि. १–१–१९५५

# अनुक्रमणिका

परिशिष्ट :



---

## संक्षेपांचा खुलासा

आशा = आशावादी
आठवणी = प्रस्तुत लेखकाने गोळा केलेल्या आठवणी
गा. सा = गावसासू
गों. प्रि = गोंडवनांतील प्रियंवदा
परा. = परागंदा
ब्रा. क. = ब्राह्मणकन्या
लो. शि. = लोकशिक्षण
विच. = विचक्षणा
वि. से. = विद्यासेवक
सान्निध्य = डॉ. केतकरांचें सान्निध्य

—एकेरी अवतरणचिह्नांमधील उतारे शब्दशः घेतलेले नसून साररूपाने घेतलेले आहेत.

—उद्धृत उताऱ्यांत चौकोनी कंसांतील मजकूर प्रस्तुत लेखकाचा आहे.

# डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या

## १. प्रास्ताविक:—

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे कर्ते डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे एक सव्यसाची लेखक होते. त्यांनी गंभीर व ललित अशा दोनहि प्रकारच्या वाङ्मयाची निष्पत्ति केली असून त्या प्रकारांत पुन्हा बरीच विविधता साधली आहे. त्यांनी गंभीर स्वरूपाचे अकरा प्रबंध लिहिले. पैकी चार समाजशास्त्रावर, एक अर्थशास्त्रावर, दोन राजकारणावर, एक वाङ्मयाभिरुचीच्या इतिहासावर, दोन महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर आणि एक आत्मचरित्रपर आहे. त्यांचे जे सुमारें दोन अडीच शे स्फुट लेख प्रसिद्ध झाले त्यांचा अंतर्भाव गंभीर वाङ्मयामध्येच होतो. त्यांच्यामध्येहि विषयाची विविधता खूप आहे. महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या २ ऱ्या व ३ ऱ्या विभागांत त्यांनी आपलें वैदिक संशोधन प्रसिद्ध केलें. त्यांच्या गंभीर वाङ्मयांतील विविधता नीट लक्षांत भरण्यासाठी त्या वैदिक संशोधनाचें स्मरण करणें अवश्य आहे. आपल्या ललित लेखनांत त्यांनी कादंबरी, नाटक, कथा व काव्य हे चार वाङ्मयप्रकार हाताळले. त्यांमध्ये त्यांनी कादंबऱ्या सात लिहिल्या, नाटक एक पण थोडें अपूर्ण लिहिलें, कथा चार लिहिल्या आणि काव्य स्फुट व दीर्घ मिळून दीड दोन सहस्र चरणसंख्या होईल एवढें लिहिलें. अर्थात् कादंबरी हें कांही त्यांच्या लेखनाचें एकमेव क्षेत्र नव्हे; त्यांच्या लेखनाच्या अनेक क्षेत्रांपैकी कादंबरी हें एक क्षेत्र होय.

आकारमानाच्या दृष्टीने पाहातां, समाजशास्त्र, कादंबरी, इतिहास व वैदिक संशोधन या क्षेत्रांत त्यांनी सर्वांत जास्त लेखन केलें; भाषा–वाङ्मय–साहित्य यांची चर्चा नि राजकारण या क्षेत्रांत त्याहून कमी लेखन केलें आणि अर्थशास्त्र,

कथा व काव्य या क्षेत्रांत सर्वांत कमी लेखन केलें. पैकी १ ल्या गटांतील प्रत्येक क्षेत्रामधील त्यांची निष्पत्ति ' क्राउन ' आकारांत १ हजार पृष्ठांहून अधिक आहे; २ ऱ्या गटांतील प्रत्येक क्षेत्रामधील निष्पत्ति ५ शे पृष्ठांहून अधिक आहे; आणि ३ ऱ्यांतील ५ शे पृष्ठांहून कमी आहे.—म्हणजे कादंबरी हें जरी त्यांच्या अनेक लेखनक्षेत्रांपैकी एक क्षेत्र असलें तरी तें आकारमानाच्या दृष्टीने महत्त्वाचें क्षेत्र आहे, हें स्पष्ट आहे. त्यांच्या सातहि कादंबऱ्यांची पृष्ठ-संख्या ' क्राउन ' आकारांत मोजली तर ती दोन हजारांच्या आसपास भरते.

' गोंडवनांतील प्रियंवदा व घरकुट्टे घराण्याचा इतिहास ' ही पहिली कादंबरी लिहिण्यास त्यांनी जून १९१६ मध्ये प्रारंभ केला. त्या वेळीं त्यांनी २०–२१ प्रकरणें लिहिलीं; पण पुढे ज्ञानकोशाच्या कार्यामुळे त्यांच्या लेखनांत ९–१० वर्षें खंड पडला. १९२५–२६ मध्ये मुळांतील ४ प्रकरणें त्यांनी फाडलीं, बाकीचीं नवीं लिहिलीं[1] आणि आपल्या ' विद्यासेवक ' मासिकांतून कादंबरी क्रमशः प्रसिद्ध केली. सप्टेंबर १९२५ ते फेब्रुवारी १९२६ या काळांत कादंबरी निनांवी प्रसिद्ध होत होती आणि पुढे ती पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली. —' परागंदा आणि भारतीय समाजाची सरहद्द ' ही त्यांची दुसरी कादंबरी ' विद्यासेवकां 'तूनच प्रसिद्ध झाली; पण ती क्रमशः प्रसिद्ध न होतां ऑगस्ट–सप्टेंबर १९२६ च्या जोड–अंकांत एकदम प्रसिद्ध झाली. त्या जोड–अंकांत या कादंबरीशिवाय इतर लिखाण दिलेलें नव्हतें.—' आशावादी अथवा एका प्रवाह-पतिताचें चरित्र ' या तिसऱ्या कादंबरीचा प्रकार तसाच झाला. मार्च, एप्रिल, मे १९२७ च्या ' विद्यासेवका 'च्या तीन अंकांबद्दल ती कादंबरी वर्गणीदारांकडे रवाना झाली.—' ब्राह्मणकन्या ' ही चौथी कादंबरी मे १९२८ पासून 'विद्यासेवकां' त डोकावूं लागली; पण पुढे 'विद्यासेवक' खंडित झाल्याने ती पुस्त-काच्या स्वरूपांत १९३०सालीं प्रकाशित झाली. —१९३० सालींच 'गावसासू' या पांचव्या कादंबरीचेंहि प्रकाशन झालें.—म्हणजे १९२६ ते ३० या कालखंडांत, सतत कादंबरीलेखन करून त्यांनी पांच कादंबऱ्यांना जन्म दिला. १९३० नंतर त्यांनी कादंबरीलेखनाला थोडी विश्रांति दिली व विश्रांति संपल्यावर १९३६–३७ मध्ये ' स्त्री ' मासिकांतून ' विचक्षणा ' ही सहावी कादंबरी प्रकरणशः

१. गों. प्रि., प्रस्तावना.

प्रसिद्ध केली. मे १९३६ पासून एप्रिल १९३७ अखेर 'विचक्षणा' 'स्त्री' मासिकांतून येत होती.—'भटक्या' या सातव्या कादंबरींत आलेला कांहीं भाग त्यांनी आधी प्रसिद्ध केला होता. हा भाग म्हणजे 'एका इलेक्शन एजंटचा अनुभव' (विद्यासेवक, ऑगस्ट १९२५), 'डॉ. घैसास यांची विचारक्रांति' (विद्यासेवक, सप्टेंबर १९२५) व 'फरासखान्यांतील गोष्ट' (यशवंत, फेब्रु. १९३०) हे तीन स्वतंत्र ललित लेख होत. या लेखांचा उपयोग करून 'भटक्या' चें लेखन त्यांनी मृत्यूपूर्वी बरेंचसें संपविलें; पण १० एप्रिल १९३७ या दिवशीं मृत्यूने घाला घातल्यामुळे 'भटक्या' अपूर्ण राहिला. तशा स्थितींतच १९३८ मध्ये तो वाचकांसमोर अवतीर्ण झाला.—कादंबऱ्यांचें हे लेखनकाल किंवा प्रकाशनकाल लक्षांत घेऊन साकल्याने असें म्हणतां येईल, की १९२५ ते ३७ हीं बारा तेरा वर्षे म्हणजे केतकरांच्या कादंबऱ्यांचा कालखंड होय. हा कालखंड काव्य, समाजशास्त्र, अर्थशास्त्र व वैदिक संशोधन या क्षेत्रांतील लेखनाच्या काळानंतर साधारणतः येतो आणि त्याच्या पोटांत नाटक, कथा, भाषा–वाङ्मय–साहित्य यांची चर्चा, राजकारण व इतिहास या क्षेत्रांतील लेखनाचे कालखंड साधारणतः समाविष्ट होतात.

समग्र मराठी कादंबरीवाङ्मयाच्या दृष्टीने पाहातां केतकरांच्या कादंबऱ्यांचा काल हरिभाऊ आपटे यांच्यानंतर येतो. वामनराव जोशांच्या 'रागिणी' 'आश्रमहरिणी' व 'नलिनी' या कादंबऱ्या केतकरांच्या कादंबऱ्यांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या होत्या; पण वामनरावांचें उरलेलें कादंबरीलेखन केतकरांच्या कादंबरीलेखनाच्या कालखंडांतच झालें. फडके, खांडेकर व माडखोलकर हे तीन खंदे कादंबरीकार केतकरांना समकालीन होत. मात्र केतकरांच्या नंतरहि या तिघांचें कादंबरीलेखन चालू आहे, हें ध्यानांत घेतलें पाहिजे. कालदृष्ट्या मराठी कादंबरीच्या इतिहासांत केतकरांचें स्थान असें निश्चित केल्याने त्यांच्या कादंबऱ्यांच्या चिकित्सेला मोठें साह्य होतें, असें मात्र नाही. केतकरांचें लेखन एका अर्थाने स्वयंभू व स्वतंत्र आहे. त्यांच्यावर पूर्वलेखकांचा कोणताच ठळक परिणाम झालेला नाही. समकालीनांच्या समूहांतहि ते साम्यापेक्षा भेदानेच उठून दिसतात. "वामन मल्हारांची तत्त्वप्रधानता व त्यांचें कलाविषयक दुर्लक्ष दोन्हीहि केतकरांच्या वाट्याला आलीं" असें प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी म्हटलें आहे आणि त्यांनी केतकरांना 'वामन मल्हारांच्या युगा'त समाविष्ट

केलें आहे.[१] दोघांमधील तत्त्वशोधन व कलाविषयक दुर्लक्ष या दोन साधारण गुणविशेषांमुळे असें करणें योग्यच आहे. विशेषतः समग्र कादंबरीवाङ्मयाच्या समालोचनांत साम्य व कालसान्निध्य या तत्त्वांना धरून वर्गीकरण करावें लागत असल्याने प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी वामन मल्हारांशीं केतकरांची गाठ बांधावी, हें साहजिक आहे. पण केतकरांवर वामन मल्हारांचा प्रत्यक्ष परिणाम घडला व त्यांतून त्यांच्या कादंबरीने घाट घेतला, असा याचा अर्थ नव्हे. केतकरांचे जे विविध व्यासंग, जें विविध निरीक्षण, जी जीवनाकडे पाहाण्याची विशिष्ट दृष्टि व जें पृथगात्म चरित्र व व्यक्तित्व त्यांतून त्यांची कादंबरी अंकुरली आणि पोसली. त्यांची कादंबरी म्हणजे मराठी कादंबरींतील एक अपूर्व नि अजब चीज आहे. ती जशी भूतकालीन कादंबऱ्यांच्या भूमींत रुजली नाही, समकालीन कादंबऱ्यांच्या समूहांत मिसळली नाही, तशीच भविष्यकालीन कादंबऱ्यांवर परिणामकारकहि झाली नाही. ती धूमकेतूसारखी आली आणि गेली ! तेव्हा तिचा अभ्यास रूढ पद्धति बाजूस टाकून कांहीसा स्वतंत्रपणें करणें भाग आहे.

## २. लेखनामागील बोधहेतुः—

सर्व ललित वाङ्मयाचा हेतु सौंदर्यदर्शन हा असतो आणि कादंबरी म्हणजे ललित वाङ्मयाचा एक प्रकार असल्यामुळे कादंबरीचा हेतुहि सामान्यतः तोच असतो. पण केतकरांच्या कादंबऱ्यांची चर्चा करतांना, प्रारंभीं ही गोष्ट ध्यानीं घ्यावी लागते, की सौंदर्यदर्शनाच्या प्रमुख हेतूने केतकरांनी आपल्या कादंबऱ्या लिहिलेल्या नाहीत. ज्ञान, विवरण, विवेचन, विचार वगैरे बुद्धीला उद्देशून लिहिलेल्या गोष्टींना जर ‘ बोध ’ म्हटलें तर कांही ‘ बोध ’ करण्याच्या प्रमुख हेतूने त्यांनी आपल्या कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत, असें म्हणतां येईल. त्यांनी आपल्या कादंबऱ्यांबद्दल ठिकठिकाणीं जे उद्‌गार काढले आहेत त्यांवरून त्यांचा बोध करण्याचा हेतु चांगला स्पष्ट होतो.

‘ परागंदे ’ च्या प्रस्तावनेंत ते म्हणतात, की “ भारतीयांच्या अमेरिकेंतील अनुभवाचें हें पूर्ण चित्र नाही. तथापि अमेरिकेंत गेलेला व तेथे कायम झालेला

१. मराठी कादंबरी, पृ. १६५.

किंवा कायम होऊं पाहाणारा जो सुशिक्षित भारतीयांचा वर्ग आहे त्याच्या विचारौघाची निदर्शक ही कादंबरी आहे, असें म्हणण्यास हरकत नाही." 'परागंदे' बद्दल ते दुसरीकडे[1] असा उल्लेख करतात, की "परागंदा या कादंबरीमध्ये ज्या राजकीय गोष्टींचा उल्लेख आहे त्यांची कल्पना व त्या वेळेस अमेरिकेंत असलेल्या भारतीयांच्या मनांतील भावना यांची आठवण जर पुढच्या पिढीला माझ्या कादंबरीमुळे राहिली तर माझें लेखन सार्थ झालें असें मी समजेन." म्हणजे 'परागंदे' च्या लेखनामागे सौंदर्यदर्शनाचा हेतु होता, असें ते म्हणत नाहीत. कांही समाजचित्रण करण्यासाठी, म्हणजेच ज्ञान देण्यासाठी किंवा बोध करण्यासाठी आपण कादंबरी लिहिली असा त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. 'आशावादी' च्या प्रस्तावनेमध्ये त्यांनी अशीं वाक्यें लिहिलीं आहेत, की "या [ प्रवाहपतिताच्या ] चरित्रांत विदेशीं अनेक वर्षे राहिलेल्या पण निश्चित उद्योग नसलेल्या व्यक्तीचें जीवनचरित्र [ विचारबाहुल्यामुळे ] कसें होतें, हें दाखविलें आहे." "विवेचनासाठी ज्या अवस्था घेतल्या आहेत त्या म्हटल्या म्हणजे संसार आणि गृहस्थाश्रम या होत." "संन्यासवृत्तीस आणि वैराग्यावस्थेस किती कर्तव्यक्षेत्र शक्य किंवा योग्य आहे, यासंबंधाच्या अनेक बाजू या कथानकांत मांडलेल्या दिसतील." "त्याचप्रमाणे आयुष्याचें नियमन करावयाचें तें पूर्वी एखादा कार्यक्रम आखून ठेवून त्याप्रमाणे करावें, कीं आयुष्यास भवितव्य जशी गति देईल तशी देऊं द्यावी, हा प्रश्नहि विचारास घेतला आहे." या वाक्यांवरून ज्ञान, विवेचन, विचार वगैरे सांगण्याचा किंवा बोधाचा हेतुच प्रतीत होतो. 'गावसासू' च्या 'कथापरिचयां'त ते लिहितात, की "गावसासू या कथेंत इंग्लंडमधील हिंदी मंडळींतील युद्धपूर्व परिस्थिति अंशरूपाने चित्रिली आहे." म्हणजे त्या कादंबरीचें लेखन समाजचित्रणाच्या बोधात्मक हेतूने त्यांनी केलें, असें म्हणण्यास हरकत नाही. 'भटक्या' कादंबरीचा नायक आपला जीवनवृत्तांत सांगण्यापूर्वी पुढील प्रस्तावना करतो : "आयुष्यक्रमाची विविधता लक्षांत यावी, आमच्या समकालीनांच्या सामाजिक स्थितीची चित्रणा पुरी व्हावी, एवढीच मनीषा आहे....आमचें चरित्र आणि आमचें अवलोकन हें प्रचलित समाजाच्या इतिहासाचें एक महत्त्वाचें प्रकरण आहे....

---

१. 'मी व माझे टीकाकार', ज्योत्स्ना, ऑगस्ट १९३६.

वाचकहो, आमच्यासारख्यांचें चरित्र निरीक्षा म्हणजे तुम्ही खात्रीने कांही शिकाल; एवढेंच नव्हे तर आपल्या तरुण मंडळींच्या भवितव्याविषयी अधिक आशामय वृत्ति बाळगाल, यांत शंका नाही." 'भटक्या' ची ही प्रस्तावना इतकी स्पष्ट आहे, की तीमधील बोधाचा हेतु सहज लक्षांत भरूं शकेल.

कादंबऱ्यांचा एकैकशः विचार न करतां सामूहिक विचार केला तरी केतकरांचा हेतु बोधाचा होता, या म्हणण्याला बाध येत नाही. केतकरांनीच आपल्या सर्व कादंबऱ्यांबद्दल असें विधान केलें आहे, की "आपण [ समाजाचें ] जितकें व्यापक स्वरूप दाखवितां येईल तितकें दाखवावें, जितक्या विविध प्रकृति लोकांपुढे आणतां येतील तितक्या आणाव्यात, ही मनीषा चित्तांत वागत असल्यामुळे कादंबरींतील विविध प्रकार वर्णिले गेले."[1] हें विधान लक्षांत घेतलें म्हणजे सर्व कादंबऱ्या सौंदर्यदर्शनाच्या उद्देशाने न लिहितां समाज व व्यक्ति यांच्या विविध चित्रणासाठी किंवा बोधासाठी त्यांनी लिहिल्या याबद्दल शंका राहात नाही.

मात्र सौंदर्यदर्शनाचा हेतु त्यांच्या मनांत मुळीच नव्हता, असा याचा अर्थ नव्हे. सौंदर्यदर्शनाचा हेतुहि त्यांच्या मनांत थोडाफार असे, हें 'परागंदे' च्या उपसंहारामधील उद्‌गारांवरून कळून येतें.[2] तेथे ते म्हणतात, की "जेव्हा चालू असलेला आयुष्यक्रम मनोरंजक करण्याचें कौशल्य कथालेखकास नसतें, तेव्हा तो कृत्रिम संविधानक तयार करून कथा मनोरंजक करूं पाहातो." "वाचकवर्ग किंवा टीकाकारवर्गदेखील या प्रकारच्या खोट्या समाजचित्रांस इतका सोकावलेला असतो, की 'कारस्थान' किंवा अद्‌भुत गुणांनी भरलेले नायक व तसल्याच नायिका ज्यांत नसतील ती कादंबरी अपूर्ण वाटूं लागते." "जगांतील साध्या आयुष्यक्रमाची मनोरंजकता ज्या कथालेखकास शोधून काढतां येत नाही अशा लेखकाची कादंबरीच ध्येयरूप धरून इतर कादंबऱ्या त्या दृष्टीने तो तपासूं लागतो." "कथेचा कथापणा कारस्थानामुळे उत्पन्न होत नसून अनेक माणसें एकत्र मिळून जो व्यवहार होतो त्यामुळे उत्पन्न होतो." या उद्‌गारांत त्यांचा भावार्थ असा दिसतो की वास्तव समाजचित्रण व व्यक्तिवर्णन निवडानिवड,

---

१. 'मी व माझे टीकाकार', ज्योत्स्ना, ऑगस्ट १९३६. २. पृ. १६६.

जुळणी वगैरे न करतां सरळ केलें तरी तें " मनोरंजक " किंवा सौंदर्यपूर्ण होतें; तेव्हा वास्तव समाजचित्रणाच्या व व्यक्तिचित्रणाच्या बोधात्मक हेतूने लिहिलेली कादंबरी आपोआपच सुंदर होते. म्हणजे आपल्या बोधाच्या हेतूंतच सौंदर्याचा हेतु समाविष्ट आहे, असें ते मानीत होते. त्यांच्या कादंबऱ्यांच्या अंतरंगावरूनहि सौंदर्यदर्शनाकडे त्यांचें कांहीं लक्ष होतें, हें निःसंशय दिसतें. मात्र बोधाचा हेतु ते प्रधान समजत व सौंदर्यदर्शनाचा हेतु गौण समजत, हें आतापर्यंतच्या त्यांच्या उद्धृत वाक्यांवरून निश्चितपणें समजण्यास हरकत नाही.

## ३. बोधाचें षड्विध स्वरूपः—

वर त्यांचीं जीं वाक्यें उद्धृत केलीं आहेत, तीं त्यांचा बोधहेतु सिद्ध व्हावा म्हणून केलीं आहेत; पण त्या वाक्यांवरून त्यांच्या बोधाचें स्वरूपहि थोडेसें स्पष्ट होतें. त्यांच्या कादंबऱ्यांच्या अंतरंगावरून तें स्वरूप पूर्णच स्पष्ट होतें आणि त्याचा तपशीलहि समजतो. त्यांना अभिप्रेत असणारा बोध सर्वसाधारणपणें षड्विध आहे, असें म्हणतां येईल. समाजवर्णन, समाज-मीमांसा, विचारकथन, ज्ञानदान, व्यक्तिवर्णन व मनोविश्लेषण हीं त्याचीं सहा अंगें स्थूलपणें दिसतात. हीं अंगें एकमेकांपासून अगदी अलग काढतां येणार नाहीत; तीं परस्परांत गुंतलेलीं व मिसळलेलीं आहेत; पण त्यांच्या बोधाचें स्वरूप पूर्णपणें कळण्याच्या दृष्टीने तीं मानणें सोयिस्कर आहे. या अंगांपैकी समाजवर्णन व व्यक्तिवर्णन हीं अंगें त्यांनी स्वतःच आपला बोध-हेतु सांगतांना निर्देशिलीं आहेत. तेव्हा तीं अंगें सांगण्यासाठी त्यांनी कादं-बऱ्या लिहिल्या; कादंबरीसाठी, सौंदर्यासाठी तीं अंगें आणिलीं नाहीत, याबद्दल वाद नाही. पण बाकीचीं चार अंगें त्यांनी सौंदर्यासाठी योजिलीं नाहीत, हें कशावरून; तीं अंगें त्यांच्या बोधहेतूपैकीच होत, हें कशावरून; अशी शंका येणें शक्य आहे. त्या अंगांचें स्वरूप व त्यांचा कादंबरींत केलेला प्रत्यक्ष उपयोग पाहिला म्हणजे ती शंका नष्ट होते. तीं अंगें म्हणजे समाजविश्लेषण, मनोविश्लेषण, विचारकथन व ज्ञानदान हीं होत. त्यांनी कांही सौंदर्य उत्पन्न होतें, हें खरें आहे; पण सौंदर्यासाठीच त्यांची योजना मुख्यत्वें करण्यास त्यांचें स्वरूप, मनोविश्लेषण थोडेसें वगळतां, प्रतिकूल आहे. केतकरांनीं कादंबऱ्यांमध्ये त्यांना खूपच जागा दिली आहे. तेव्हा सौंदर्यदर्शनासाठी तीं

अंगें आलेलीं आहेत, असें म्हणतां येत नाही. तीं अंगें दाखविणें हाच उद्देश असून त्यासाठी कादंबरीलेखन झालें, असें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें. त्या अंगांचा संबंध भावनेपेक्षा वाचकाच्या बुद्धीशीं जास्त आहे, हें स्पष्ट आहे. त्यामुळे बोध ही संज्ञा त्यांना चपखलपणें लावतां येते. सारांश, केतकरांचा बोधहेतु वर सांगितल्याप्रमाणे षड्विध होता, हें म्हणणें निरपवाद खरें धरण्यास हरकत नाही.

### ४. समाजवर्णनः—

त्यांच्या षड्विध हेतूंत समाजवर्णनाचा जो एक हेतु आहे त्याने त्यांच्या कादंबऱ्यांतील बराच मोठा भाग व्यापलेला दिसतो. 'परागंदा' व 'गांवसासू' या दोन कादंबऱ्या बव्हंशीं विशिष्ट प्रदेशांतील विशिष्ट समाजाच्या वर्णनासाठी खर्ची पडलेल्या आहेत. पैकी 'परागंदें'त अमेरिकेमध्ये स्थायिक होत असलेल्या १९२० च्या सुमाराच्या भारतीयांचें वर्णन आहे आणि 'गावसासूं'त पहिल्या महायुद्धापूर्वी इंग्लंडमध्ये असलेल्या भारतीयांचें वर्णन आहे. 'गोंडवनांतील प्रियंवदा' व 'आशावादी' या दुसऱ्या दोन कादंबऱ्यांतील बराच अंश नागपूरकडील समाजाचें चित्रण करणारा आहे. 'प्रियंवदे'मधील अनंतराव घरकुट्टे आपणांला नागपुरी ब्राह्मणांमधील स्पर्धा, तट वगैरे दाखवितात आणि बंडूनाना घरकुट्टे सिरोंचा तहशिलीची ओळख करून देऊन नागपूरांतील लाच-खाऊपणाचा परिचय करून देतात. 'आशावादी'मधील गेंगणे–अलंकार–भोंगळवार हें त्रिकूट नागपूरांतील राष्ट्रीय पक्षामधील दुय्यम लोकांचें निदर्शक आहे. शिवाय 'प्रियंवदें'तील व 'आशावादीं'तील अनेक पात्रें नागपूरकडील प्रसिद्ध व्यक्तींची नेमकी आठवण करून देणारीं आहेत. नागपूरकडील समाज सोडला तर पुणेरी समाज,[१] महाराष्ट्राचा विसाव्या शतकांतील पहिल्या वीस वर्षांचा सामाजिक इतिहास[२] आणि संस्थानी जीवन[३] यांचें वर्णन त्यांनी थोडें-फार केलें आहे आणि तें प्रादेशिक समाजांच्या चित्रणाबरोबर उल्लेखितां येण्या-जोगें आहे.

---

१. आशा., पृष्ठ ३१ ते ३४; भटक्या, पृ. १०, ३९ ते ४४. २. आशा., पृ. २७ ते ३६. ३. भटक्या, पृ. ५३ ते ५५, ७६ ते ८५.

त्यांनी समाजवर्णनांत जीं जातींचीं वर्णनें दिलीं आहेत त्यांत वणिक् जातींचें गृहवर्णन व लिंगनीतिवर्णन अनेकदा पुनरुक्त होतें. 'ब्राह्मण-कन्ये'त करुणसुंदरीच्या रूपाने तें येतें; 'शिवशरण'च्या साह्यानेहि येतें; 'विचक्षणे'त तें मोतिलाल-रामप्यारी यांच्या कथेमध्ये प्रकट होतें आणि 'भटक्या'मध्ये नेमिनाथ शेटजींच्या घरांत तें पाहावयास सापडतें. ख्रिश्चन समाजाची बरीच माहिती 'विचक्षणे'त रे. गणपतराव व कृपाबाई यांच्या कथेच्या आधाराने घातली आहे आणि ख्रिश्चन मिशनऱ्यांची अल्पशी माहिती 'परागंदे'त मिस स्त्रीटलंड नी 'आशावादी'त ऑडेलिन हंटर यांच्या आश्रयाने दिली आहे. 'ब्राह्मणकन्ये'त एसतेरच्या वशिल्याने बेने इस्रायलांची जवळ जवळ सर्वांगीण माहिती बरींच पानें अडवून बसते. त्या माहितीने बेने इस्रायलांमध्ये चांगली खळबळ उडाली होती, असे उल्लेख अनेकांनी केले आहेत.[१] पार्श्यांची माहिती केतकरांनी फारशी दिलेली नाही; पण जेवढी दिली आहे तींत मात्र पार्शी समाजाचें कांहीं वैशिष्ट्य त्यांनी मार्मिकपणें दाखविलें आहे. त्यांनी ज्या विशिष्ट वर्गांचें अल्पसें चित्रण केलें आहे त्या वर्गांत बरीच विविधता आहे. त्यांत गुन्हेगार व पोलिस आहेत; बुवा व संन्यासी आहेत; मजुरांचे पुढारी व मजूर आहेत; सुधारक व ब्राह्मो-प्रार्थनो आहेत आणि क्षेत्रोपाध्येहि आहेत.[३]

त्यांनी केलेलें वेगवेगळ्या प्रकारच्या कुटुंबांचें चित्रण खूपच विविध आणि परिपूर्ण आहे. त्याला त्यांच्या प्रादेशिक समाजांच्या वर्णनाइतकेंच महत्त्व देण्यास हरकत नाही. त्यांच्या कुटुंबचित्रणांत 'परागंदे'मधील कामत-कुटुंबा-सारखें अमेरिकानिवासी हिंदी कुटुंब आहे आणि आयरिश मुलीशीं लग्न करणाऱ्या एखाद्या शिवराजसिंगाचें मिश्र कुटुंबहि आहे. मिळवत्या स्त्रियांच्या संसाराचा एक प्रकार 'आशावादी'त डॉ. नंदिका-लालनाथ यांच्या कथेंत

---

१. पाहा : 'अर्वाचीन मराठी साहित्य' पृ. १०८. २. गों. प्रि., होरमसजी व पुतळी; ब्रा. क., पृ. १०१ ते १०४. ३. भटक्या,-विठू घोमण, इन्स्पेक्टर खच्चे, भूतानंद; आशा.-ब्रह्मगिरी; ब्रा. क.-रामराव; विच.-बाळोबा; हीं पात्रें पाहा. ब्राह्मोप्रार्थनोंचें वर्णन-गा. सा., मैत्र; व अनेक विकीर्ण ठिकाणीं. क्षेत्रोपाध्ये- 'भटक्या'मधील उपासनी पाहा.

त्यांनी दाखविला आहे; दुसरा 'विचक्षणें'त विचक्षणा–माधव यांच्या कथेंत चितारला आहे आणि तिसरा 'भटक्या'मध्ये नर्मदा सरवटे, मनोहरपंत व लक्ष्मीबाई अभ्यंकर या त्रिकुटाच्या द्वारें रंगविला आहे. रखेली ठेवणाऱ्या पुरुषांचीं कुटुंबें कशीं असतात तें 'ब्राह्मणकन्यें'तील डॉ. चिंतोपंत व 'विचक्षणें'-तील डॉ. तर्कटे आपणांस सांगतात. रखेलीची पत्नी कशी होते, तें 'विचक्षणे'-मधील घाटे पतिपत्नींच्या कथेवरून समजतें. रखेलीच्या मुलीशीं लग्न करणाऱ्या ध्येयवादी सुधारकाचा संसार कसा होतो, तें दर्शविण्यासाठी 'ब्राह्मणकन्यें'तील अप्पासाहेब डग्गयांच्या कुटुंबाचें वर्णन आलें आहे. 'गावसासू'मध्ये बॅरिस्टर दासांचें जें गृहचित्रण आहे तें इंग्रज बाईला हिंदूपासून झालेल्या मुलीशीं विधुर हिंदूने जर लग्न केलें तर काय होतें, त्याचें थोडेसें निदर्शन करणारें आहे. 'आशावादीं'तील अलकनंदेच्या पत्रांत पैशापाठीमागे लागलेल्या आय. सी. एस. कलेक्टरची गृहव्यवस्था आपणांला पाहावयास मिळते. गरीब, मध्यम-वर्गीय आणि जुन्या कल्पनांत गुरफटलेल्या ब्राह्मण कुटुंबांचीं कांही नमुनेदार चित्रें 'परागंदें'तील रुक्मिणीच्या द्वारां, 'आशावादीं'तील गोदावरीच्या द्वारां आणि कांही अंशीं 'भटक्यां'तील काशीच्या द्वारां चितारलीं गेलीं आहेत. या कुटुंबांच्या चित्रणाखेरीज 'परागंदे'मधील शांताबाईच्या माहेरच्या कुटुंबा-सारखीं कांही कुटुंबें केतकरांनी चित्रिलीं आहेत; पण समाजाच्या विशिष्ट अंगाचें प्रतिनिधित्व करून समाजवर्णनाला तीं साह्य करणारीं नसल्यामुळे त्यांचा उल्लेख येथे करणें अप्रस्तुत होय.

केतकरांच्या कादंबऱ्यांत कुटुंबचित्रांइतकाच महत्त्व पावलेला आणखी एक भाग आहे; तो म्हणजे वेश्या, रखेल्या आणि अकुलीन प्रजा यांच्या जीवनाचा होय. त्यांच्या जीवनाचें वर्णन 'परागंदें'तील मत्तमयूरी; 'आशावादीं'तील कपिला व नर्स पद्मावती; 'ब्राह्मणकन्यें'तील मंजुळा, कालिंदी व तिचीं भावंडें आणि 'विचक्षणें'तील रंगी नायकीण, मंजुळा, चंदू लटके व तारा यांच्या साह्याने पुष्कळच विस्तृतपणे झालेलें आहे. 'ब्राह्मणकन्या' ही कादंबरी तर प्रौढ, अकुलीन अपत्यांच्या प्रश्नावरच सर्वस्वीं केंद्रित झालेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाही.

लैंगिक आचाराचें अनेक ठिकाणचें त्यांनी दिलेलें वर्णन थोडें आहे; पण तें उल्लेख करण्याइतकें मार्मिक आहे. त्यांत मोंबासा, पोर्ट सैद, नेपल्स, आफ्रिकेंतील

प्लँटेशन्स आणि युद्धभूमि इत्यादि[1] ठिकाणचें वर्णन येऊन जातें. याशिवाय, नाना समाजांतल्या नाना अंगांचीं स्फुट, छोटीं वर्णनें त्यांनी वारंवार केलीं आहेत, तीं वेगळींच. असो.

येथपर्यंत समाजवर्णनाचें जें वर्णन दिलें आहे त्यावरून केतकरांच्या कादंबऱ्यांत समाजवर्णनाने फार वरची व फार मोठी जागा व्यापलेली आहे, हें कळूं शकेल. इतकें समाजवर्णन सौंदर्यासाठीं येण्यापेक्षा समाजवर्णनाच्या हेतूसाठीच येऊं शकेल, हेंहि त्यावरून कळेल. हें समाजवर्णन किती विविध व व्यापक आहे, त्यावरहि चांगला प्रकाश पडेल. असें विविध व व्यापक समाजवर्णन दुसऱ्या कोणत्याहि मराठी कादंबरीकाराने आपल्या कादंबरींत केलेलें नाही.

## ५. समाजमीमांसा :—

समाजवर्णन म्हणजे समाजाचें जें स्वरूप वरवर दिसतें त्याचें वर्णन आणि समाजमीमांसा म्हणजे त्या स्वरूपामागच्या कारणपरंपरेची चर्चा, असें स्थूलपणें म्हणतां येईल. केतकरांनी जेथे जेथे समाजवर्णन केलें आहे तेथे तेथे बहुधा त्यांनी समाजमीमांसाहि केली आहे. ती समाजमीमांसा अतिशय विकीर्ण, सूक्ष्म आणि समाजवर्णनांत बेमालूम मिसळलेली, अशी बऱ्याच ठिकाणीं आहे. त्यामुळे ती वेचून काढणें आणि तिचा नामनिर्देश करणें बरेंच कठिण आहे. तरी पण त्यांच्या समाजमीमांसेची कांहीं कल्पना यावी म्हणून अनेक ठळक उदाहरणें पुढीलप्रमाणे देतां येतील.

'गावसासू'मध्ये इंग्लंडमधील भारतीय विद्यार्थी लैंगिक स्वैराचार कां पतकरतात, त्याची मीमांसा 'गावसासूच्या व्याख्यानां'त पूरणसिंगाच्या तोंडीं घातली आहे. लंडनमधल्या हिंदु मुली आढ्यताखोर कां बनतात आणि लंडनमध्ये हिंदी स्त्रिया कां येतात, त्याचीहि मीमांसा त्या कादंबरींत सुनीति, कुसुमकलिका व कैलासनाथ यांच्या आधारें केली आहे. अमेरिकेंतील भारतीय समाज अमेरिकनांशीं कां सदृश होत जातो, त्याच्या आकांक्षा वगैरे कां बदलतात, तें 'परागंदे' मध्ये 'हिंदी अमेरिकन कुटुंब' या प्रकरणांत दाखविलें आहे. तो समाज

1. आशा., पृ. २०४ ते २०५; भटक्या, प्र. ८ वें.

तेथे स्थायिक कां होतो, त्याचीं कारणें 'परागंदा व तत्त्वज्ञान' या प्रकरणांत दिलीं आहेत आणि त्या समाजाला धार्मिक तत्त्वांपेक्षा धार्मिक संस्कारांची आवश्यकता कशी वाटते, तें 'मिश्र कुटुंबाची मनोवृत्ति' या प्रकरणांत दर्शविलें आहे. संस्थानामध्ये संस्थानिकच संस्थानची लूट कां करतात, त्याचें एक स्पष्टीकरण 'भटक्या'मध्ये एका संस्थानिकाचें कुटुंबरहस्य सांगून केलें आहे. वाणी, पार्शी, मजूरपुढारी, मजूर यांच्यामधील स्त्रीपुरुषसंबंध सैल असल्याचें वर्णन त्यांनी अनेकदा केलें आहे आणि दर वेळीं त्या सैल स्त्रीपुरुषसंबंधाचा उलगडा विशिष्ट सांपत्तिक स्थितीचें कारण दाखवून केला आहे.[१] 'आशावादीं'तील हंटर पतिपत्नींची गोष्ट कांही ख्रिश्चन मिशनऱ्यांना परोपकाराची प्रेरणा कोठून मिळते, तें दाखविण्यासाठीच दिली आहे. 'विचक्षणें'त गुरुबाजी लोकाप्रिय कां होते आणि वैवाहिक जीवनांतील अपूर्णता भरून काढण्यासाठी ती कशी उपयुक्त असते, तें पद्मनाभ–श्रीरंगाचार्य यांच्यामुळे व मोतिलाल–रामप्यारीं यांच्यामुळे वाचकांना पाहावयास मिळतें. अकुलीन प्रजा कशी उत्पन्न होते, त्याचें एक स्पष्टीकरण 'ब्राह्मणकन्यें'त कालिंदीच्या द्वारां दिलें जातें आणि दुसरें स्पष्टीकरण 'विचक्षणें'त मंजुळेच्या द्वारां दिलें जातें. अकुलीन प्रजा कुलीन प्रजेंत कशी हळू हळू मिसळून जाते, त्याची मीमांसा 'आशावादीं'त कपिलेच्या तोंडीं घातली आहे. शिवाय, अकुलीन प्रजा प्रथम रखेलीपणा, अक्करमासेपणा, कडूपणा किंवा गाण्यानाचण्याचा धंदा यांतच कां ढकलली जाते, त्याची मीमांसा 'ब्राह्मणकन्यें'तील कालिंदी किंवा 'विचक्षणें'तील मंजुळा यांच्या आश्रयाने केली आहे. 'ब्राह्मणकन्यें'तील वैजनाथस्मृति म्हणजे विवाहसंस्थेवरील सूत्रमय निबंध असून त्यांत प्रचलित विवाहपद्धतीची मूलगामी मीमांसा केलेली आढळते. 'विचक्षणें'तील तर्कटनीतींत, तिच्या पुरवणींत व 'पद्मनाभाच्या खौलिक चतुःसूत्रीं'त तशाच प्रकारची मीमांसा थोडीशी येऊन जाते. समाजहितासाठी झटणाऱ्या पुरुषांना संन्यासवृत्ति, अविवाहितपणा, "पांडवधर्म" किंवा लबाडी यांचा आधार घ्यावा लागतो तो कां, याची कारणपरंपरा ब्रह्मागिरी 'आशावादीं'त देतात आणि रामराव–वैजनाथ 'ब्राह्मणकन्यें'त देतात. असो.

---

१. ब्रा. क., भटक्या, गों. प्रि., विच

एवढ्या ठळक उदाहरणांवरून केतकरांनी समाजमीमांसा कोणत्या प्रकारची केली आहे, तें कळूं शकेल आणि त्या मीमांसेमधील विविधता व व्यापकपणा हींहि मनावर बिंबू शकतील. मात्र, या उदाहरणांत त्यांच्या सर्व समाजमीमांसेचा निर्देश झालेला नाही, हें लक्षांत घेतलें पाहिजे. विशेषतः समाजांतल्या छोट्या छोटया गोष्टींची त्यांनी केलेली मीमांसा येथे अजीबातच निर्देशिलेली नाही; पण तसली मीमांसा ते पावलोपावलीं करतात. एकटया 'प्रियंवदें'त त्यांनी तसली मीमांसा किती वेळां केली आहे तें वानगीदाखल पाहाण्यासारखें आहे.

'प्रियंवदें'त पुण्यामुंबईकडचे लोक नागपूरकडे स्थायिक कसे होतात, तें दाखविलें आहे;[१] इंग्रज स्त्रियांना पुरुषाकर्षणाचा यत्न हिंदु स्त्रियांहून जास्त कां करावा लागतो, तें सांगितलें आहे;[२] पुनर्विवाह फारसे कां होत नाहीत, तें स्पष्ट केलें आहे;[३] इंग्रज मुलीशीं हिंदूने केलेलें लग्न असुखी कां होतें तें दिलें आहे;[४] आणि १९११-१२ च्या सुमारास पॅरिसमध्ये असलेल्या १०-१२ हिंदु वेश्या तेथे कशा आल्या, त्याचा छडा लावला आहे.[५] शिवाय विधवांनी पुनर्विवाह न करतां पुरुषसंबंध ठेवावा, या गोष्टीस वडील मंडळी कित्येकदा कां अनुकूल असतात;[६] वेश्या व रखेल्या यांच्या अस्तित्वाला पत्नीने पतीचें मन सौंदर्यसाधनेने आकृष्ट न करणें, ही गोष्ट कशी कारणीभूत असते,[७] इत्यादि प्रश्नांची मीमांसा 'प्रियंवदें'त आली आहे. वेल्बी कमिशनपुढे साक्षीला गेलेल्या ना. गोखल्यांचा मत्सर हिंदी पुढारीच कां करीत, तेंहि 'प्रियंवदें'त येतें[८] आणि धार्मिक उपदेशासाठी कांही लोक 'इंडिया ऑफिस'ची परवानगी कां घेत, त्याचाहि खुलासा 'प्रियंवदें'त मिळतो.[९] नागपुरी लोक व्याख्यानें कां घडवतात, त्याचीदेखील एक गमतीदार उपपत्ति 'प्रियंवदा' आपणांला सांगते.[१०]

'प्रियंवदें'त छोट्या छोट्या सामाजिक गोष्टींची ही जी मीमांसा आहे तीवरून बाकीच्या कादंबऱ्यांमधील तशाच मीमांसेची कल्पना येऊं शकेल.

---

१. पृ. १४. २. पृ. १९. ३. पृ. ४१, ८९. ४. पृ. ४५ ते ४७. ५. पृ. ४३. ६. पृ. ९६. ७. पृ. १०२. ८. पृ. १०३. ९. पृ. १०३. १०. पृ. १०६-१०७.

**१. विचारकथनः—**

समाजमीमांसा करतांना समाजाच्या विशिष्ट रूपामागची कारणपरंपरा सांगावी लागते आणि ही कारणपरंपरा विचारकथनात्मक असते. त्यामुळे केतकरांनी जेथे जेथे समाजमीमांसा केली आहे तेथे तेथे त्यांनी आपले विचार सांगितले आहेत, असें समजण्यास हरकत नाही. हे विचार 'जें आहे' त्याचें स्पष्टीकरण करणारे आहेत. त्या विचारांखेरीज 'काय असावें' तें सांगणारे विधायक विचार त्यांनी प्रत्येक कादंबरींत मांडलेले आहेत आणि 'विचारकथन' या त्यांच्या बोधाच्या प्रकारांत आपणांला तेच विचार समाविष्ट करावयाचे आहेत. असे विचार प्रत्येक कादंबरींत त्यांनी कोणते मांडले आहेत, तें पुढील-प्रमाणे सांगतां येईल.

'प्रियंवदे'मध्ये प्रियंवदा असा विचार पुढे आणते, की स्त्री म्हणजे राष्ट्र होय; कारण एखाद्या लढाईत बहुतेक पुरुष मेले तरी शिल्लक पुरुषांच्या साह्याने स्त्रिया वाटेल तेवढी प्रजोत्पत्ति करूं शकतील. शेताच्या मालकाला ज्याप्रमाणे शेतांत बीं किती व कोणतें पेरावें, हें ठरविण्याचा हक्क असतो त्याप्रमाणे प्रजोत्पत्ति कोणाकडून व किती करून घ्यावी, हें ठरविण्याचा हक्क स्त्रियांना असला पाहिजे. तेव्हा, स्त्रियांनी आपणांला आवडेल तो पुरुष पकडण्याची अवश्य धडपड करावी आणि वाटल्यास विवाह न करतांहि प्रजो-त्पादन करावें.[१] 'प्रियंवदें'तच इंग्रज मुलींशीं हिंदी मुलांनी लग्नें लावूं नयेत, तीं लग्नें दुःखकारक होतात,[२] असा विचार मांडला आहे आणि पुनर्विवाह सहवासोत्तर कां व्हावेत, त्यांसाठी कायदे कोणते असावेत, याबद्दल सूचना केल्या आहेत.[३]

'परागंदे'मध्ये अमेरिकेंतील परागंदा भारतीयांच्या स्थितीची सुधारणा, त्यांनी आपणांपुढे ठेवावयाचें कार्य व त्यांचें हिंदुस्थानबद्दल कर्तव्य यांवर प्रा. गोगटे व डॉ. सरंजामे विधायक विचार मांडतात.[४] हिंदुस्थानीं पुढाऱ्यांनी राज्यव्यवस्थेची जबाबदारी पतकरण्यासाठी एक संघ काढून स्वराज्यासाठी खटपट कशी करावी, तें डॉ. सरंजामे वाचकांना ऐकवतात.[५]—आणि नायकिणींची

१. पृ. ११४ ते ११६. २. प्र. १० वें. ३. पृ. ८९ ते ९१ ४. पृ. १३८, १३९, १४५, प्र. २३ वें. ५. पृ. १४०.

स्थिति सुधारावी म्हणून नायकिणींनी त्यांच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या चंदावरकरांसारख्या सुधारकांवर फिर्यादी लावाव्या,[१] असें रघुनंदन सुचवितो. शिवाय, 'परागंदां'चे धार्मिक संस्कार करण्यासाठी हिंदुस्थानांतून अमेरिकेंत भटजींची आयात करावी,[२] अशी कल्पना शिवराजसिंगाने मांडली आहे.

'आशावादी'मध्ये अनाथ स्त्रियांसाठी कशा प्रकारच्या संस्था असाव्या, याची चर्चा एल्मा हंटर व ॲडेलिन हंटर या दोघींनी केली आहे आणि अशा संस्थेचा एक नमुना आपल्या 'उद्योगमंदिरा'च्या रूपाने वाचकांपुढे ठेवला आहे.[३] सर्वसाधारणपणें स्त्रियांच्या उन्नतीसाठी कोणते प्रयत्न व्हावेत,[४] त्याबद्दल कपिला एक व्याख्यान देते आणि ती वेश्यांच्या उन्नतीचा कार्यक्रमहि रेखाटून दाखविते.[५] स्वामी ब्रह्मगिरींनी आपल्या गीतेवरील भाषणांत ऐहिक हिताची साधना जोरदारपणे करण्याचा उपदेश केला आहे आणि त्यासाठी गीतेचीहि खरपूस हजेरी घेतली आहे.[६] नीतिनियमांची रचना वास्तवाला अत्यंत अभिमुख असावी, वास्तवाकडे पाठ फिरवून केलेले नीतिनियम अयशस्वी नी दुःखदायक होतात, हें सांगून नवनीतीचें सूतोवाच ब्रह्मगिरी करून ठेवतात.[७] बॅ. मोऱ्यांच्या भाषणांत ब्राह्मणेतरांच्या सुधारणेसाठी शासनसत्तेला काय करतां येऊं शकेल, याचें चित्र रंगवलेलें आहे.[८]

'ब्राह्मणकन्ये' मध्ये, मजुरांनी सहकारी तत्त्वावर गिरण्या कशा ताब्यांत घ्याव्या, मजुरांना पगार देण्याची पद्धत कोणती असावी, यावर रामराव व कालिंदी यांनी आपले विचार तपशीलवार प्रकट केलेले आहेत.[९] कालिंदी लग्न न झालेल्या व द्रव्योत्पादन न करणाऱ्या मजूर कार्यकर्त्यांना असा संदेश देते, की त्यांनी लग्न न झाल्याने प्रौढ झालेल्या, मिळवत्या स्त्रियांना बेधडक मागणी घालावी; म्हणजे त्या स्त्रियांना नवरे मिळतील आणि मजूर–कार्यकर्त्यांना 'पांडवधर्म' आचरावा लागणार नाही.[१०] जातिभेद नष्ट करण्यासाठी काय करावें, याबद्दल बरीच सूचनात्मक चर्चा कादंबरींत आली आहे व महाराष्ट्रांत जातिभेद मोडणारांना आपला सामाजिक श्रेष्ठ-

---

१. पृ. १५२. २. पृ. १०२. ३. पृ. २३, ४१ ते ४५. ४. पृ १९९ ते २०१. ५. पृ. १८९ ते १९२. ६. पृ. १२८ ७. कित्ता. ८. पृ. ४६ ते ५२. ९. प्र. २९ वें. १०. प्र. २५ वें.

पणा टिकवावयाचा असेल तर आर्यसमाजासारखा संघटित प्रयत्न त्यांनी केला पाहिजे, असा इषारा सत्यव्रताने दिला आहे.[1] वैजनाथशास्त्री जीं संभाषणें करतात व जी 'वैजनाथस्मृति' उत्पन्न करतात त्यांमध्ये नीतिनियम व विवाहसंस्था यांमधील न्यूनें विदारकपणें दाखविलीं असून तीं कशीं काढून टाकावींत, याबद्दल क्रांतिकारक उपाय सुचविले आहेत. त्या उपायांत मुख्यतः स्त्रीसत्ताक कुटुंबपद्धतीचा पुरस्कार केला आहे व ती कुटुंबपद्धति यशस्वी व्हावी म्हणून कोणते कायदे करावे, मालकी हक्क कसे ठेवावे, संघटना कशी करावी, तें दर्शविलें आहे. प्रेम करणाऱ्या तरुणांना 'ब्राह्मणकन्यें'त असा धीर दिला आहे की त्यांनी एक दोन प्रेमभंग झाले तरी ती गोष्ट साहजिक समजून निराश होऊं नये आणि 'प्रपोझ' केल्याशिवाय प्रेमविवाह जमणें शक्य नसल्याने 'प्रपोझ' करण्यास बिचकूं नये.[2]

'गावसासू'मध्ये पूरणसिंगाच्या मार्फत एकच विधायक विचार मांडला गेला आहे. तो असा, की इंग्लंडमधलि हिंदी विद्यार्थ्यांचें लैंगिक आचरण सुधारण्यासाठी इंग्लंडमध्ये अधिकाधिक हिंदी मुली पाठविण्याची खटपट झाली पाहिजे.[3]

'विचक्षणे' मध्ये विवाहसंस्थेंतील उणीव भरून काढण्यासाठी गुरुसंस्थेचा पुरस्कार पद्मनाभाने केला आहे आणि गुरुसंस्था आकर्षक कशी करावी, तें सप्रयोग दाखवून दिलें आहे. मूल होत नसल्यास व त्यांत पतीचा दोष असल्यास पत्नीच्या ठिकाणीं अवश्य तर गुरूकडून प्रजोत्पत्ति करावी, असें पद्मनाभचें म्हणणें आहे. परपुरुषकृत प्रजोत्पत्तीचा पुरस्कार मोतीलाल–रामप्यारी यांनीहि केला आहे. वेश्यांचें जीवन समाधानाचें व्हावें, त्या जीवनाचा केवळ बाजार होऊं नये म्हणून वेश्यांनी मूर्तीशीं लग्न लावण्याची प्रथा चालू द्यावी, असें पद्मनाभ सुचवितो. डॉ. तर्कटे व रंजिता मंजुळेला जो उपदेश करतात त्यांत वेश्या–कन्यांनी काय करावें, याचें उत्तर आलें आहे. स्त्रीपुरुषसंबंधाबद्दल जे नीतिनियम आहेत ते अधिक सुखकर व्हावे म्हणून 'तर्कटनीतीं'त बऱ्याच सूचना केल्या आहेत. शिवाय, तर्कटनीतीला प्रा. लोंढे जी पुरवणी जोडतात तीमध्ये मिळवत्या स्त्रियांचा प्रश्न कसा सोडवावा, तें दाखविलें आहे. बाळोबा

१. प्र. २४ वें. २. पृ. ५१ व बिनयामिनची कथा. ३. प्र. २८.

' नेबरहुड हाऊस ' मध्ये जें व्याख्यान देतो व मजूरवर्गांत जें जीवन व्यतीत करतो त्यांत मजुरांच्या सुधारणेचा कार्यक्रम प्रत्यक्ष व्यक्त झालेला नाही; पण मजुरांची सुधारणा कोणकोणत्या बाबतींत व्हावयास पाहिजे तें व्यक्त झालें आहे.

' भटक्या 'मध्ये विधायक विचार फारसे आलेले नाहीत; पण डॉ. घैसासांचे आरोग्याबद्दलचे विचार व रा. ब. आपट्यांचे निवडणूक लढविण्याच्या पद्धतिबद्दलचे विचार, विधायक विचारांत समाविष्ट करतां येण्यासारखे आहेत. असो.

एवढ्या विस्तारावरून ' विचार–कथना 'च्या हेतूची फोड चांगली होऊं शकेल आणि प्रत्येक कादंबरींत केतकरांनी विचारकथानकाला कसें महत्त्व दिलें आहे, तें कळूं शकेल. त्यांच्या कादंबऱ्यांतील विधायक विचारांचा व्याप केवढा मोठा होता आणि त्यांत किती विविधता होती, हेंहि या विस्तारावरून मनावर सहज ठसेल.

**७. ज्ञानदान:—**

ज्ञानदान हें केतकरांच्या बोधाचें चौथें अंग अत्यंत संमिश्र स्वरूपाचें आहे. प्रस्तुताच्या ओघांत ज्ञानस्वरूपाच्या ज्या ज्या स्फुट गोष्टी ते मुद्दाम आणतात, अपरिहार्य नसतांना आणतात त्या त्या स्फुट गोष्टी या अंगांत समाविष्ट होतात, असें म्हणतां येईल. या गोष्टींनी क्वचित् समाज-चित्रण, क्वचित् व्यक्तिचित्रण वगैरे होत असेल; पण त्याच उद्देशाने त्या येत नाहीत; म्हणून त्यांचा वर्ग वेगळा काढावा लागतो. या गोष्टी ज्ञान नोंदविण्या-च्या प्रधान हेतूने येतात म्हणून 'ज्ञानदान' या वेगळ्या अंगांत त्या एकत्र आणणें युक्त होय. या गोष्टी स्फुट असल्याने साहजिकच छोटया छोट्या आहेत. शिवाय त्या अतिशय मुबलकहि आहेत. त्यामुळे त्यांची परिपूर्ण नोंद करणें शक्य नाही. तरी पण त्यांची गुंफण केतकर प्रस्तुताच्या सूत्रांत किती व कशी करतात, हें लक्षांत यावें म्हणून 'प्रियंवदे'चें उदाहरण पाहाण्यासारखें आहे.

'प्रियंवदे'मध्ये नागपूर, रायपूर, लंडन व रत्नपूर या स्थलीं कथानक खेळत असतें. तेव्हा त्या त्या स्थलांची भरपूर माहिती केतकरांनी दिली आहे. विशेषतः

रायपूर, लंडन व रत्नपूर यांची माहिती[1] पाहिली म्हणजे कादंबरींतल्या इतर अंगांना पोषक म्हणून ती दिलेली नसून वाचकांना ज्ञान व्हावें म्हणून ती दिली आहे, याची खात्री पटते. ‘हम बन चुके’ची गोष्ट केतकर वैजनाथच्या तोंडीं घालतात[2] आणि ‘एका ज्यूची गोष्ट’[3] ते बंडूनानाच्या तोंडीं घालतात. त्या गोष्टी ज्ञान गोवण्याच्या प्रमुख उद्देशानेच घातल्या असाव्यात, असें वाटतें. प्रस्तुतांत गोवलेल्या अशा गोष्टी बाजूला काढल्या तर त्यांमध्ये चांगलीच विविधता दृष्टीस पडते. कंपनीच्या संचालकांना शेअरचे भाव वर खाली करून पैसे कसे खातां येतात, तें त्यांमध्ये आहे.[4] संचालक व्यवस्थापकांकडून खाजगी कामें करवून घेण्यासाठीं कशी गळ घालतात, तेंहि त्यांमध्ये आहे.[5] पूर्वी उल्लेखिलेल्या पॅरिसमधील हिंदी वेश्या त्यांमध्ये आहेत[6] आणि नागपूरकडील बंगाली लोक मुसलमान नोकर ठेवतात, बंगाली मुली मुसलमान स्त्रियांप्रमाणे नाकाच्या मधल्या पडद्यांत लोलक घालतात, ही माहितीहि त्यांत आहे.[7] “पाश्चात्य स्त्रियांचें वयःकथनविषयक नीतिशास्त्र” त्यांत येतें.[8] ‘युरेशियन गर्ल’चा अर्थ मद्रासकडे किंवा कलकत्त्याकडे काय होतो, तें त्यांत येतें;[9] ऐतिहासिक संशोधन कसें करतात, तें त्यांत येतें[10] आणि ‘इंद्रियविषयक उपासमारीचें मानसशास्त्र’हि त्यांत येतें.[11] प्रस्तुतांत गोवलेल्या त्याच गोष्टींवरून, मध्यप्रांतांतील पहिले इंग्रजी शिकलेले गृहस्थ कृष्णराव रिंगे यांची माहिती समजते,[12] राजमहेंद्रीकडे व्यभिचार करून प्रसिद्धि पावलेला प्रार्थनो वीरेशलिंगम् पंतलु याची ओळख होते[13] आणि उमरावतीच्या कॉंग्रेसचा कांही वृत्तांत कळतो.[14]

‘प्रियंवदे’त विपुल चर्चा आल्या आहेत; त्यांचा संबंध विधायक विचार सांगण्याकडे, कथानकाकडे किंवा व्यक्तिचित्रणाकडे कांही ना कांही आहे; पण त्या चर्चांमधील सर्वच आशय त्यासाठी अपरिहार्यपणें येतो, असें नाही. अशा आशयाची योजना ज्ञानदानाच्या प्रधान हेतूने झाली आहे. त्या आशयांत केतकर किती प्रकारचें ज्ञान देतात तें पाहा-

---

१. पृ. २६, ३८; १०२, १०३; ५७, ५८, ६३. २. पृ. ८२. ३. पृ. २३. ४. पृ. २१ ते २४. ५. पृ. ५४. ६. पृ. ४३. ७. पृ. ३०. ८. पृ. ४४-४५ ९. पृ. ६०. १०. पृ. ६३ ते ६५. ११. पृ. ७०. १२. पृ. १९. १३. पृ. ९३. १४. पृ. ९४.

ण्यासारखें आहे. त्यामध्ये, नर व मादी यांना परस्परांचें आकर्षण करण्यासाठी निसर्गाने कोणतीं साधनें दिलीं आहेत त्याचें 'जीविशास्त्रा'मधील ज्ञान येतें;[१] कौमार्य व वैधव्य यांची तुलना येते;[२] हुंड्याला विरोध करणें व पुनर्विवाहाचा पुरस्कार करणें यांमधील विसंगति समजते;[३] विधवांचें जुनें पोळपाट-लाटणें व नवी मास्तरकी यांची सापेक्ष ओळख होते[४] आणि कीर्तन व गाणें यांचें तौलनिक महत्त्व कळतें.[५] इंग्रजी शिक्षण व जुनें शिक्षण;[६] पौर्वात्य स्त्रीदाक्षिण्य व पाश्चिमात्य स्त्रीदाक्षिण्य;[७] स्त्रियांच्या बाबतींत पुरुषांचें वर्तन कसें असावें;[८] स्पिरीच्युअल म्हणजे काय[९] वगैरे विषयांवर त्या अपरिहार्य नसलेल्या आशयांत सुंदर चर्चा आल्या आहेत. विधवेचा धर्म,[१०] स्त्रियांच्या भावनाविकासाला होणारा अडथळा,[११] वाचिक सत्य व सद्भावना[१२] इत्यादि मुद्यांवर आणखीहि चर्चा येतात.

एकट्या 'प्रियंवदें'त ज्ञानदानाच्या हेतूने केतकरांनी एवढ्या गोष्टी घातल्या आहेत. तेव्हा समाजचित्रणादि अन्य हेतूंपेक्षा वेगळें क्षेत्र या हेतूला कसें आहे, हें सहजच सिद्ध होतें. 'प्रियंवदे'प्रमाणेच इतर सर्व कादंबऱ्यांत प्रस्तुताच्या ओघांत, अपरिहार्य नसलेलें, विपुल व विविध ज्ञान त्यांनी पदोपदीं मांडलेलें आहे. 'प्रियंवदे'वरून त्याची कल्पना येऊं शकेल.

व्यक्तिचित्रण आणि मनोविश्लेषण हीं जीं केतकरांच्या बोधहेतूचीं उरलेलीं दोन अंगें आहेत त्यांचा परामर्श, सोयिस्कर म्हणून, पुढे स्वतंत्रपणे घेतला आहे.

## ८. कादंबऱ्यांचें समाजशास्त्रीय स्वरूपः—

समाजवर्णन, समाजमीमांसा व विचारकथन या हेतूंमुळे केतकरांच्या कादंबऱ्यांत जो मजकूर येतो तो सर्वस्वीं समाजशास्त्राच्या कक्षेंत बसणारा आहे. ज्ञानदानाच्या हेतूने येणारा बराच मजकूरहि अनेकदा समाजवर्णनात्मक असतो व त्यामुळे समाजशास्त्राच्या कक्षेंत तो सामावतो. असा समाजशास्त्रीय मजकूर केतकरांच्या कादंबऱ्यांत इतका आहे, की त्याच्यामुळे सुमारें निम्म्याहून अधिक जागा व्यापली जाते. या मजकुराला

१. पृ. १८. २. पृ. २७, ३१. ३. पृ. २९. ४. पृ. ६८.
५. पृ. ३८, ३९. ६. पृ. ५८, ६०. ७. पृ. ६७, ६९. ८. पृ. ६९.
९. पृ. ७५. १०. पृ. ८०-८१. ११. पृ. ११०. १२. पृ. ११२.

इतकें प्रचंड महत्त्व मिळाल्यामुळे केतकरांच्या कादंबऱ्यांना ‘समाजशास्त्रीय कादंबऱ्या’ हें अभिधान लावलें तर योग्यच होईल.

कादंबऱ्यांतील समाजशास्त्रीय मजकूर कादंबरी या वाङ्मयप्रकाराच्या बंधनामुळे शास्त्रीय पद्धतीने लिहिला गेला नाही; तो लोकगोचर पद्धतीने (पॉप्युलर मेथडने) लिहिला गेला; पण त्याचें समाजशास्त्रीय मूल्य फारच उच्च दर्जाचें आहे. कादंबरींत पात्रें, कथा व तदनुषंगिक कथन यांच्या माध्यमांतूनच सर्व गोष्टी सांगाव्या लागतात; शिवाय, वाचकाच्या रंजनाकडे लक्ष पुरवावें लागतें. त्यामुळे कादंबरींतील समाजशास्त्रीय मजकुरांत अपूर्णता, एकांगीपणा, अतिशयोक्ति, असंगति, विसंगति वगैरे गुणदोष साहजिकपणेंच येतात. विचार सांगतांना पात्राच्या स्वभावपरिपोषाकडे लक्ष असल्याने किंवा वाचकाच्या विचारशक्तीला खेळविण्याकडे लक्ष असल्याने अर्धसत्य किंवा असत्य विचारहि सांगितले जातात. केतकरांच्या कादंबऱ्यांत जो समाजशास्त्रीय मजकूर आहे त्यांत अर्थातच हे गुण किंवा दोष आले आहेत. मजकुरांतील हे गुणदोष कादंबरीचें मूल्य वाढविण्यासाठी अपरिहार्य असले, नव्हे उपयुक्त असले, तरी त्यांमुळे त्या मजकुराचें समाजशास्त्रीय मूल्य कांही अंशीं नक्कीच कमी होतें.

हें कमी होणारें मूल्य ध्यानीं घेऊनहि केतकरांच्या कादंबऱ्यांतील समाजशास्त्रीय मजकूर समाजशास्त्रीय दृष्टीने बहुमोल ठरतो, हें विशेष होय. केतकरांनी केलेलीं सर्व समाजवर्णनें वास्तवाची काटेकोर दृष्टि ठेवून केलेलीं आहेत आणि शिवाय प्रत्यक्ष अवलोकन व अनुभव यांच्या खंबीर आधारावर तीं उभारलेलीं आहेत. त्यामुळे शास्त्रीय समाजवर्णनांचा दर्जा त्यांना जवळ जवळ प्राप्त झाला आहे. केतकरांची समाजमीमांसाहि त्यांच्या वास्तवाच्या आग्रहामुळे उच्च दर्जाची होते. विशिष्ट उपपत्ति उराशीं बाळगून तिच्या आधारें समाजमीमांसा करण्याची त्यांची वृत्ति नाही. प्रत्यक्ष घटना पाहाव्या व त्यांवरून मीमांसा बसवावी, ही त्यांची वृत्ति आहे. त्यामुळे बहुतेक वेळीं नेमक्या मुद्यावर ते बोट ठेवतात आणि त्यांच्या मीमांसेमध्ये अचूकपणा येतो. वर उल्लेखिलेल्या कांही समाजमीमांसेची तपासणी केली तर याची सहज साक्ष पटेल. केतकरांनी सांगितलेल्या विधायक विचारांत कादंबरीच्या विशिष्ट माध्यमामुळे नुकतेच दर्शविलेले दोष पुष्कळ आले आहेत. पण त्या विचारांत, अक्षरशः दशकांनी मोजावे लागतील इतके विचार व्यवहार्य आहेत आणि कर्त्या

सुधारकाला उपयोगीं पडण्यासारखे आहेत. इंग्रज मुलींचे व हिंदु मुलांचे विवाह दुःखदायक होतील; पुनर्विवाहपूर्व अनुनयाला वाव हवा; मिळवित्या स्त्रियांनी बिनमिळवित्या ध्येयनिष्ठांशीं लग्नें लावावीं; जातिभेदोन्मूलनासाठी महाराष्ट्रांत आर्यसमाजासारखी जागृत संघटना हवी; प्रेमसाधनेंतील अपयश साहजिक समजून तरुणांनी निराश होऊं नये इत्यादि विचार निखालस व्यवहार्य व उपयुक्त म्हणून वानगीदाखल निवडून दाखवितां येतील. कांही विचार तत्काल व्यवहार्य नाहीत; पण समाजसुधारकांच्या विचारांना वळण देऊन दूरच्या भावी काळांत उपयुक्त ठरण्याचीं बीजें त्यांच्यामध्ये नक्की आहेत. कलावती स्त्रिया, मिळवित्या स्त्रिया, ध्येयनिष्ठ नि बिनमिळवते पुरुष वगैरेंचे वैवाहिक प्रश्न सोडविण्यासाठी मातृसत्ताक कुटुंबपद्धतीच्या पुनरुज्जीवनाचा जो विचार केतकर सांगतात तो अशा प्रकारचा आहे. त्या विचाराचा सद्यःस्थितींत कांहीच व्यावहारिक उपयोग नाही. कारण जनमत व समाजरचना हीं त्याला मूलतःच विरोधी आहेत. पण तो विचार इतका सामर्थ्यशाली आहे, की समाजसुधारकांच्या मेंदूवर झडप घालून तो त्या मेंदूंना कांही तरी अनुकूल हालचाल करण्यास लावूं शकेल आणि भावी काळांत त्याचा कांही उपयोग होईल. अशा विचारांचें व्यावहारिक मूल्य कमी असलें तरी तात्त्विक मूल्य फार असतें, हेंहि ध्यानांत घेतलें पाहिजे. असो. केतकरांच्या कादंबऱ्यांतील समाजशास्त्रिय मजकूर नाना तऱ्हांनी असा समाजशास्त्रीय मोलाचा झाला आहे. त्यांच्या निबंधगत व प्रबंधगत मजकुराशीं तुलना करतां त्यांतील समाजवर्णन फार मोठें व महत्त्वाचें आहे; समाजमीमांसा फार थोडी व कमी महत्त्वाची आहे आणि सुधारणात्मक विचार बहुंशीं तुल्यबल आहेत. म्हणजे त्यांच्या एकंदर समाजशास्त्रीय लेखनांत कादंबऱ्यांचें स्थान उच्च पण डावेंच आहे. मराठी वाङ्मयांत मात्र त्यांच्या कादंबऱ्यांइतकें समाजशास्त्रीय महत्त्व एकाहि लेखकाच्या कादंबऱ्यांना नाही आणि अनेकांच्या समाजशास्त्रीय ग्रंथांनाहि नाही.

## ९. बोधहेतु आणि ‘ विषयनिष्ठ ’ रचनाः—

बोधहेतूचा केतकरांच्या कादंबऱ्यांच्या रचनेवर मूलभूत स्वरूपाचा परिणाम झाला आहे. साधारणतः विशिष्ट व्यक्तीच्या चित्रणावर किंवा विशिष्ट कथेच्या

कथनावर कादंबरी केंद्रित करण्यांत येते; पण त्यांच्या कादंबऱ्या तशा केंद्रित झालेल्या नाहीत. कारण त्यांना आपल्या बोधाचीं सर्व अंगें कादंबरींत यावींत अशी इच्छा होती; कादंबरी हा वाङ्मयप्रकार स्वीकारल्यामुळे कांही कथाहि सांगणें त्यांना भाग होतें; आणि या सर्व गोष्टी विशिष्ट व्यक्तिचित्रणावर किंवा कथाकथनावर केंद्रित झालेल्या कादंबऱ्यांत ऐसपैस सामावणें शक्य नव्हतें. विशिष्ट व्यक्तीच्या चित्रणावर जर त्यांनी कादंबरी केंद्रित केली असती तर समाजचित्रण, समाजमीमांसा, विचारकथन वगैरे हेतु त्यांना गौण ठेवावे लागले असते आणि व्यक्तिचित्रणाला पूरक असाच त्यांचा उपयोग करावा लागला असता. त्यांनी विशिष्ट कथेच्या कथनावर कादंबरी केंद्रित केली असती तरीहि असाच प्रकार झाला असता. तेव्हा, कथेवर किंवा पात्रचित्रणावर कादंबरी केंद्रित करण्याचा रूढ मार्ग त्यांनी सोडून दिला.

आपल्या बोधहेतूच्या विशिष्ट अंगावर कादंबरी केंद्रित करण्याचा मार्गहि त्यांनी अनुसरला नाही. समाजचित्रण व समाजमीमांसा हीं त्यांच्या बोधाचीं दोन अंगें परस्परपूरक होतीं, तेव्हा त्यांच्या जोडीवर ते कादंबरी केंद्रित करूं शकले असते. ज्ञानदान व विचारकथन या परस्परपूरक जोडीचा उपयोगहि कादंबरीचें केंद्रीकरण करण्यासाठी होऊं शकला असता. —आणि व्यक्तिचित्रण व मनोविश्लेषण ही जोडी परस्परपूरक असल्याने तिच्यावरदेखील कादंबरीचें केंद्रीकरण त्यांना करतां आलें असतें. पण विशिष्ट व्यक्तिचित्रणावर किंवा कथाकथनावर कादंबरी केंद्रित करण्यांत जी अडचण होती तीच अडचण या तीन जोडयांपैकी एका जोडीवर कादंबरी केंद्रित करण्यामध्ये होती. त्यांनी कोणत्याही एका जोडीला केंद्राचा मान दिला असता तर बाकीच्या दोन जोडया अपरिहार्यपणें केंद्रभूत जोडीला गौण व पूरक ठेवाव्या लागल्या असत्या. मग त्या जोडयांना भरपूर वाव देतां आला नसता. अशा स्थितींत कादंबरी बोधाच्या विशिष्ट अंगावर केंद्रित करण्याची कल्पनाहि त्यांना सोडून देणें भाग होतें

बोधाचीं अधिकांत अधिक अंगें आणि कथा या सर्वांना खूप वाव देण्यासाठी त्यांनी वेगळीच युक्ति अमलांत आणली. बोधाचीं अनेक अंगें व कथा हीं सर्व एखाद्या विषयावर केंद्रित करावीं किंवा एखाद्या विषयाच्या सूत्रांत ओवावीं आणि कादंबरीरचना करावी, ही ती युक्ति होय. त्यांच्या या

युक्तीमुळे त्यांच्या बहुसंख्य कादंबऱ्या विशिष्ट विषयावर केंद्रित झालेल्या आहेत किंवा विशिष्ट विषयाच्या सूत्रांत ओवलेल्या आहेत. थोडक्यांत म्हणजे विशिष्ट विषयाचें केंद्र किंवा सूत्र लाभून त्या ‘ विषयनिष्ठ ’ झाल्या आहेत. उदाहरणार्थ, ‘ परागंदा,’ ‘ ब्राह्मणकन्या,’ ‘ गावसासू ’ व ‘ विचक्षणा ’ या चार कादंबऱ्यांत विशिष्ट विषय केंद्रस्वरूप झाला आहे. म्हणजे त्या कादंबऱ्यांतील बोधाचीं नाना अंगें व कथा एकाच विषयाचीं अंगोपांगें स्पष्ट करतात व त्या विषयाला पूरक होतात. उलट ‘ आशावादी ’ व ‘ भटक्या ’ या दोन कादंबऱ्यांत विशिष्ट विषय केंद्रस्वरूप न होतां सूत्रस्वरूप झाला आहे. म्हणजे त्या कादंबऱ्यांतील बोधाचीं नाना अंगें व कथा विशिष्ट विषयाचीं अंगोपांगें स्पष्ट करीत नाहीत किंवा त्या विषयाला पूरकहि होत नाहीत; तर बोधाचीं अंगें व कथा त्या विषयाने केवळ एकत्र आणलीं जातात. ‘ प्रियंवदे ’-मध्ये बोधासाठी विशिष्ट विषयावर कादंबरी लिहिण्याचा प्रयत्न केतकरांनी केला नाही; त्यामुळे ‘ प्रियंवदे ’चा प्रकार कांहीसा वेगळा होतो. असो कादंबऱ्यांचा एकैकशः अधिक विचार केला म्हणजे बोधहेतूमुळे त्या विषयनिष्ठ कशा बनल्या, त्यावर चांगला प्रकाश पडेल.

## १०. ‘ परागंदे ’ची रचनाः—

विशिष्ट विषयावर केंद्रित झालेल्या उपर्युक्त चार कादंबऱ्यांपैकी ‘परागंदे’चा विषय ‘ अमेरिकानिवासी हिंदी लोक ’ हा आहे. त्या कादंबरींतील सर्वच अंगोपांगें या विषयावर कांही ना कांही प्रकाराने केंद्रित झालेलीं दिसतात. गंगाधर—रुक्मिणीच्या कथेंत, देशत्याग करून अमेरिकेंत गेलेल्या, तेथे ‘ गदर ’च्या क्रांतिकारक उठावांत सामील झालेल्या आणि नंतर स्वदेशीं परत येणें शक्य नसल्याने तेथेच स्थायिक होणाऱ्या, अशा अमेरिकानिवासी हिंदी देशभक्तांचें सार्वजनिक व खाजगी जीवन पाहावयास सापडतें. रघुनंदन—मयूरीच्या कथेंत अमेरिकानिवासी हिंदी लोकांची अनुनयपद्धति कशी बदलते, विवाहामध्ये जातीची फिकीर त्यांना कशी वाटत नाही, तें दिसून येतें. सरंजामे—लोला यांच्या कथेवरूनहि त्यांच्या अनुनयपद्धतीवर, वैवाहिक प्रश्नांवर वगैरे शोध-ज्योति टाकल्या जातात. कामत पतिपत्नींच्या हकीगतींत व त्यांच्या मुलांच्या वृत्तान्तांत परागंदा झालेल्या हिंदी लोकांच्या आशा—आकांक्षा कशा बदलतात,

त्यांच्या परदेशगमनामागे द्रव्यार्जनाची इच्छाहि कशी असते, त्यासंबंधी माहिती कळते. प्रा. गोगट्यांच्या कथेंत अमेरिकेंतील हिंदी लोक हिंदुस्थानांतून तिकडे कां गेले, याबद्दल आणखी एक स्पष्टीकरण मिळतें. शिवराजसिंगाची गोष्ट म्हणजे अमेरिकेंत गेलेल्या व तेथे एका आयरिश मुलीशीं लग्न लावून स्थायिक झालेल्या हिंदी गृहस्थाची गोष्ट आहे. त्या गोष्टीचा उपयोग अमेरिकेंतल्या हिंदी मिश्र कुटुंबापुढे मुलांच्या धर्मसंस्कारांचा प्रश्न कसा आ वासून उभा असतो, तें दाखविण्याकडे झाला आहे. विलकॉक्स हा रामतीर्थांचा एक अमेरिकन शिष्य असतो. त्याच्या चरित्रावरून हिंदी धर्मप्रचारकांचा अमेरिकन लोकांवर झालेला कांही परिणाम दिसतो आणि हिंदी लोकांबद्दल सहानुभूति बाळगणारा जो वर्ग अमेरिकनांमध्ये आहे त्याची ओळख पटते. म्हणजे ' परागंदे ' मध्ये जेवढ्या म्हणून लहानथोर कथा आहेत तेवढ्या सर्व ' अमेरिकेंतील हिंदी लोक ' या विषयावर केंद्रित झाल्या आहेत.

' परागंदे 'मधील व्यक्तिचित्रणेंदेखील त्या विषयाला अनुरूप अशींच आहेत. प्रत्येक पात्राच्या स्वभावांत त्याचा हिंदीपणा व अमेरिकानिवास या गोष्टी सतत प्रतीत होतात; किंवा त्या पात्राच्या स्वभावामुळे अमेरिकेंतल्या हिंदी लोकांचे स्वभाव उठून दिसण्यास मदत तरी होते. गंगाधराच्या स्वभावांत ' गदर ' मधील हिंदी तरुणांची रसरशीत देशभक्ति आहे आणि प्रामाणिक-पणाच्या अत्युदात्त भावना आहेत. रघुनंदन म्हणजे अमेरिकेंतल्या स्वतंत्र वातावरणांत वाढलेला व आपल्या प्रत्येक हालचालींत अमेरिकेचा परिणाम व्यक्त करणारा असा एक " हसलर " आहे. डॉ. सरंजाम्यांच्या बोलण्यांत अमेरिकेंत संपादन केलेल्या विद्येचा तारुण्यसुलभ ताठरपणा क्षणोक्षणीं व्यक्त होतो. प्रा. गोगटे आणि गोविंदराव कामत यांचीं व्यक्तिचित्रणें फारशीं ठळक नाहीत; पण परदेशांतील अल्पसंख्य हिंदी लोकांमधील वडीलधाऱ्या मंडळींचे ते दोन नमुने आहेत, असें म्हणण्यास हरकत नाही. शिवाय प्रा. गोगट्यांच्या स्वभावांत स्वाभिमानासाठी परागंदा होणाऱ्या हिंदी माणसाची विशिष्ट चमक आहे. मत्तमयूरी रघुनंदनची प्रेयसी आहे आणि त्याच्यासारखीच अमेरिकन वातावरणांत तिची उफाड्याची वाढ झाली आहे. त्यामुळे तिच्या प्रेमांत, तिच्या शृंगारांत, तिच्या डॉक्टरकींत अमेरिकन मोकळेपणा पदोपदीं जाणवल्याशिवाय राहात नाही. रुक्मिणी आणि लाला गजपतराय हीं दोनच

ठळक पात्रें शुद्ध हिंदी आहेत आणि त्यांच्यावर अमेरिकेचा लेशहि परिणाम झालेला नाही. पण तीं अमेरिकन स्वभावाच्या पात्रांमध्ये आणल्याने अमेरिकन स्वभावाचें वैशिष्ट्य विरोधी पार्श्वभूमीमुळे अधिक ठळक झालें आहे. लाजरी, विनयशील, संकोची अशी रुक्मिणी अमेरिकेंत प्रविष्ट झाली, मयूरीशीं बोलूं लागली, की मयूरी, लीला, शांताबाई इत्यादि अमेरिकन वातावरणांत वाढलेल्या स्त्रियांचें स्वभाववैशिष्ट्य एकदम नजरेंत भरतें; जावयाचा निःसंकोच मुका घेणाऱ्या शांताबाई ताबडतोब अगदी वेगळ्या वाटतात. लाला गजपतरायांचा उपयोग कांहीसा रुक्मिणीसारखाच केला आहे. मात्र त्यांच्या स्वभावावर अमेरिकेंतल्या हिंदी लोकांचे स्वभाव उठून दिसण्याऐवजी त्यांच्या विचारांवर अमेरिकेंतल्या हिंदी लोकांचे विचार उठून दिसतात. गजपतरायांशीं सरंजामे–गोगटे वगैरेंचें जें संभाषण होतें त्यांत गजपतराय व सरंजामे–गोगटे यांच्या विचारांच्या भिन्न दिशा वाक्यावाक्यांत दिसून येतात.

कादंबरींतील सर्व ठळक पात्रें व सर्व कथा अशा रीतीने ‘ अमेरिकेंतील हिंदी लोकां ’ चीं वैशिष्ट्यें उजेडांत आणण्याकडे खर्ची पडल्याने त्या पात्रांच्या व कथांच्या आधारामुळे समाजचित्रणहि साहाजिकच ‘ अमेरिकेंतील हिंदी लोकां ’ चेंच होतें. त्याव्यतिरिक्त हिंदुस्थानांतील हिंदु समाजाचें कांही चित्रण कादंबरींत आलें आहे. त्यांत रुक्मिणीसारख्या अनाथ हिंदु मुलीला हिंदु समाज कसा वागवितो वगैरे गोष्टी दिसतात; पण तें समाजचित्रण इतकें अल्प आहे, की त्यामुळे सर्व समाजचित्रण प्रस्तुत विषयाचें केंद्र सोडून भलतीकडे जातें, असें म्हणतां येत नाही. ‘ गोविंदराव कामत एकदा हिंदुस्थानांत आले तेव्हा त्यांना रस्त्यांतून हिंडणारे, रक्तपिती झालेले भिकारी दिसले, बायका पदरांना नाकें पुसतात व कुंकवाचीं बोटें भिंतीला पुसतात, हें दिसलें. ’—अशा प्रकारचें जें हिंदुस्थानांतील समाजाचें स्फुट वर्णन आहे, तें अमेरिकानिवासी हिंदी समाजाचें चित्र उठावदार करणारें आहे. तेव्हा प्रस्तुत विषयावरच त्याचा रोख केंद्रित झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाही.

कादंबरींत गंगाधर, प्रा. गोगटे, डॉ. सरंजामे व गजपतराय यांच्या साह्याने प्र. ११, १८, २१ व २३ यांमध्ये बरीच समाजमीमांसा व विचार-कथन हीं आलीं आहेत. त्यांचे विषय गदर चळवळींत अनेकांचे कोणते हेतु होते, हिंदी लोक अमेरिकेंत कां स्थायिक होतात, त्यांच्यापुढे कोणतें कार्य

आहे वगैरे तऱ्हेचे आहेत. तेव्हा कादंबरींतील समाजमीमांसा व विचारकथन हीं ' अमेरिकेंतील हिंदी लोक ' या विषयाशीं पूर्ण संबद्ध आहेत, हें वेगळें सांगावयास नको.

ज्ञानदानाच्या हेतूने प्रस्तुत विषयाशीं असंबद्ध असलेली कोणतीही माहिती चर्चा किंवा भाष्य या कादंबरींत ठळकपणें आलेलें नाही. जें थोडथोडें ज्ञान कादंबरींत पेरलेलें आहे त्यापैकी बरेंच प्रस्तुत विषयाला पूरक आहे. प्रस्तुत विषयाला पूरक नसलेलें ज्ञान कादंबरींतील पात्रचित्रण, कथा वगैरे अंगांना पूरक आहे. क्वचित् पूरक नसलें तरी त्या अंगाशीं निगडित आहे. तेव्हा कादंबरीची विषयनिष्ठता बिघडविण्यांत ज्ञानदानाचा हेतु आड येतो, असें म्हणण्याचें कांही कारण नाही.

सारांश, ' अमेरिकेंतील हिंदी लोक ' या विषयावर कादंबरीचीं कथा, पात्रें, समाजचित्रण, विचारकथन आदिक सर्व अंगें केंद्रित झालीं आहेत, हें निरपवाद खरें आहे.

' परागंदा ' अशी विषयनिष्ठ होण्याला केतकरांचा बोधहेतु कसा कारण झाला, तें थोड्याशा मीमांसेने स्पष्ट होऊं शकेल. सौंदर्यदर्शनाच्या हेतूने लिहिलेल्या कादंबऱ्यांत ज्याप्रमाणे कादंबरी विशिष्ट व्यक्तिचित्रणावर किंवा कथेवर केंद्रित करतात त्याप्रमाणे केतकरांनी ' परागंदा ' विशिष्ट व्यक्तिचित्रणावर किंवा कथेवर केंद्रित केली असती तर त्यांच्या बोधाला सध्यासारखा वाव मिळाला नसता. उदाहरणार्थ, त्यांनी गंगाधराचें व्यक्तिचित्रण केंद्रस्थानीं ठेवलें असतें तर रघुनंदन, मयूरी, डॉ. सरंजामे, प्रा. गोगटे, रुक्मिणी इत्यादि सर्व पात्रें गंगाधराच्या मानाने गौण ठेवावीं लागलीं असतीं आणि तीं गंगाधराच्या व्यक्तिचित्रणाला पूरकहि करावीं लागलीं असतीं. त्यामुळे त्या पात्रांच्या चित्रणाला सध्या जो वाव मिळाला आहे तो नष्ट झाला असता. एका पात्राच्या चित्रणाला पूरक होण्याची अपेक्षा नसल्याने हल्ली जी त्या पात्रांत विविधता आली आहे तीहि बरीच लुप्त झाली असती. म्हणजे व्यक्तिचित्रणालाच अशा रचनेने एक तऱ्हेचा पायबंद पडला असता. गंगाधराखेरीज इतर पात्रें गौण व पूरक झाली असतीं, की त्या पात्रांत समाजाचीं विविध अंगें दर्शवून समाजचित्रण साधण्याचें सध्या जें सामर्थ्य आहे तें कमी झालें असतें. म्हणजे समाजचित्रणाचा हेतु पूर्णपणें साध्य झाला नसता. सध्या

कादंबरींतील समाजमीमांसा व विधायक विचारांचें कथन या गोष्टी डॉ. सरंजामे व प्रा. गोगटे यांच्या तोंडून होतात. गंगाधराचें व्यक्तिचित्रण केंद्रवर्ती झालें असतें तर ही समाजमीमांसा व हें विधायक विचारांचें कथन हीं होऊं शकलीं नसतीं. कारण तीं गंगाधराच्या व्यक्तिचित्रणाला पूरक नाहीत. म्हणजे समाजमीमांसा व विचारकथन या हेतूंनाहि हरताळ फासला गेला असता. थोडक्यांत म्हणजे, सौंदर्यवादी कादंबऱ्यांप्रमाणे विशिष्ट पात्राचें चित्रण केंद्र-वर्ती केल्याने केतकरांचा कोणताच बोध धड साध्य झाला नसता. विशिष्ट कथा केंद्रवर्ती केल्याने असाच परिणाम झाला असता, हें आतांपर्यंत अनुसरलेली विचारपद्धति लक्षांत घेतल्यास कळूं शकेल. अर्थात् ज्या बोधासाठीं कादंबऱ्या लिहावयाच्या त्या बोधालाच अडथळा करणारें रचनातंत्र केतकरांनी झुगारून दिलें व नवीन तंत्र अनुसरलें. या तंत्राप्रमाणे ते सर्व कादंबरी विशिष्ट विषयावर केंद्रित करीत. त्यामुळे बोधाच्या सर्व अंगांना कसा भरपूर वाव मिळे व कथाहि कशा सांगतां येत तें वर दिलेल्या ‘ परागंदे ’ च्या विवरणावरून उघड होतें.

‘ परागंदे’प्रमाणे प्रत्येक कादंबरी बोधहेतुमुळे कशी विषयनिष्ठ बनली तें पुनःपुन्हा सांगणें आवश्यक नाही. तेव्हा, यापुढे प्रत्येक कादंबरी विषयनिष्ठ कशी आहे, तेवढेंच दाखविलें आहे; पण बोधहेतूमुळे ती विषयनिष्ठ कशी बनली तें सांगितलेलें नाही.

## ११. ‘ ब्राह्मणकन्ये’ची रचनाः—

‘ब्राह्मणकन्ये’मध्ये ‘ अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंध ’ या विषयाला केंद्रस्थान मिळालें आहे. त्या कादंबरींतील नायिका कालिंदी ही रखेलीच्या मुलीपासून एका सभ्य सुधारकाला झालेली मुलगी असते. सर्व कादंबरींत कालिंदीची व कालिंदीच्या दोन भावंडांची जी कथा सांगितली आहे तीमध्ये अशिष्ट संबंधापासून झालेल्या अपत्यांचें भवितव्य कसें होतें, तें पाहावयास मिळतें. कालिंदी शिवशरण नामक अल्पशिक्षित लिंगायत व्यापाऱ्याची रखेली होते; त्यामुळे कालिंदी–शिवशरण या कालिंदीच्या कथेंतील प्रथमार्धात, रखेलीच्या जीवनावर प्रकाश पडतो. शिवाय, नातेवाइकांच्या कारवाईमुळे स्त्रीत्व नसलेल्या स्त्रीशीं शिवशरणचें लग्न झालेलें असतें व म्हणून तो कालिंदीला रखेली म्हणून ठेवण्यास तयार झालेल

असतो. तेव्हा शिवशरणमुळे, रखेली ठेवून अशिष्ट संबंध पतकरणाऱ्या पुरुषांच्या जीवनाचें एक अंगहि उजेडांत येतें. शिवशरणपासून दूर झालेली कालिंदी पुढे मुंबईस नोकरीसाठी जाते आणि रामराव या मजूर पुढाऱ्याशीं संबंध येऊन तिच्या कथेच्या द्वितीयार्धाला प्रारंभ होतो. कालिंदी शिवशरणपाशी रखेली म्हणून राहिलेली असते; तिला एक मुलगाहि झालेला असतो; पण तशा कलंकित अवस्थेंत रामराव तिचा स्वीकार करतो. त्यामुळे, द्वितीयार्धांत, अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंधाची एक निराळी तऱ्हा वाचकांच्या दृष्टीसमोर खेळत राहाते. रामरावाच्या अनुषंगानें करुणसुंदरीचा जो कथाभाग कादंबरींत येतो त्यांत वाङ्निश्चय झालेली स्त्री नियोजित पतीऐवजी अन्य पुरुषाशीं व्यवहार कां करते, तें दिग्दर्शित केलें आहे. कालिंदीचें पूर्ववृत्त स्पष्ट करण्यासाठी चिंतोपंत-मंजुळा व अप्पासाहेब-शांता यांच्या दोन छोट्या कथा कादंबरींत येतात. पैकी पहिल्या कथेंत, मंजुळा चिंतोपंतांची रखेली असल्यानें रखेलीच्या जीवनाचें दृश्य दिसतें आणि दुसऱ्या कथेंत, मंजुळेची मुलगी शांता अप्पासाहेबांची धर्मपत्नी होत असल्यानें रखेलीच्या मुलीचा संसार कसा होतो, तें दृष्टीस पडतें. कालिंदीनें लिहिलेल्या नानाभाई-उपेंद्रवज्रेच्या गोष्टींत विवाहपूर्व संबंध कां उत्पन्न होतात, या प्रश्नाचें उत्तर सापडतें. सत्यव्रत व एसतेर यांच्या उपकथेंत जातीबाहेर झालेल्या लग्नाचें एक उदाहरण दिसतें आणि उषा-बिनयामिन यांच्या कथेंत अनुनयाची संधि नसलेले तरुण कोणता मार्ग पतकरतात, तें उघड होतें. कादंबरींतील सर्व कथा, अशा रीतीनें ‘अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंध’ या एकाच विषयावर केंद्रित झाल्या आहेत.

या कादंबरींतील पात्रचित्रणावर नजर टाकिली तर असें दिसतें, की वैजनाथाखेरीज सर्व ठळक पात्रांचे स्वभाव व मनोव्यापार त्या त्या पात्रांच्या विशिष्ट परिस्थितीच्या चौकटींत फिरत आहेत आणि त्या परिस्थितीनें परिणाम पावलेले आहेत. ही परिस्थिति म्हणजे दुसरें तिसरें कांही नसून त्या त्या पात्रांचीं जीवनें किंवा कथा आहेत. या कथा ‘अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंध’ या विषयावर केंद्रित झालेल्या आहेत, हें नुकतेंच उघड झालें आहे; तेव्हा या कथांच्या व कथांनी व्यक्त झालेल्या परिस्थितीच्या चौकटींत फिरणारे पात्रांचे स्वभाव व मनोव्यापार त्याच विषयावर केंद्रित झाले आहेत, हें ओघानेच येतें. वैजनाथांचा स्वभाव परिस्थितिनिबद्ध नाही; तो स्वयंभू आहे; पण त्या स्वभावांत त्यांच्या विचारांचें

बीज आहे. ते विचार ‘ अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंध ’ या विषयावरच विदारक प्रकाश टाकतात. तेव्हा वैजनाथांचा स्वभावहि त्या विषयाकडे मोहरा वळवून बसलेला आहे, असें म्हणण्यास हरकत नाही.

कादंबरींतील बहुतेक सर्व समाजचित्रण कथा व पात्रें यांमधून व्यक्त झालेलें आहे. कथा व पात्रें ‘ अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंध’ या विषयावर केंद्रित झालेली असल्याने तें समाजचित्रणहि अर्थातच त्या विषयावर केंद्रित झालेलें आहे. फक्त रामरावामुळे जें गिरणीमजुरांचें, गिरणीमालकांचें व मजूरपुढाऱ्यांचें वर्णन कादंबरींत आलें आहे,[1] तें त्या विषयाला पूर्णपणें धरून नाही. त्यांत मजुरांमधील निराळी लैंगिक नीति व मजूरपुढाऱ्यांमधील “ पांडवधर्म ” यांचाच संबंध त्या विषयाशीं आहे व बाकीचा भाग आगंतुक आहे. एसतेरच्या वशिल्याने कादंबरींत घुसणारें बेने इस्रायलांचें वर्णनहि[2] त्या विषयाशीं पूर्ण असंबद्ध आहे.

समाजचित्रणासहच समाजमीमांसा येते; तेव्हा समाजचित्रण ‘ अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंधा ’च्या विषयाशीं जेवढें संबद्ध किंवा असंबद्ध आहे तेवढीच समाजमीमांसाहि आहे. समाजचित्रणासह न येणारी समाजमीमांसा वैजनाथ-स्मृतींत तेवढी दिसते. तींत विवाहसंस्था व नीतिविचार यांची मूलगामी पाहाणी झालेली आहे. तिचा रोख अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंधाबद्दल विधायक विचार सांगण्याकडे असल्याने ती त्या विषयाला पूरकच झाली आहे.

कादंबरींतील सर्व ठळक पात्रें विधायक विचार व्यक्त करण्यांत भाग घेतात आणि तीं आपापल्या परिस्थितीबद्दल विचार सांगतात. ती परिस्थिति ‘अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंधा ’च्या विषयाशीं निगडित असल्याने ते विचारहि आपोआप तसेच निगडित होतात. वैजनाथांची विचारसमृद्ध वैजनाथस्मृति तेवढी त्यांच्या परिस्थितीशीं निगडित नाही. पण ती स्मृति म्हणजे शिष्ट स्त्रीपुरुषसंबंधांतील न्यूनदर्शन, अशिष्ट स्त्रीपुरुषसंबंधाचें विवरण व त्यावर उपाययोजना यांवरचें एक व्याख्यान आहे. त्यामुळे ती कादंबरीच्या केंद्रभूत विषयाशीं निगडित होते. रामरावाचे मजुरांच्या सुधारणेबद्दलचे विचार, त्याची योजना व त्या

१. प्र. २३, पृ. १७५ ते १७७; प्र. २५, प्र. ३०. २. पृ. ५६ ते ६२, १५२, १५३, २२४ ते २२७.

योजनेवरील चर्चा यांमधील विचारकथन मात्र केंद्रभूत विषयाशीं मुळीच निगडित नाहीं.

कादंबरींतील सर्व ' ज्ञान ' स्फुट आहे. तें कादंबरीच्या इतर अंगांचा हात धरून चालत असतें. तेव्हा इतर अंगांप्रमाणे त्याची गति केंद्रभूत विषयाकडेच आहे. असो.

कांही समाजचित्रण व विचारकथन वगळतां सर्व कादंबरी ' अशिष्ट स्त्रीपुरुष-संबंध ' या विषयावर खिळून राहाते, हें एवढ्यावरून निश्चित निष्पन्न होतें.

## १२. ' गावसासू 'ची रचनाः--

' गावसासू ' ' परागंदे 'प्रमाणे विशिष्ट समाजसमूहावर केंद्रित झाली आहे. ' गावसासू ' या कथेंत " इंग्लंडमधील हिंदी मंडळींतील युद्धपूर्व परिस्थिति अंशरूपानें चित्रिली आहे " असें केतकर म्हणतात आणि तोच त्या कादंबरीचा विषय आहे.[१] त्यांतल्या त्यांत ' इंग्लंडमधील हिंदी मंडळींत असलेला स्त्री-पुरुषसंबंध ' या विषयावर कादंबरी केंद्रित होते. कादंबरींत कुसुमकलिकेच्या जामातशोधनाची एकमेव कथा आहे आणि ती इंग्लंडांतील हिंदी स्त्रियांच्या उद्योगाची द्योतक आहे. इंग्लंडमधील हिंदी मंडळींत विवाह जुळविण्यासाठी कोणकोणते प्रकार चालतात, तें त्या कथेंत दिसतें. कुसुमकलिकेची आई लिझी व एककवडी मैत्र यांच्या पूरक कथाभागांत इंग्लंडमधील खाणावळवाल्या बाया आपल्या पोरी हिंदी बॅरिस्टरांच्या गळयांत कशा बांधतात, तें दाखविलें आहे. लिझी व कुसुमकलिका यांच्या कथेचा जो भाग हिंदुस्थानमध्ये घडतो तोहि ' इंग्लंडमधील हिंदी लोकां 'च्या मूळ विषयाशीं चांगला संबद्ध आहे. इंग्रज मुलगी व तिला हिंदुस्थानांत घेऊन आलेला हिंदी मनुष्य ब्राह्मो समाजांत कां शिरतात; पुढे आपली मुलगी कशी उजवतात व ती मुलगी हिंदु समाजांत कशी प्रविष्ट होते, हें त्या कथाभागांत दिसून येतें. म्हणजे इंग्लंडमध्ये हिंदी विद्यार्थी ज्या परिस्थितींत सापडतात त्या परिस्थितीचे कांही परिणाम या कथाभागांत व्यक्त होतात. ८ व्या व ९ व्या प्रकरणांतील कुसुमकलिकेच्या गृह-स्थितीबद्दलचा कथाभाग प्रथमदर्शनीं मूळ विषयापासून तुटकलेला वाटतो; पण

१. गा. सा., प्रस्ता.

इंग्लंडांत जाणाऱ्या बायका कोणत्या गृहस्थितीमुळे तिकडे जाऊं शकतात, हें दाखविण्यासाठी त्याचा उपयोग झाला आहे, हें लक्षांत घेतलें म्हणजे त्याचा मुख्य विषयाशीं असलेला संबंध मनावर चटकन बिंबतो.

कादंबरींतील सर्व पात्राचित्रण कथेप्रमाणेच मूळ विषयावर अधिष्ठित आहे. धूम्रपान करणाऱ्या व फुकट सासूपणा गाजविणाऱ्या मिसेस कैलासनाथ म्हणजे युद्धपूर्व इंग्लंडमधील हिंदी मंडळींतला एक नमुना आहे. आय. सी. एस. विद्यार्थ्यांतून जावई पकडूं पाहाणारी कुसुमकलिका हा दुसरा नमुना आहे. —आणि चंदनानी, पूरणसिंग वगैरे विद्यार्थी म्हणजे उमदा व्रात्यपणा करणारे, वाकडें लैंगिक आचरण ठेवणारे इंग्लंडांतील नमुनेदार हिंदी विद्यार्थी आहेत. कादंबरीमध्ये कथेंतून व पात्रांतून व्यक्त होणारें व प्रत्यक्ष केलेलें समाजवर्णन[१] मूळ विषयाला सोडून दुसरीकडे गेलेलें दाखवितां येणार नाही. समाजमीमांसेची कथाहि तशीच आहे.[२] —आणि ' गावसासू 'च्या व्याख्यानामध्ये, इंग्लंडांत हिंदी मुली अधिकाधिक आणण्याचा जो विधायक विचार मांडला आहे, त्याचा प्रकारहि तोच आहे.

थोडक्यांत म्हणजे या कादंबरींतील प्रत्येक अंग 'इंग्लंडांतील हिंदी लोकां'च्या विषयावर केंद्रित झालें आहे आणि कादंबरी पूर्णपणें विषयनिष्ठ बनली आहे.

## १३ ' विचक्षणे'ची रचना.—

' विचक्षणे'मध्ये, प्रा. लोंढ्याचे विचार कसे बनले, तें सांगण्यासाठी कादंबरीचा सर्व प्रपंच केला आहे, असें विधान १ ल्या प्रकरणांत येतें. प्रा. लोंढ्यांच्या विचारांत " स्त्रीपुरुषसंबंधविषयक प्रश्नांचें बाहुल्य " होतें, असेंहि तेथे म्हटलें आहे. त्याप्रमाणे स्त्रीपुरुषसंबंधावरच ' विचक्षणा ' केंद्रित झाली असून तींत ' चाकोरीबाहेरचे स्त्रीपुरुषसंबंध ' हा विषय मुख्यतः विचारांत घेतला आहे. ' परागंदा ' व ' गावसासू ' या कादंबऱ्या ज्याप्रमाणे विषयदृष्ट्या सदृश आहेत, त्याप्रमाणे ' ब्राह्मणकन्या ' व ' विचक्षणा ' या कादंबऱ्याहि विषयदृष्ट्या सदृश आहेत.

---

१. पाहा, प्र. २ रें, पृ. १५५ ते १५७. २. पाहा, ' गावसासूचें व्याख्यान. '

'विचक्षणे 'मधील सर्व अंगें 'चाकोरी बाहेरील स्त्रीपुरुषसंबंधा'चें विविध दर्शन घडवतात. विचक्षणा–माधव यांच्या कथेंत मिळवती बायको व ऐदी, ओढाळ नवरा यांचा संबंध दिसतो. मधुमालती–संकर्षण यांची कथा अनुनयोत्तर पुनर्विवाह व कुलीन स्त्रियांचा सिनेमांत प्रवेश यांवर प्रकाश टाकते. मोतिलाल–रामप्यारी यांच्या कथेमुळे परपुरुषकृत पुत्रोत्पादनाचा विषय पुढे येतो. डॉ. तर्कटे व रंजिता यांच्या कथेंत रखेली ठेवणाऱ्या पुरुषाचें संसारचित्र व रखेली नी वेश्या यांचें जीवन यांबद्दल माहिती मिळते. बाळोबा–कृपा यांच्या कथेंत हिंदु–ख्रिश्चन या आंतरधर्मीय विवाहसंबंधाचा प्रश्न दृष्टी-समोर येतो. मंजुळा, चंदु नी तारा यांच्या कथांत अशिष्ट अपत्यें व कलावती स्त्रिया यांच्या जीवनाचा विचार होतो. सत्यबाला चौधरीच्या हकीगतींत कामगार पुढाऱ्यांमध्ये वावरणाऱ्या एका उनाड स्त्रीचा थोडा वृत्तांत कळतो. रावबहादुर खेडकरांच्या गोष्टींत वैवाहिक दृष्ट्या कुचंबणा झालेला व म्हणून वेश्या-कन्येलाहि मागणी घालूं पाहाणारा एक अस्पृश्य पाहावयास मिळतो.—आणि घाटे पतिपत्नींच्या कथानकांत रखेलीच्या संसाराचें एक विशिष्ट चित्र दृष्टोत्पत्तीस येतें. म्हणजे कादंबरींत जेवढ्या म्हणून लहानथोर कथा आहेत त्यांत मूळ विषयाचें एकेक वेगळें अंग दिसतें. पद्मनाभ–श्रीरंगाचार्य यांच्या विशिष्ट कथा कादंबरींत नाहींत; पण त्यांच्यामुळें गुरुसंस्थेचें बरेंच वर्णन कादंबरीमध्ये आलें आहे. त्या वर्णनाचा उपयोग विवाहसंस्थेंतील न्यूनें गुरुसंस्था कशी कौशल्यानें दूर करूं शकते, तें दाखविण्याकडे होतो. त्यांत, पुरुष जर पुत्रोत्पत्ति करण्यास असमर्थ असेल तर त्यानें आपल्या पत्नीच्या ठिकाणीं, अवश्य असल्यास, गुरू-कडून पुत्रोत्पत्ति करवून घ्यावी, असें प्रतिपादिलें आहे. म्हणजे पद्मनाभ-श्रीरंगाचार्य यांच्यामुळे येणारें वर्णन 'चाकोरीबाहेरील स्त्रीपुरुषसंबंधा 'ल धरूनच आहे.

कादंबरींतील सर्व पात्रांचे स्वभाव व मनोव्यापार आपापल्या कथेने वेष्टित आणि आपापल्या कथेने परिणाम पावलेले आहेत. त्यामुळे कथांबरोबर तेहि मूळ विषयाशीं निगडित होतात. कथा व पात्रें यांच्याबाहेर समाजचित्रण व समाजमीमांसा हीं सहसा कोठेहि जात नाहीत; तेव्हा कथा व पात्रें यांच्यासह तींहि मूळ विषयाला पोषक होतात. बाळोबाचे गिरणीकामगारांतील अनुभव व त्याचें 'नेबरहुड हाऊस 'मधील कामगार-जीवनावरचें व्याख्यान यांमध्ये

होणारें मजुरांचें समाजचित्रण मात्र मूळ विषयाशीं पूर्णपणें असंबद्ध आहे. कादंबरींत प्रा. लोंढे, डॉ. तर्कटे व पद्मनाभ यांच्या आश्रयानें बरेचसें विचार-कथन ( प्र. १, २, ४५, ४६, ४७, ४८ यांमध्ये ) झालें आहे. त्यांत विवाह-संस्था, गुरुसंस्था, नीति, कला वगैरे गोष्टींचा विचार होतो व त्याचें पर्यवसान ‘ चाकोरीबाहेरच्या स्त्रीपुरुषसंबंधा ’ तर म्हणजे मूळ विषयावर विधायक उपाय सुचविण्यामध्ये होतें. डॉ.तर्कट्यांनी तर्कटनीतींत अस्पृश्यता, पशुयाग यांसारख्या विषयांवर जें विचारकथन केलें आहे तें मात्र मूळ विषयाला अजीबात सोडून आहे. वल्लभसंप्रदायाची माहिती, तंत्रग्रंथ, बौद्ध व शाक्त पंथ इत्यादि कित्येक मुद्यांवर कादंबरींत फुटकळ ज्ञान विखुरलेलें आहे. त्यापैकी बराच भाग या ना त्या रीतीनें मूळ विषयाची कास धरून आहे. जरी हें ज्ञान मूळ विषयाला कुठे सोडून असलें तरी तें फुटकळच असल्यानें त्याची कांहीच मातब्बरी नाही.

एकंदरींत, ‘ ब्राह्मणकन्ये ’प्रमाणेच कांही समाजचित्रण व विचारकथन वगळतां, ‘ विचक्षणा ’ पूर्णपणें एका विषयावर केंद्रित झाली आहे.

## १४. ‘ आशावादी ’ची रचनाः—

‘ आशावादीं ’त विशिष्ट विषय केंद्रस्वरूप न होतां सूत्रस्वरूप होतो, हें मागे सांगितलें आहे. ‘ ब्रह्मगिरीं ’चें चरित्र, त्यांचे अनुभव, त्यांचे विचार वगैरे गोष्टी किंवा ‘ ब्रह्मगिरी ’ म्हणजे ‘ आशावादीं ’ तील विषयसूत्र होय. हें सूत्र केतकरांनी असें निवडलें आहे, की त्यांत त्यांच्या षड्विध बोधाला वाटेल तेवढा वाव मिळावा. ब्रह्मगिरी महाराष्ट्रांत, आफ्रिकेंत, युरोपांत व अमेरिकेंत हिंडून नाना समाज पाहून आलेले असतात; त्यामुळे समाजचित्रणाला वाव मिळतो. ब्रह्मगिरी व्याख्याते व तत्त्वज्ञ असल्यामुळे चर्चा, ज्ञानदान व विचार-कथन यांची सोय होते.—आणि ब्रह्मगिरींच्या आधारानें व्यक्तिचित्रण व मनो-विश्लेषण हीं करतां येतात, हें वेगळें सांगावयास नकोच. असे ब्रह्मगिरी सूत्रा-साठी निवडल्यानंतर त्या सूत्राला कादंबरींचे इतर बरेच भाग केतकरांनी जोडले आहेत. सूत्रांत मणि ओवल्याप्रमाणे केतकर हे भाग कधी सूत्राला जोडतात तर कधीं दोरीवर कपडे वाळत घातल्याप्रमाणे जोडतात. सूत्राचा व मण्यांचा किंवा दोरीचा व कपड्यांचा जेवढा संबंध असतो तेवढाच ब्रह्मगिरींचा व या भागांचा असतो.

—उदाहरणार्थ, सॉलिसिटर खरे, बॅ. सुतारे व बॅ. मोरे यांनी आपले विचार ब्रह्मगिरींना ऐकवले म्हणूनच ते ब्रह्मगिरींच्या सूत्राला चिकटले. गेंगणे–अलंकार–भोंगळवार यांनी ब्रह्मगिरींना नागपूरला व्याख्यानासाठी बोलाविलें म्हणून त्यांचीं व्यक्तिचित्रणें व त्यांच्या राष्ट्रीय पक्षाचें विशिष्ट वर्णन हीं कादंबरींत लटकूं शकलीं. कपिला ब्रह्मगिरींना एकदोनदा भेटली व त्यांच्याशीं बोलली म्हणूनच तिच्या विचारांना कादंबरींत स्थान मिळालें.—आणि लालनाथ–—नंदिका यांनी ब्रह्मगिरींना घरीं जेवावयास बोलाविलें, त्यांच्याशीं ओळख राखली व त्यांना एका अविवाहित स्त्रीच्या अपत्याचा प्रश्न सोडविण्यास सांगितलें म्हणूनच त्यांची सर्व कथा, नंदिकेच्या आईबापांच्या वृत्तान्तासह कादंबरींत ऐसपैस येऊन बसली. विश्वामित्र–विहंगमा, अलकनंदा व तिचा पति आणि परमानंद–पद्मावती यांचा ब्रह्मगिरींशीं कांहींहि संबंध येत नाही. तेव्हा त्यांच्याबद्दलचा कथाभाग ब्रह्मगिरींच्या सूत्रांत ओवला आहे, असें म्हणणें अशक्य ठरतें. विश्वामित्र-विहंगमेचा कथाभाग नंदिका–लालनाथाच्या कथाभागाशीं मात्र संबद्ध आहे. कारण नंदिका व विश्वामित्र यांचीं मनें परस्परांकडे आकृष्ट झालेलीं असतात. परमानंद–पद्मावतीचा कथाभागहि नंदिका–लालनाथाच्या कथाभागाशीं संबद्ध आहे. कारण नंदिका व परमानंद यांचीं मनें परस्परांकडे तशींच आकृष्ट झालेलीं असतात. अलकनंदेचा कथाभाग फक्त विश्वामित्र–विहंगमेच्या कथेशीं निगडित आहे. म्हणजे, नंदिका–लालनाथ, विश्वामित्र–विहंगमा, अलकनंदा नी तिचा पति आणि परमानंद–पद्मावती यांच्या उपकथांचे धागे एकमेकांत थोडेसे गुंतले आहेत; पण त्या सर्व उपकथांची गुंफण ब्रह्मगिरींच्या सूत्रांत झालेली नाही. फक्त नंदिका–लालनाथांची उपकथा ब्रह्मगिरींच्या सूत्रांत गुंफलेली आहे. या उपकथांची स्थिति अशी असल्याने त्यांमधील समाजचित्रण, विचारकथन वगैरे गोष्टी ब्रह्मगिरींच्या सूत्रापासून बहुंशीं निखळलेल्या आहेत, हें न सांगतां समजूं शकेल.

एकंदरींत ‘ आशावादी ’ची रचना विशिष्ट विषयाचें सूत्र घेऊन करावी, असा प्रयत्न केतकरांनी केला आहे; पण तो बऱ्याच ठिकाणीं अयशस्वी झाला आहे.

‘ आशावादी ’चा विषय आणि इतर पूर्वोक्त कादंबऱ्यांचा विषय यांमध्ये मूलभूत फरक आहे. पूर्वोक्त कादंबऱ्यांपैकी ‘ परागंदा ’ व ‘ गावसासू ’ यांचा

विषय ' अमेरिकेंतील हिंदी लोक ', ' इंग्लंडांतील हिंदी लोक ' यांसारखा विशिष्ट ' समाजसमूहा 'बद्दल आहे. ' ब्राह्मणकन्या ' व ' विचक्षणा ' यांचा विषय ' स्त्रीपुरुषसंबंध ' हा आहे. म्हणजे तो विशिष्ट विचारविभागाबद्दल, प्रश्नाबद्दल किंवा ' जीवनाच्या एका अंगा 'बद्दल आहे. पण ' आशावादी 'चा विषय त्या दोनहि प्रकारचा नाही. ' विशिष्ट व्यक्तीचें सर्वांगीण जीवन ' हा ' आशावादी 'चा विषय आहे.

येथे असें वाटण्याचा संभव आहे, की ' आशावादी ' विशिष्ट पात्राच्या चित्रणावर एखाद्या सौंदर्यवादी कादंबरीसारखी आधारलेली आहे. पण विशिष्ट पात्राचें चित्रण आणि त्याचें सर्वांगीण जीवन यांत फार फरक आहे. पात्रचित्रणांत स्वभावाच्या विविध व संबद्ध अंगांचें चित्रण अभिप्रेत असतें व त्याला पूरक तेवढाच प्रपंच केलेला असतो; पण सर्वांगीण जीवनाच्या वर्णनांत स्वभावाचीं सर्व अंगें असंबद्ध असूनहि अभिप्रेत असूं शकतात. शिवाय जीवनाचा ओघ कसकसा वळतो, हेंहि त्यांत दिसण्याची इच्छा असते; सर्व विचार त्यांत सामावतात आणि जीवनांतील सर्व घटना, अनुभव, निरीक्षण वगैरेंचाहि त्यांत समावेश होतो. तेव्हा विशिष्ट व्यक्तीच्या जीवनसूत्रांत गुंफलेली ' आशावादी ' कादंबरी पात्रचित्रणावर आधारलेल्या कादंबरीपेक्षा अगदी वेगळी होय. ब्रह्मगिरीच्या जीवनाबाहेरचा पुष्कळ भाग ' आशावादीं 'त घुसला आहे, हेंहि ती कादंबरी विशिष्ट पात्राच्या चित्रणावर आधारलेली नाही, असें म्हणण्यास आणखी एक कारण आहे. असो.

' आशावादी 'च्या विषयाचा ' आशावादी 'च्या रचनेशीं जो संबंध आहे तो उपर्युक्त कादंबऱ्यांपेक्षा भिन्न प्रकारचा आहे, हेंहि येथे पुनरुक्त करण्यास हरकत नाही. उपर्युक्त कादंबऱ्यांत विषय केंद्रस्वरूप आहे. कादंबरीचे सर्व भाग त्याला पूरक, पोषक व त्याचे दर्शक आहेत; पण ' आशावादीं 'त विषय सूत्रस्वरूप आहे. ब्रह्मगिरीच्या जीवनाच्या सूत्राला इतर भाग पूरक किंवा पोषक होत नाहीत. ते त्याचे दर्शनहि घडवीत नाहीत. ते त्याला फक्त जोडलेले आहेत. ' आशावादी 'च्या नमुन्याची रचना केतकरांच्या बोधहेतूला अधिक वाव देणारी आहे. परागंदादि कादंबऱ्यांप्रमाणे विषय केंद्रस्वरूप ठेवला तर बोध त्या विषयाला अनुरूप तेवढाच घालतां येतो. पण ' आशावादी '-प्रमाणे विषय सूत्रस्वरूप ठेवला तर विषयाला अनुरूप तेवढाच बोध घालण्याचें

बंधन राहात नाही. जो बोध करावयाचा असेल तो विषयाशीं कसाहि संबद्ध केला तरी चालतो. शिवाय प्रत्यक्ष विषयांतहि नाना प्रकारचा बोध करतां येतो, तें वेगळेंच.

## १५. 'भटक्या'ची रचनाः—

'भटक्या' कादंबरींत 'भटक्या'च कथाकथक आहे. 'भटक्या' आपलें चरित्र सांगत जातो व त्याच्या आधाराने आपले अनुभवहि सांगतो. त्याचें हें आत्मकथन म्हणजेच कादंबरीचें सूत्र होय. त्या सूत्राचें स्वरूप असें आहे, की त्यांत वाटेल तेवढा बोध घालतां येतो. 'भटक्या' बालपणापासून भटकतो, स्वामीचा शिष्य होतो, वाण्याकडे नोकरी करतो, डॉक्टरचा हरकाम्या बनतो, एक बायको मेल्यावर कालांतराने दुसरें लग्न करतो, इलेक्शन एजंटची भूमिका वठवतो, संपादक होतो, मेसापोटेमियांत महायुद्धावर जातो आणि गांधींच्या चळवळींतहि भाग घेतो. तेव्हा नाना प्रकारचें समाजचित्रण, विचारकथन वगैरे गोष्टींना वाटेल तेवढीं विविध क्षेत्रें त्याच्या आत्मकथनांतच उपलब्ध होतात. शिवाय, आत्मकथनाच्या सूत्रांत आपणाला मिळालेली ऐकीव माहितीहि तो ओतत जातो. उदाहरणार्थ, संस्थानांतील माहिती त्याला डॉ. घैसासांकडून झालेली असते आणि सामायिक पति करण्याची एक मजेदार घटना त्याला नर्मदाबाई सरवट्यांकडून कळलेली असते. ही ऐकीव माहिती मूळ सूत्रांत ओवण्याच्या पद्धतीने बोधाचें क्षेत्र आणखी विस्तृत होतें. विशिष्ट व्यक्तीचें जीवन हा विषय घ्यावा व त्या विषयाच्या सूत्रांत अनेक गोष्टी बोधासाठी गोवाव्या, हें तंत्र 'आशावादी' व 'भटक्या' यांत सारखेंच आहे. मात्र 'भटक्या'मध्ये ज्याचें जीवन सूत्रभूत होतें तोच मनुष्य कथा सांगतो; त्यामुळे सूत्राशीं अजिबात असंबद्ध असा भाग 'आशावादी'प्रमाणे 'भटक्यां'त मुळीच येत नाही. बाकी, विषयाचे बाबतींत इतर कादंबऱ्यांहून 'आशावादी'चा जो वेगळेपणा आहे तोच 'भटक्या'चा आहे.

## १६. 'प्रियंवदे'चें रचनावैशिष्ट्यः—

'प्रियंवदा' ही केतकरांची पहिली कादंबरी तेवढी विषयनिष्ठ दिसत नाही. तींत कोणताहि एक विषय केंद्रस्वरूप झालेला नाही; किंवा सूत्रस्वरूपहि

झालेला नाही. तींत रामभाऊ-प्रियंवदा, वैजनाथ-शारदा व हरिभय्या-बिंबा यांच्या तीन मुख्य कथा असून शशिपाद-आयडाची एक छोटी पोटकथा रामभाऊ-प्रियंवदेच्या कथेंत आली आहे. या चार जोडप्यांच्या चार कथा 'स्त्री-पुरुषसंबंध' या विषयावर आधारलेल्या आहेत, असें म्हणतां येईल. कारण रामभाऊ-प्रियंवदेच्या कथेंत पत्नीनें ( विरही ) पतीचें आकर्षण कसें करावें, त्याचा वस्तुपाठ दिला आहे. वैजनाथ—शारदा यांच्या कथेंत मिळवत्या स्त्रीचा ध्येयवादी व अर्थोत्पादन न करणाऱ्या पुरुषाशीं विवाह जमविला आहे आणि हरिभय्या-बिंबा यांच्या कथेंत सहवासोत्तर पुनर्विवाहाचें प्रायोगिक चित्रण केलें आहे. शशिपाद-आयडा या कथेंतहि हिंदी तरुण व इंग्रज मुलगी यांच्या विवाहसंबंधाची चर्चा होते. पण या कथांत जरी एकच विषय असा पाहातां आला तरी सर्व कादंबरींत तो विषय पाहाणें अशक्य आहे.

बंडूनाना घरकुट्यांची एक कथा कादंबरींत रामभाऊ-प्रियंवदादि कथांच्या खांद्याला खांदा लावून प्रमुखपणें वावरते;पण तींत स्त्रीपुरुषसंबंध हा विषय मुळीच नाही. तींत सिरोंचाची तहशिलदारी व भोसला-विजय-भिल्स यांनीच यच्चयावत् भाग अडविला आहे. अनंतराव घरकुट्टे, होरमसजी पेनांगवाला व पुतळी या तीन दुय्यम पात्रांच्याभोंवती जो कथाभाग एकवटतो तोहि सर्वस्वीं 'स्त्रीपुरुषसंबंधा'-विषयी नाही. त्यांतील कांही अंश स्त्रीपुरुषसंबंधावर तर कांही इतर विषयावर रोखलेला आहे. कादंबरींत जें नागपूरकडील ब्राह्मणांचें, स्थलांचें, लाचलुचपतीचें वगैरे चित्रण झालें आहे त्याचा संबंध तर स्त्रीपुरुषसंबंधाच्या विषयाशीं लागणें कल्पनेच्या पलीकडचें आहे. वैजनाथ-शारदा यांच्या संवादांत अनेक विषयांची चर्चा येते. तींत इतिहाससंशोधन, स्पिरिच्युअल शब्दाचा अर्थ, मनुष्याला विदेही बनविणाऱ्या ध्येयवादाचें मूळ इत्यादि विषय येतात. त्या विषयांचा संबंधहि स्त्रीपुरुषसंबंधाशीं जोडणें फार कठिण जाईल. कादंबरीची रचना विशिष्ट विषयावर केंद्रित झालेली नाही, हाच याचा अर्थ होय.

स्त्री-पुरुषसंबंध हा विषय असा केंद्रस्वरूप तर होत नाहीच, पण तो सूत्रस्वरूप झाल्याचेंहि दिसत नाही. त्या विषयाला सूत्र म्हणावें तर त्या सूत्राशीं रामभाऊ-प्रियंवदादि जोडप्यांच्या तीन कथा निगडित दिसतील; पण बंडूनानांची कथा व अन्य भाग निगडित दिसणार नाहीत. त्या तीन कथांनाच सूत्र म्हणावें तर तीन समकालीन बरोबरीच्या कथांना सूत्र म्हणणें अप्रयोजक वाटतें. बरें

त्यांना सूत्र म्हटलें तर त्यांच्याचसारख्या चौथ्या कथेला मणि कां म्हणावें, याला उत्तर नाही. तेव्हा विषयसूत्र कादंबरींत नाही, याच निर्णयाला यावें लागतें.

ही कादंबरी 'परागंदे'प्रमाणे विशिष्ट समाजसमूहावर लिहिलेली आहे, नागपुरी समाज हा तिचा विषय आहे, असें म्हणूनहि निभाव लागत नाही. कारण कादंबरींतील कांही कथाभाग इंग्लंडमध्ये घडतो; वैजनाथांसारखें महत्त्वाचें पात्र नागपूरकडचे रहिवासी नाही आणि प्रियंवदा, रामभाऊ, वैजनाथ शारदाबाई हीं पात्रें नी त्यांच्या कथाहि खास नागपुरी नाहीत. तशा कथा व तशीं पात्रें सोलापूर–कोल्हापूरकडे किंवा मुंबई–पुण्याकडे अगदी नैसर्गिकपणें शोभून दिसूं शकतील. कादंबरींतील सर्व स्थलवर्णनें, बरींचशीं समाजवर्णनें व बंडूनाना, हरिभय्या, बिंबा हीं पात्रें मात्र खास नागपुरी आहेत; पण इतर बऱ्याच गोष्टी तशा नसल्याने कादंबरी नागपुरी जीवनाच्या विषयावर केंद्रित केली आहे, असें म्हणतां येत नाहीं. तो विषय फारच तुटपुंजा व त्रोटक असल्यामुळे त्याला सूत्र म्हणणेंहि शक्य नाही. या कादंबरीचा विषय विशिष्ट 'मनुष्यसमूहाचा आयुष्यक्रम' हा आहे, असें केतकरांनी एका ठिकाणीं ध्वनित केल्यासारखें वाटतें.[1] पण 'प्रियंवदें'त "समूहाचा आयुष्यक्रम" मुळीच प्रतीत होत नाही. तो 'परागंदें'त होतो; किंवा 'गावसासूं'त होतो. 'प्रियंवदें'त अनेक 'व्यक्तीं'चा आयुष्यक्रम दिसतो आणि त्या व्यक्तींत असें कांही समान वैशिष्ट्य नाही, की ज्यामुळे त्यांचा 'समूह' वेगळा जाणवावा. तेव्हा कांहीहि समान वैशिष्ट्य नसणाऱ्या कांही व्यक्तींच्या आयुष्यक्रमांना केतकर "मनुष्य-समूहाचा आयुष्यक्रम" म्हणतात, हें चूक होय. शिवाय, जो अनेक व्यक्तींचा आयुष्यक्रम दिसतो त्याला 'विषय' ही संज्ञा देणें कठिण आहे. कारण 'विषय' या संज्ञेने कांही एकजिनसी व संबद्ध कल्पना प्रतीत होते.

सारांश 'प्रियंवदा' विषयनिष्ठ आहे, असें कोणत्याहि रीतीने ठरूं शकत नाही. ती केतकरांची पहिलीच कादंबरी असल्याने तींत विषयनिष्ठ रचनेचें केतकरी तंत्र आलें नसावें, असें वाटतें.

---

१. परागंदेची प्रस्तावना.

## १७. बोधहेतु व तत्त्वनिष्कर्षणात्मक किंवा तात्पर्यात्मक भागः–

बोधहेतूमुळे केतकरांच्या कादंबऱ्यांची रचना विषयनिष्ठ झाली, हें आतापर्यंत पाहिलें. बोधहेतूमुळे केतकरांच्या कादंबऱ्यांत कांही तत्त्वनिष्कर्षणात्मक किंवा तात्पर्यात्मक भाग आणला जातो, हा बोधाचा रचनेवरील आणखी एक परिणाम होय. सर्व कादंबरीभर कांही समाजवर्णन, कांही समाजविश्लेषण, कांही विचारकथन केतकरांनी केलेलें असतें. पण तें कथा–पात्रादींच्या माध्यमांतून बरेचसें झाल्यामुळे विकीर्ण व अप्रत्यक्ष असतें. तें एकत्रित, सुसंबद्ध व प्रत्यक्ष व्हावें अशी केतकरांची इच्छा असते. त्यामुळेच हा तत्त्वनिष्कर्षणात्मक भाग कांही तरी युक्तीने ते कादंबरींत आणतात.

'प्रियंवदे'मध्ये त्यांचें तंत्र विकसित झालें नसल्यामुळे असा भाग ठळकपणें प्रतीत होत नाही. पण त्याचीं बीजें तींत निश्चितपणें दिसतात. "भग्न देवालयाच्या परिसरांत"[1] हरिभय्या–बिंबा यांचा जो मीलनोत्तर संवाद होतो त्यांत असा तात्पर्यात्मक भाग दिसतो. हरिभय्या–बिंबा यांच्या सहवासोत्तर विवाहाबद्दलचे सर्व विचार त्यांत मांडले जातात. बिंबाने प्रश्न विचारावे व हरिभय्याने त्यांना उत्तरें द्यावीं, अशी प्रश्नोत्तरपद्धतीची युक्ति योजून ते विचार मांडले आहेत. 'प्रियंवदे'मध्ये हरिभय्या–बिंबा यांच्या कथेखेरीज ज्या इतर कथा आहेत, त्यांचें तात्पर्य मात्र अशा रेखीवपणें व ठळकपणें कोठे काढलेलें नाही.

'परगंदें'त २३व्या प्रकरणामध्ये प्रा. गोगटे सेटलर्स असोसिएशनच्या व्यवहारनीतीचें विधान करतात व कादंबरींतल्या बऱ्याचशा बोधाचें तात्पर्य त्या विधानांत व त्यावरील गजपतरायांच्या भाष्यांत येऊन जातें. सेटलर्स असोसिएशनच्या व्यवहारनीतीच्या विधानाचा प्रसंग तात्पर्यकथनासाठीच कादंबरीच्या रचनेंत आणला आहे.

'परागंदे' इतकें समावेशक तात्पर्यकथन 'आशावादी'मध्ये नाही. पण 'वीस वर्षांचा हिशेब' या ३७ व्या प्रकरणांत ब्रह्मगिरींच्या आशावादाची विविध कारणमीमांसा केली जाते, 'आशावादी कीं प्रवाहपतित' या ३८ व्या प्रकरणांत

---

१. प्र. १६.

त्यांच्या प्रवाहपतितत्वावर प्रकाश पडतो आणि ब्रह्मगिरींच्या जीवनाचें तात्पर्यकथन उरकलें जातें. ब्रह्मगिरींना आत्मपरीक्षण व सिंहावलोकन करावयास लावून त्याच्या आधारें हें तात्पर्यकथन साधलें आहे. "आशावादी अथवा एका प्रवाहपतिताचें चरित्र" या कादंबरीनामाचें त्यांत स्पष्टीकरण होतें, हें उघड आहे. ब्रह्मगिरींच्या चरित्राखेरीज ज्या लालनाथनंदिकेसारख्या अन्य कथा कादंबरींत येतात, त्यांचें तात्पर्य मात्र कोठे काढलेलें ठळकपणें दिसत नाही.

'ब्राह्मणकन्ये'मध्ये वैजनाथांचें स्वतंत्र पात्रच कादंबरीचें तात्पर्य मांडण्यासाठी आयात केलें आहे. वैजनाथ अप्पासाहेब डग्गयांच्या प्रश्नांना उत्तरें देतात, 'वैजनाथस्मृति' नामक स्मृति लिहितात व त्यांमध्ये हें तात्पर्य येऊन जातें.[1] अप्पासाहेब डग्गे व सत्यव्रत यांच्यापुढील जातिभेदोन्मूलनाचा प्रश्न, कालिंदी-पुढील अकुलीन स्त्रीच्या भवितव्याचा प्रश्न, रामरावापुढील ध्येयजीवी मनुष्याच्या अविवाहितपणाचा प्रश्न वगैरे सर्व प्रश्नांचें स्वरूप व त्यावरील उपाय वैजनाथांच्या मुखांतून 'उद्गीर्ण' होतात. ज्या सामाजिक परिस्थितीच्या पेचांत अप्पासाहेब, कालिंदी, रामराव वगैरे पात्रें कादंबरीमध्ये वावरतांना दिसतात त्या सामाजिक परिस्थितीची मीमांसा वैजनाथांनी केली आहे.

'गावसासू'मध्ये 'गावसासूच्या व्याख्याना'चा प्रसंग[2] उत्पन्न करून केतकर तात्पर्यकथनाचा मोका साधतात. त्या प्रसंगीं विशेषतः मिसेस कैलासनाथांचें मुख्य भाषण व पूरणसिंगाचें पूरक भाषण यांमध्ये कादंबरीचें सार येऊन जातें. मिसेस कैलासनाथांच्या भाषणांत इंग्लंडमधील विद्यार्थि-वर्गाचें समाजचित्रण साररूपानें येतें आणि पूरणसिंगाच्या भाषणांत विद्यार्थ्यांच्या स्वैराचाराची मीमांसा व त्यावरील उपाययोजना हीं प्रकट होतात.

'विचक्षणे'त तात्पर्यकथनासाठी 'ब्राह्मणकन्ये'मधील युक्तीसारखीच युक्ति योजिली आहे. 'ब्राह्मणकन्यें'त वैजनाथांनी 'वैजनाथस्मृति' लिहिली आहे तर 'विचक्षणे'त डॉ. तर्कट्यांनी 'तर्कटनीति' लिहिली आहे. मात्र 'वैजनाथ-स्मृती'ला पुरवण्या नसल्या तरी तर्कटनीतीला पुरवण्या आहेत. प्रा. लोंढे तर्कट-नीतीला पहिली पुरवणी जोडतात आणि पद्मनाभ दुसरी पुरवणी जोडतो. या पुरवण्या व मूळ तर्कटनीति यांत कादंबरीचें सर्व तात्पर्य दिलें आहे. तात्पर्य-

---

१. प्र. २७, ३४, ४३. २. प्र. २८.

कथानासाठी कादंबरीच्या रचनेंत फरक करण्याचें तंत्र ' विचक्षणें'त कळसाला पोचलें आहे असें म्हणतां येतें. इतर कादंबऱ्यांत तात्पर्यकथनाचें सूतोवाच कादंबरीच्या शेवटीं शेवटीं होतें; पण ' विचक्षणें'त तें अगदी प्रारंभींच झालें आहे. प्रा. लोंढ्यांचे विचार कसे विकास पावले, तें सांगण्यासाठीच सर्व कादंबरी लिहिली आहे, असें केतकर १ ल्याच प्रकरणांत सांगतात. पुढे कादंबरींतला सर्व कथाभाग प्रा. लोंढ्यांच्या अवलोकनकक्षेंत आलेला त्यांनी दाखविला आहे व शेवटीं त्या अवलोकनावरून त्यांनीं आपली विचारमालिका कशी बनविली तें दिलें आहे. म्हणजे सर्व कादंबरी तात्पर्यकथनावर दृष्टि ठेवून लिहिली जाते. तात्पर्यकथन अधिक समावेशक व्हावें म्हणून तीन पात्रांचा उपयोग केतकर या कादंबरींत करतात. डॉ. तर्कटे, प्रा. लोंढे व पद्मनाथ हींच तीं तीन पात्रें होत. त्यांनी आपापल्या अवलोकनक्षेत्राप्रमाणे ' बोधा'चें तात्पर्य काढलें आहे व तें प्रा. लोंढ्यांनी एकत्र केलें आहे. ' गावसासू 'त दोन पात्रें तात्पर्यकथन करतात; पण बाकी सर्व कादंबऱ्यांत एकाच पात्राच्या तोंडून बहुतेक तात्पर्यकथन झालें आहे. तेव्हा, तीन पात्रांनी आपापल्या अवलोकनक्षेत्राप्रमाणे जींत तात्पर्यकथन केलें आहे ती ' विचक्षणा ' वैशिष्ट्यपूर्ण म्हणावयास हरकत नाही.

' भटक्या ' ही एकच कादंबरी तात्पर्यात्मक भाग नसलेली आहे. 'भटक्या' अपूर्ण असल्यामुळे तात्पर्यात्मक भाग आला नाही, असें मात्र नाही. ' भटक्यां 'तील सर्व बोध स्फुट, विविध व वेगवेगळा आहे. त्यामुळे त्याचें एकत्र तात्पर्य देणें अशक्य होतें. त्या अशक्यतेमुळे ' भटक्या 'मध्ये तात्पर्यकथनाचें तंत्र वापरलेलें नाही.

## १८. बोधहेतु व एकात्मतेचा अभावः—

बोधामुळे आणखी एक असा महत्त्वाचा परिणाम झाला आहे, की कादंबऱ्यांच्या रचनेंत एकात्मतेचा गुण फारसा उरलेला नाही. बोधाचीं अनेक अंगें व कादंबरी या वाङ्मयप्रकाराचीं अनेक अंगें यांतच अंगभूत भिन्नता असल्यामुळे एकात्मता कमी होते. बोधांतील व्यक्तिचित्रण व मनोविश्लेषण हीं अंगें कादंबरी या वाङ्मयप्रकाराचींच अंगें होत. त्याशिवाय कथा हें कादंबरीचें आणखी एक महत्त्वाचें अंग आहे. या तीन अंगांत सौंदर्यगुण ओतप्रोत भरलेला असतो आणि तीं वाचकाच्या नानाविध

भावनांची सुखद तृप्ति करतात. पण समाजचित्रण, समाजमीमांसा, विचारकथन व ज्ञानदान या बोधाच्या चार अंगांत सौंदर्यगुण फारच थोडा असतो. तीं अंगें अगदी अल्प प्रमाणांत व कथापात्रादि अंगांना पूरक व पोषक म्हणून आलीं तरच सौंदर्यवर्धन करूं शकतात. पण केतकरांच्या कादंबऱ्यांप्रमाणे त्यांनाच प्राधान्य मिळालें तर त्यांच्यामध्ये सौंदर्यगुण फारसा राहात नाही. तीं वाचकाच्या भावनांची सुखद तृप्ति करण्याऐवजी कित्येकदा त्या तृप्तीच्या-आड येतात व भावनेपेक्षा बुद्धीला आवाहन देतात; बुद्धीला चालना देतात व बुद्धींत तशी कुवत असेल तर तिची तृप्ति करतात. बोधाचीं कांही अंगें व कादंबरी या वाङ्मयप्रकारांचीं अंगें अशीं मूलतः भिन्न असतांना तीं केतकरांच्या कादंबऱ्यांत एकत्र येतात व एकात्मतेचा बिघाड होण्यास महत्त्वाचें कारण उत्पन्न होतें.

हीं भिन्न अंगें विशिष्ट विषयावर केंद्रित करून केतकर चार कादंबऱ्यांत, त्यांच्यामध्ये कांही समान बंधन उत्पन्न करतात; पण समानबंधनत्व म्हणजे संपूर्ण एकात्मता नव्हे. तो एकात्मतेचा प्रारंभ आहे. शिवाय, हें एका विषयाचें समानबंधनत्वदेखील अनेकदा तुटून गेलेलें आहे. उदाहरणार्थ 'ब्राह्मणकन्ये'-तील गिरणजगाचें व बेनेइस्रायलांचें समाजवर्णन, तत्संबद्ध समाजमीमांसा आणि रामरावाचे विचार यांत विषयाचें समानबंधन झुगारलेलें आहे. 'विचक्षणे'मधील गिरणजगाचें समाजचित्रण, ख्रिश्चनांचें समाजचित्रण व डॉ. तर्कश्यांचे कांही विचार यांतहि तें बंधन धुडकावलेलें आहे. बोधाच्या अतिरिक्त हव्यासाचाच हा परिणाम होय. बोधामुळे विषयाचें 'समानबंधन' जर असें तुटतें तर 'एकात्मते'च्या गुणाचीहि त्यामुळे छकलें उडतात हें उघड आहे.

जेव्हा बोध व कादंबरी यांचीं भिन्न अंगें एकाच विषयावर केंद्रित होतात व त्यांत समानबंधन असतें, तेव्हाहि त्या अंगांत एकात्मता उत्पन्न होण्यासाठी भरपूर अन्योन्याश्रय असला पाहिजे. पण बोध करण्यावर केतकरांचें लक्ष खिळलेलें असल्यामुळे ते असा अन्योन्याश्रय उत्पन्न करण्याकडे दुर्लक्ष करतात. उदाहरणार्थ, 'परांगदा,' 'ब्राह्मणकन्या' व 'विचक्षणा' यांमधील तात्पर्यात्मक भागांत जो बोध येतो त्या बोधाचा कथापात्रादि अंगांशीं अन्योन्या-श्रय जमलेला नाही. तीं दोनहि एकाच विषयावर बहुंशीं केंद्रित झालेलीं

असूनहि हा अन्योन्याश्रय जमत नाही. ‘ परागंदें’त ‘ परागंदा व तत्वज्ञान ’ या प्रकरणामध्ये तात्पर्यात्मक भाग येतो. त्या भागातील बोध जरी कादंबरींतून गाळला तरी कादंबरींतील कथा व पात्रें यांच्यांत यत्किंचित्‌सुद्धा बदल होणार नाही किंवा तीं कुठे उणावणार नाहीत. फार तर प्रो. गोगट्यांचें एकमेव पात्र त्यामुळे किंचित् अंधुक होईल. बोध समजण्याला कथा व पात्रें यांची आवश्यकता आहे, यांत शंका नाही. म्हणजे, बोधाला कथा–पात्रांचा आश्रय आहे पण कथा–पात्रांना बोधाचा आश्रय नाही. म्हणजेच त्यांत अन्योन्याश्रय नाही. ‘ ब्राह्मणकन्यें’त सर्व बोधाचें तात्पर्य काढण्याचें काम वैजनाथांकडे जातें. पण कादंबरींतील बहुतेक कथाभाग संपत आल्यावर वैजनाथ कादंबरींत येत असल्याने त्यांच्या बोधाचा कथेवर किंवा पात्रांवर कांहीहि परिणाम होत नाही. वैजनाथांना कादंबरींतील अप्पासाहेब डग्गे व सत्यव्रत हीं दोनच दुय्यम पात्रें ओळखतात आणि त्या दोघांच्या विचारांवर वैजनाथांच्या बोधाचा फार तर कादंबरी संपतां संपतां परिणाम झाला असेल; पण तो बोध अन्यत्र कोठेहि, कांहीहि कार्य करीत नाही. तो बोध गाळला तर कथेला थोडादेखील धक्का लागणार नाही आणि वैजनाथांखेरीज सर्व पात्रें शाबूत राहातील. तो बोध कथापात्रांना असा आश्रयभूत नाही; मात्र कथापात्रें हाच त्याचा आश्रय आहे. तेव्हा हा आश्रय एकतर्फी आहे; हा अन्योन्याश्रय नव्हे, हें उघड आहे. ‘ विचक्षणें’तील तर्कटनीति व तिच्या पुरवण्या कादंबरीच्या शेवटीं येत असल्याने त्यांची स्थिति साहजिकच तंतोतंत अशी आहे. बोधाच्या तात्पर्यात्मक भागाच्या या स्थितीप्रमाणे अन्य भागाची स्थिति नाही; पण तो भागहि कधीकधी कथापात्रांशीं अन्योन्याश्रयाने निगडित होत नाही. उदाहरणार्थ, ‘ गावसासूं ’-तील ‘ मिसेस रॉबर्टसनचें बोर्डिंग हाऊस ’ या प्रकरणांत जें समाजवर्णन येतें तें कोणत्याहि कथेला व पात्राला आवश्यक नाही.

बोध आणि कथापात्रें यांत अन्योन्याश्रम नसल्यास एकात्मतेची हानि होते; त्याचप्रमाणे भिन्न भिन्न कथा जर अन्योन्याश्रयी नसतील, परस्परपूरक नसतील किंवा कथादृष्ट्या संबद्ध नसतील तर त्यामुळेहि एकात्मतेची हानि होते. केतकर विशिष्ट विषयाचा बोध करण्यासाठी जेव्हा कादंबरी लिहितात तेव्हा त्याच विषयावर कादंबरीचीं सर्व अंगें रोखण्याकडे त्यांचें लक्ष लागतें व ते या गोष्टीकडे पुरेसें लक्ष पुरवीत नाहीत. त्यांच्या कादंबऱ्यांतील कथांचा संबंध

एकात्मतेच्या दृष्टीने बऱ्याच ठिकाणीं कसा ढिला आहे, तें पुढे सविस्तर दाखविलें जाईल.

ज्या कादंबऱ्यांत बोधाला केंद्रस्थान मिळालें आहे त्या कादंबऱ्यांना उद्देशून आतापर्यंतचें एकात्मतेसंबंधी विवेचन झालें. ज्या कादंबऱ्यांत बोधाला सूत्रस्थान मिळतें त्या कादंबऱ्यांचा विचार केला तर त्यांची स्थिति एकात्मतेच्या दृष्टीने अधिक शोचनीय दिसते. त्या कादंबऱ्यांत विशिष्ट व्यक्तीचें जीवन सूत्रस्थानीं येतें आणि तो विषयच कमी एकात्म आहे. उदाहरणार्थ, 'आशावादीं'तील ब्रह्मगिरींच्या जीवनांत आफ्रिका, नेपल्स वगैरे ठिकाणचे काममोहित होण्याचे प्रसंग आहेत, इंग्लंड–हिंदुस्थानांतील मजुरांच्या जीवनाचे अनुभव आहेत, संन्याश्याच्या जीवनाचा अनेकांगी विचार आहे आणि आशावादाच्या प्रवर्तनाची खटपट वगैरे गोष्टी आहेत. या सर्व गोष्टी ब्रह्मगिरीच्या जीवनाशीं निगडित असल्या तरी त्याव्यतिरिक्त त्यांचा परस्परसंबंध जवळ जवळ कांहीच नाही. 'भटक्या 'मधील ' भटक्या 'च्या जीवनांत अशाच गोष्टी आहेत; कोकणांतील समाजाचें वर्णन व मेसापोटेमियांतील युद्धभूमीचेंहि वर्णन आहे; आणि या गोष्टी 'भटक्या'च्या जीवनाशीं निगडित असल्यामुळेच परस्परसंबद्ध आहेत. बाकी त्यांच्यामध्ये कांहीहि संबंध नाही. सूत्रस्थानीं असलेला विषय असा मुळांतच कमी एकात्म असल्याने या कादंबऱ्यांची एकात्मता साहजिकच कमी होते. पुढे, सुत्रभूत विषयाशीं केतकरांनी वाटेल त्या बोधाला, कथांना व पात्रांना चिकटविलें आहे. या चिकटवाचिकटवींत अन्योन्याश्रय, पूर्यपूरकभाव वगैरे कांहीच नाही, हें पूर्वी स्पष्ट केलें आहे. तेव्हा एकात्मता कमी होण्यांत त्या कारणाची आणखी एक भर पडते. कित्येकदा सूत्रभूत विषयाला अन्य गोष्टी न चिकटवितांच त्या केतकर कादंबरींत आणतात. 'आशावादी'च्या पूर्वोक्त विवरणांत तें उघड झालें आहे. तशा न चिकटविलेल्या गोष्टी म्हणजे तर एकात्मतेला फासलेला हरताळ होय. विषयाला सूत्रस्थान देऊन कादंबरीची रचना करण्यांत केतकरांना बोधासाठी अधिक वाव मिळाला, हें खरें. पण त्यामुळे एकात्मतेची अशी पीछेहाट झाली.

कादंबऱ्यांची विषयनिष्ठता, तात्पर्यात्मक भागाचा प्रवेश आणि एकात्मतेची हानि हे बोधहेतूचे रचनेवरील तीन परिणाम आतापर्यंत सांगितले. व्यक्ति-चित्रण, कथांची व्यक्तिशः रचना वगैरे गोष्टींवरहि बोधाचे खोल परिणाम

झालेले आहेत. पण त्यांचा विचार त्या त्या गोष्टींच्या विवरणांत करणें सोयीचें असल्याने तो तेथेच केला आहे.

## १९. समाजवर्णन व ज्ञानदान यांचा वाचकांवरील परिणामः–

सौंदर्यदर्शनाच्या हेतूने लिहिलेल्या कादंबऱ्यांनी वाचकांवर जो परिणाम होतो त्याहून भिन्न परिणाम बोधाच्या हेतूने लिहिलेल्या व बोधबहुल झालेल्या केतकरांच्या कादंबऱ्यांनी होतो. तो परिणाम बराच संमिश्र स्वरूपाचा असल्यामुळे त्याच्या एकेका अंगाचा विचार केला पाहिजे.

केतकरांच्या कादंबऱ्या समाजवर्णनांनी किती भरलेल्या आहेत तें पूर्वी दाखविलें आहे.[1] हीं समाजवर्णनें वाचीत असतां वाचकाला इंग्लंड-अमेरिकेंतील हिंदी लोकांची माहिती मिळते; नागपुरी व पुणेरी समाजाची ओळख होते; बेनेइस्रायल, पार्शी, वाणी वगैरे कित्येक जातींचा परिचय होतो; सुधारक, प्रार्थनो, मजूर वगैरे अनेक वर्ग दृष्टीस पडतात; कुटुंबांचे तर इतके प्रकार पाहावयास सापडतात की त्यांना तोडच नाही. शिवाय वेश्या, रखेल्या, अकुलीन अपत्यें, जगाच्या पाठीवरील अनेक ठिकाणचे लैंगिक आचार इत्यादींच्या नाना तऱ्हा ठाऊक होतात – आणि कितीतरी सामाजिक गोष्टी कळतात. त्यामुळे वाचकाच्या ज्ञानांत सारखी भर पडत जाऊन त्याला ज्ञानाचा आनंद अनुभवितां येतो. वाचक कितीहि बहुश्रुत असला तरी केतकरांनी सांगितलेल्या सर्व सामाजिक गोष्टी त्याला ठाऊक असणें अशक्यप्राय आहे आणि सामान्य वाचकाला तर त्यांतल्या फारच थोड्या गोष्टी ठाऊक असणें शक्य आहे. त्यामुळे ज्ञानाचा आनंद सर्वच वाचकांना मिळतो, असें म्हणण्यास हरकत नाही. केतकर समाजवर्णनाच्या जोडीला नानाप्रकारचें ज्ञान पावलोपावलीं कसें पेरून ठेवतात, तें 'प्रियंवदे'च्या उदाहरणावरून मागे विशद केलें आहे.[2] समाजवर्णनांत या स्फुट ज्ञानाची भर पडून ज्ञानानंदाची शीग वाढत जाते. हा कादंबरीलेखक म्हणजे मामुली कादंबरीलेखक नसून गाढा समाजशिक्षक, थोर समाजशास्त्रज्ञ आणि पहिल्या दर्जाचा ज्ञानकोशकार आहे, हें सतत जाणवावें इतकें ज्ञान केतकरांच्या कादंबऱ्यांतून मिळत राहातें.

---

१. कांड ४ थें. २. कांड ७ वें.

या ज्ञानाने जो ज्ञानप्राप्तीचा आनंद होतो त्याला मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत तरी तोड नाही.

'आशावादी 'बद्दल एका टीकाकाराने असे उद्‌गार काढले आहेत, की "ही कादंबरी एक छोटासा ज्ञानकोशच झाली असल्याने वाचकांस ज्ञानभांडार उपलब्ध करून देऊन त्याला ती बहुश्रुतत्व आणील, यांत शंका नाही."[१] सर्व कादंबऱ्यांबद्दल एका समीक्षकाने म्हटलें आहे, की "डॉक्टरसाहेबांच्या कादंबऱ्या म्हणजे एक कथात्मक व संवादात्मक ज्ञानकोशच आहे, असें म्हटलें असतां चालण्यासारखें आहे."[२] इतर अनेक टीकाकारांनी असेच उद्‌गार अनेकदा काढले आहेत. त्या उद्‌गारांत केतकरांच्या कादंबऱ्यामधून मिळणाऱ्या ज्ञानानंदाची साक्ष वाटेल तेवढी मिळूं शकेल.

केतकरांनी केलेलें समाजवर्णन व दिलेलें ज्ञान वाचकाला आधीच ठाऊक असेल तर तें नवें वाटणार नाही; आणि मग त्यापासून ज्ञानप्राप्ति न झाल्याने ज्ञानानंद होणार नाही. पण अशा वेळीं ज्ञानानंदाची जागा पुनःप्रत्ययाच्या आनंदाने भरून निघाल्याचा अनुभव येईल. केतकरांचीं समाजवर्णनें अत्यंत वास्तव आणि अत्यंत सूक्ष्म असल्याने त्यांच्यापासून पुनःप्रत्ययाचा आनंद होणें अपरिहार्यच आहे. जेव्हा वर्णनांत मार्मिक व सूक्ष्म उल्लेख असतात तेव्हा वर्णन अधिक पुनःप्रत्ययकारी बनतें. केतकर असे उल्लेख इतके करतात, की त्यांची गणना शेकड्याने करावी लागेल. त्यांच्या वर्णनांत आलेला नागपुरी ब्राह्मणांच्या जेवणांतील जवसाच्या फोडणीचा उल्लेख,[३] जावयाचा मुका सासूने घेण्याच्या अमेरिकन पद्धतीचा उल्लेख,[४] वाण्यांकडे जेवणानंतर सुपारीऐवजी धणे देतात त्याचा उल्लेख[५] वगैरे उल्लेख आठवले म्हणजे सूक्ष्म नी मार्मिक उल्लेखांनी त्यांचीं वर्णनें जास्त पुनःप्रत्ययकारी कशीं होतात, तें स्पष्ट होईल.

त्यांच्या वर्णनांनी पुनःप्रत्यय कसा मिळतो, त्याचे अनेक पुरावे देण्यासारखे आहेत. "ब्राह्मणकन्येंतील क्लायंटेल सेक्रेटरीने ज्या पद्धतीने एका सॉलिसिटरचें लग्न जुळविलें त्या पद्धतीने एक लग्न मुंबईत एका सॉलिसिटरचें झालें, असें

---

१. गो. रा. माटे, लो. शि , नोव्हें.-डिसें. १९३०. २. वि. ह. कुलकर्णी, 'अर्वाचीन मराठी साहित्य' पृ. १०७, १०८. ३. गों. प्रि., पृ. ९५. ४. परागंदा, पृ. १३३. ५. ब्रा. क., पृ. १२०.

कित्येक म्हणतात "–असा उल्लेख केतकरांनी केला आहे.[1] त्यामध्ये, त्यांच्या समाजवर्णनांनी लोकांना पुनःप्रत्यय आल्याचा पुरावा उघड दिसतो. 'प्रियंवदा' व 'आशावादी' या कादंबऱ्या नागपूरकडे मोठ्या बारकाईने वाचल्या जात व त्यांतील गोष्टी भोवतालच्या समाजाशीं ताडून पाहिल्या जात.[2] या घटनेमध्ये पुनःप्रत्ययाचा आणखी पुरावा सापडतो. 'ब्राह्मणकन्यें'तील बेनेइस्रायलांच्या वर्णनाने बेनेइस्रायलांमध्ये जी खळबळ माजली तींतहि पुनःप्रत्ययाचा कांही भाग असला पाहिजे. 'आशावादी'बद्दल साताऱ्च्या 'ऐक्य' पत्राने म्हटलें आहे,[3] की "तीमधील कांही राजकीय पक्षांचीं चित्रें खरोखरच यथातथ्य उतरलीं आहेत." 'स्वराज्य' या पत्राने म्हटलें आहे,[4] की तींत "गिरण्यांचा कारभार, त्यांतील कामकऱ्यांची स्थिति व विशेषतः स्त्रीकामकऱ्यांच्या नैतिक अधःपाताचें वर्णन, स्वदेशी चळवळीमुळे स्वदेशप्रेमी महाराष्ट्रीय गिऱ्हाइकावर बेसुमार नफा मारून चंगळ करणारे गुजराथी गिरणीवाले, सध्याचे राजकीय पक्ष व त्यांचे अंतरंगांतील डावपेच वगैरे अनेक विषयांचें सुंदर व कित्येक ठिकाणीं अत्यंत तंतोतंत वर्णन" आलें आहे. 'गावसासू'बद्दल, विलायतेंत ५–६ वर्षे राहून आलेले एक टीकाकार म्हणतात,[5] की "गावसासूंतील कांही शब्दचित्रें त्यांतील स्वभाववर्णनांतील खोचा इत्यादिकांच्या यथार्थतेविषयी विलायतेला जाऊन आलेल्या वाचकांची मनोमय खात्री पटते." या सर्व अभिप्रायांत अभिप्रायलेखकांना केतकरांचीं समाजवर्णनें यथातथ्य किंवा हुबेहूब वाटतात, असें म्हटलें आहे. तेव्हा, तीं पुनःप्रत्ययाचा आनंद देतात, हें वेगळें सांगितलें नसलें तरी अभिप्रेत आहे यांत शंका नाही. 'प्रियंवदे'बद्दल 'महाराष्ट्रा'त असा अभिप्राय आला होता,[6] की "नागपूरमध्यप्रांतांतील लोकांना......ही कादंबरी वाचतांना आपण पूर्वी पाहिलेल्या, ऐकिलेल्या गोष्टीच पुन्हा पाहात–ऐकत आहों कीं काय असा भास होईल." या अभिप्रायांत तर पुनःप्रत्ययाचा स्पष्ट उल्लेखच

१. 'मी व माझे टीकाकार' ज्योत्स्ना, ऑगस्ट १९३६. २. कित्ता. ३. 'आशावादी कादंबरीवरील लोकमत' वि. से., एप्रि. १९२८. ४. कित्ता. ५. भारतीय, लें. शि., सप्टें. १९३१. ६. 'प्रियंवदेचे टीकाकार' वि. से., मार्च १९२६.

आहे. तेव्हा केतकरांच्या समाजवर्णनांनी पुनःप्रत्ययाचा आनंद मिळतो' याबद्दल शंका नाही.

ज्ञान व अनुभव यांत फरक केला तर केतकरांचीं समाजवर्णनें बऱ्याच वेळां अनुभवाचाहि आनंद देतात, असें म्हणतां येईल. अनुभवांत ज्ञान असतें; पण ज्ञानांत अनुभव नसतो. यंत्राचें पुस्तकी वर्णन वाचून ज्ञान मिळतें; पण यंत्र प्रत्यक्ष पाहिल्याने अनुभव प्राप्त होतो. केतकर आपलीं समाजवर्णनें आकड्यांनी किंवा वर्णनात्मक वाक्यांनी न करतां पात्रें आणि कथा यांच्या साह्याने बहुधा करतात. त्यामुळे त्या त्या समाजांचें नुसतें ज्ञान होण्यापेक्षा त्यांचा मनोमय अनुभवच वाचकांना मिळतो. 'परागंदे'मध्ये अमेरिकेंतील हिंदी लोकांना भेट देऊन आल्याचा भास होतो आणि 'गावसासू'मध्ये इंग्लंडमधील हिंदी लोकांतून फेरफटका मारल्यासारखें वाटतें. जिथे जिथे केतकर पात्रें व कथा यांच्या साह्याने समाजवर्णनें करतात तिथे तिथे असाच प्रकार होतो. तेव्हा त्यांच्या समाजवर्णनांनी बऱ्याच वेळां ज्ञानाचाच नव्हे तर अनुभवाचा आनंद मिळतो, हें निःसंशय खरें आहे. मात्र त्यांच्या सर्वच समाजवर्णनांतून अनुभवाचा आनंद मिळूं शकत नाही. 'ब्राह्मणकन्यें'तील बेनेइस्रायलांच्या वर्णनासारखीं वर्णनें ते क्वचित् करतात आणि त्यांत कथेचा वा पात्रांचा उपयोग न करतां फक्त वर्णनात्मक वाक्यांचा उपयोग करतात. अशीं वर्णनें एखाद्या ज्ञानकोशांत किंवा समाजशास्त्रीय कोशांत शोभण्यासारखीं असतात. तेव्हा त्यांनी अनुभवाचा आनंद मिळत नाही, केवळ ज्ञानाचाच आनंद मिळतो असें म्हणणें भाग आहे.

केतकरांच्या समाजवर्णनांतील व माहितींतील आणखी कांही वैशिष्ट्यें येथे ध्यानांत घेतलीं पाहिजेत. वैविध्य व नावीन्य हीं तीं वैशिष्ट्यें होत. त्यांच्या समाजवर्णनांतील व माहितींतील वैविध्य पूर्वी स्पष्ट झालें आहे. त्यांच्या अगोदर मराठी कादंबरींत अमेरिकेंतील हिंदी लोक, इंग्लंडमधले हिंदी लोक, बेनेइस्रायल समाज, अकुलीन प्रजा वगैरेंचीं वर्णनें ठळकपणें आलीं नव्हतीं, इकडे लक्ष दिलें म्हणजे नावीन्यहि स्पष्ट होईल. प्रा. कुसुमावती देशपांडे म्हणतात, की "नित्याचा, पायाखालचा व चांगल्या ओळखीचा असा सामाजिक जीवनाचा मध्यवर्ती भाग सोडून त्या जीवनाच्या समिप्रांतावर हिंडण्याची केतकरांना आवड" होती..." या दृष्टीने पाहातां जेथे हरि नारायण किंवा

नारायण हरींचें क्षेत्र संपतें तेथे केतकरांचें सुरू होतें. एवढेंच नव्हे तर एकंदरींतच तत्कालीन मराठी कादंबरीचें जें सामान्यतः क्षेत्र दिसतें त्याच्यापलीकडे केतकरांच्या निर्मितीचें क्षेत्र सुरू होतें. "[1] कुसुमावतीबाईंच्या या म्हणण्यांत केतकरी कादंबऱ्यांतील सामाजिक जीवनाची स्वतंत्रता तर स्पष्ट होतेच पण त्याबरोबर त्यांच्यामधील नावीन्याचीहि साक्ष मिळते.—असो. या वैविध्याने व नावीन्याने ज्ञानानंद, पुनःप्रत्ययाचा आनंद व अनुभवाचा आनंद यांत वैविध्याच्या व नावीन्याच्या आनंदाची आणखी भर पडते.

## २०. विचारकथन व वाचकः—

समाजमीमांसा, ज्ञानदान व विचारकथन हीं बोधहेतूमधील तीन अंगें साधीत असतां केतकर नवे नवे विचार सांगत जातात. पात्रांचे संवाद, व्याख्यानें, लेखन वगैरेंमधून हे विचार प्रकट होतात. या विचारांत नावीन्य किती व कोणत्या प्रकारचें आहे, हें कांही उदाहरणें पाहिलीं तर सहज कळूं शकेल.

पाश्चात्य समाजापेक्षा हिंदी समाजांत स्त्री-दाक्षिण्य अधिक आहे, असें ते एका ठिकाणीं म्हणतात.[2] पुनर्विवाहापूर्वी किंवा प्रीतिविवाहापूर्वी तरुणांनी तरुणींना फूस लावून पळवून न्यावें, असें दुसऱ्या ठिकाणीं ते विधान करतात.[3] शुद्धि म्हणजे बाप्तिस्म्याला संमति, असें समीकरण त्यांनी मांडलें आहे.[4] कर्मयोगापेक्षा पुष्टिमार्ग अधिक पुरोगामी होय, असें त्यांनी सुचविलें आहे.[5] अकरमाशांच्या अपमानित जातीचें गौरवपूर्ण चित्र ते एका ठिकाणीं रेखाटतात.[6] कर्तव्यासाठी, आत्महितासाठी खोटें बोलण्यास काय हरकत आहे, असा प्रश्न त्यांनी उत्पन्न केला आहे.[7] बायको मिळवती असेल तर नवरा ऐदी होतो, हा सिद्धांत त्यांनी मांडला आहे.[8] जो समाज

---

१. 'मराठी कादंबरी' पृ. १८०. २. गों. प्रि., पृ. ६७ ते ६९. ३. किस्ता, पृ.९०. ४. आशा., पृ.२४८. ५. विचक्षणा, पृ.६. ६. ब्रा.क., पृ. ४६, ४७ ७. गा. सा., पृ. ११२ ते ११६. ८. विच., माधव छत्रे व प्र. ४७ पाहा; भटक्या, मनोहरपंत पाहा.

व्यक्तीचें रक्षण करूं शकत नाही तो समाज व्यक्तीने स्वार्थासाठीं सोडावा,[१] असें ते सुचवितात. अशीं त्यांच्या नव्या विचारांचीं अक्षरशः शेकडों उदाहरणें सांगतां येतील. हे नवे विचार नेहमीच ते निर्णायक स्वरूपांत मांडतात, असें नाही. कधी त्यांचें स्वरूप निर्णायक असतें तर कधी पात्रांच्या चर्चेत ते विचार नुसते डोकावून जातात. या नव्या विचारांत अनेकदा अचाट विलक्षणपणा तुडुंब भरलेला असतो. उदाहरणार्थ, पतीला पत्नीच्या ठिकाणीं पुत्रोत्पत्ति करतां येत नसेल तर दुसऱ्या पुरुषाकडून ती गुपचूप करून घ्यावी, असा सल्ला त्यांनी दिला आहे.[२] दोन बायका मिळवत्या असतील व त्या नडलेल्या असतील तर त्यांनी एक ऐदी नवरा सामायिकांत पोसावा, असें त्यांनी म्हटलें आहे ![३] गीतेला 'सैतानी ग्रंथ' अशी पदवी त्यांनी बहाल केली आहे ![४] कुमारी–मातेचा उघड सत्कार करण्यास काय हरकत आहे, असा प्रश्न त्यांनी विचारला आहे ![५] स्त्रीसत्ताक कुटुंबपद्धतीच्या पुनरुज्जीवनाची तुतारी त्यांनी फुंकली आहे ![६] गुरुबाजीचें त्यांनी समर्थन केलें आहे ![७] "निरनिराळ्या जातींच्या बायका कराव्यात, निरनिराळ्या जातींचीं मुलें दत्तक घ्यावींत आणि तीं एकत्र वाढवावींत. या तऱ्हेने एक अगदी निराळें, अत्यंत संग्राहक कुटुंब तयार करावें."[८] –अशी कल्पना त्यांनी मांडली आहे ! लोकशाहीपेक्षा हुकुमशाही बरी, असें त्यांनी म्हटलें आहे ![९] —आणि असेच अत्यंत विलक्षण, अत्यंत मुलखावेगळे विचार त्यांनी व्यक्त केले आहेत. हे विचारहि ते निर्णायक म्हणून नेहमीच व्यक्त करतात, असें नाही. ते त्यांनी निरनिराळ्या पात्रांच्याकरवी व्यक्त केले आहेत; त्यांचें कांही ना कांही बळकट समर्थन केलें आहे; त्यांच्याविरुद्ध बाजूहि क्वचित् मांडली आहे आणि ते तसेंच लेखनाच्या ओघांत सोडून दिले आहेत.

या नव्या व विलक्षण विचारांचा वाचकांच्या विचारशक्तीवर जबरदस्त परिणाम होतो. नवा विचार आढळला, त्याचें कांही बुद्धीला गुंगविणारें

---

१. परा., पृ. १३९. २. विच., मोतीलाल–रामप्यारी. ३. भटक्या, प्र. १२. ४. आशा., पृ. १२८. ५. ब्रा. क., प्र. ४१. ६. किता, वैजनाथस्मृति. ७. विच., पद्मनाभाची खैलिक चतुःसूत्री. ८. आशा., पृ. २०३. ९. भटक्या, डॉ. घैसास.

समर्थन दृष्टीस पडलें, की वाचकाची विचारशक्ति खडबडून जागी होते आणि तिला चांगली चालना मिळते. विलक्षण विचाराने तर त्याच्या विचारशक्तीला जणू विस्मयाच्या विजेचे धक्क्यावर धक्के बसतात; ती क्षणभर थक्क होते आणि लगेच तिला भरधाव गति मिळते. केतकर जेव्हा विधायक विचार परिपूर्ण स्वरूपांत किंवा पटण्यासारख्या स्वरूपांत मांडतात तेव्हा या जागृत विचारशक्तीची तृप्तिहि होते. विचारशक्तीला जागृत करणें, तिला चालना देणें, तिला धक्के देणें, तिची तृप्ति करणें हा केतकरांच्या बोधाचा वाचकावरील फार मोठा परिणाम आहे. त्यांनी जेवढे विविध, जेवढे नवे व जेवढे विलक्षण विचार सांगितले तेवढे मराठींत आजवर कोणत्याहि एका कादंबरीकाराने सांगितले नाहीत. सर्व कादंबरीकारांची बेरीज केली तरीहि ते सर्वजण केतकरांची बरोबरी करतील किंवा नाही, याची वानवाच आहे. केतकरांच्या कादंबऱ्यांनी होणारें विचारप्रवर्तन यामुळेच मराठी कादंबरी-वाङ्मयांत अद्वितीय आहे.

त्यांच्या कादंबऱ्यांनी वेळोवेळी महाराष्ट्राच्या विचारशक्तीचें कसें प्रवर्तन केलें तें पुढे दिलेल्या कांही अभिप्रायांवरून सहज दिसून येतें.

'प्रियंवदे'बद्दल 'महाराष्ट्र' म्हणतो, की ही "मार्मिक, टीकात्मक विचारांनी भरलेली उद्बोधक कादंबरी" आहे.[१] 'उदय' म्हणतो, की या कादंबरींत "कांही न पटण्याजोगीं मतें...आलीं आहेत पण त्याबरोबरेच कांही कांही जागीं विचाराला फारच चलन देण्याजोगे विचारहि आलेले आहेत."[२]

'परागंदे'बद्दल 'उद्यम'ने लिहिलें आहे, की "असल्या विचारप्रवर्तक कादंबऱ्या लिहिण्याचा प्रकार मराठी भाषेंत नवीनच सुरू केल्याबद्दल"[३] डॉ. केतकरांचे आभार मानले पाहिजेत. 'मुमुक्षू'ने लिहिलें आहे, की ही कादंबरी "समाजांत क्रांतिकारक विचार फैलावण्यास साह्य करणारी असून प्रस्तुतच्या हिंदु-समाज-घटनेस बाधक आहे."[४] 'महाराष्ट्रा'ने तिचें वर्णन "अनेक दृष्टींनी अभिनव व अत्यंत उद्बोधक"—"भारताच्या सरहद्दीचें तसेंच भारतीयांच्या रूढ, धार्मिक, नैतिक, राजकीय कल्पनांचेंहि उल्लंघन

१. 'प्रियंवदेचे टीकाकार' वि. से., मार्च १९२६. २. वि. से., अं. २, व. ३, मलपृष्ठ. ३. 'परागंदा कादंबरीचें स्वागत' वि. से., डिसें. १९२६. ४. कित्ता.

करणारी "–असें केलें आहे.[१] 'नवा काळ' असे उद्गार काढतो, की तींत अनेक विचार आणि प्रसंग अशा प्रकारचे आहेत, की "मनांत खळबळ झालीच पाहिजे." "विवेचनें क्रांतिकारक" आहेत. "पानागणिक वाचकांच्या समजुतींना जोराचा धक्का बसतो."[२] 'प्रतियोगी' अशी टीका करतो, की तीमधील "विचार कित्येक ठिकाणीं एकांडे, क्रांतिकारक, अतिप्रगल्भ, बोचरे व कटु आहेत"; "पण त्यांत असत्यता आहेच असें नाही."[३] 'विविधज्ञान-विस्तारां'त प्रा. वा. म. जोशी म्हणतात, "बंडखोरी इतकी पुढे गेली आहे, की तिचें नावीन्य, मनोरंजकत्व, साहस इत्यादि दृष्टीने अभिनंदन करणें इष्ट असलें तथापि लेखणी जराशी अडखळते." "या कादंबरींतील कांही पात्रांचे विचार असामान्य नव्हे तर कित्येक ठिकाणीं क्रांतिकारक आहेत व मनुष्य-मात्राला धाडसी मतांबद्दल कुतूहल व कौतुक वाटणें साहजिक असल्यामुळे वाचक ही कादंबरी वाचीत असतांना केव्हाहि कंटाळत नाही. उलट नेहमी तो सोत्साह व सोत्कंठ असतो."[४]

'अशावादी'बद्दल 'किर्लोस्कर' पुढील मत प्रदर्शित करतो. या कादंबरीमध्ये बुचकळ्यांत पाडणाऱ्या व प्रचलित प्रश्नांचें "इतक्या बहारीने विवेचन केलें आहे, की एकदा पुस्तक हातीं घेतल्यावर तें पुरें केल्याशिवाय खालीं ठेववत नाही." धर्मग्रंथ, रूढि यांबद्दल ब्र न खपणाऱ्या लोकांना "कांही भाग झोंबेल." "पण ज्यांना आपली विचारशक्ति समतोल व शोधक बनवावयाची असेल त्यांना प्रस्तुत कादंबरी फारच आवडेल."[५] 'स्वराज्य' पत्र म्हणतें: "वाचकांच्या विचारशक्तीला चांगलाच ताण" ही कादंबरी देईल.[६] 'पुरुषार्थ' उद्गारतो: "ही कादंबरी विचारांत क्रांति करणारी आहे. पण गीतेसारख्या पवित्र ग्रंथावर कारण नसतां भलतचि टीका मध्ये मध्ये केली असल्यामुळे साधारण ज्ञानाच्या तरुणांवर तिचा अनिष्ट परिणाम होईल, असें वाटतें. लेखकांनी जगद्वंद्य गीताग्रंथापेक्षा आपल्या विचारांस अधिक श्रेष्ठ समजण्यांत चूक केली आहे."[७] बडोद्याचा 'सहविचार' असा अभिप्राय देतो, की कादंबरींत

---

१. 'परागंदा कादंबरीचें स्वागत' वि. से., डिसें. १९२६. २. कित्ता. ३. कित्ता. ४. वि. से., व. ३, अं. ४, मलपृष्ठ. ४. ५. 'आशावादी कादंबरीवर लोकमत' वि. से., एप्रि. १९२८. ६. कित्ता. ७. कित्ता.

मुख्य कथानकासह " भगवद्गीता, शुद्धिसंघटन, वेश्योद्धार, राजकीय पक्षभेद, गांधींची चळवळ इत्यादि महत्त्वाच्या विषयांसंबंधी डॉक्टरसाहेबांनी आपली विक्षिप्त पण विचाराच्या पायावर उभारलेलीं मतें प्रांजलपणें सांगितलीं आहेत. ...हिंदु समाजाच्या अनेक जिव्हाळ्याच्या प्रश्नांना ही कादंबरी तोंड फोडूं शकेल. "[1] ' आनंद'ने आपला राग पुढीलप्रमाणे ओकला आहे: " असत्याला किंवा आंशिक सत्याला सत्याचा पोषाख चढवून आपल्या विचारांत नावीन्य, सडेतोडपणा आणि उत्तानता आहे, असें भासविण्याची कला डॉ. केतकरांना बरीच साधलेली दिसते. पण त्याबरोबरच श्रीमत् भगवद्गीतेसारख्या सर्वमान्य व पूज्य ग्रंथाला सैतानी म्हणण्यापर्यंत त्यांच्या मूर्खपणाच्या धारिष्ट्याचीहि मजल गेलेली पाहून त्याच्या लेखनाच्या द्वारें तरुण मंडळींत विचारांच्या व आचारांच्या उच्छृंखलपणाची साथ पसरेल कीं काय अशी भीति वाटते. डॉ. केतकर आता गप्प बसतील तर महाराष्ट्राच्या भावी पिढीवर त्यांचे निःसंशय उपकार होतील. "[2] वेंगुर्ल्याचा ' किरात ' म्हणतो, की " त्यांची मतें पुष्कळांना मान्य नसलीं तरी त्यांचे विचार ठरीव चाकोरींतून जाणाऱ्या मनाला निराळी दिशा दाखविणारे व उद्बोधक असतात, यांत शंका नाही. "[3] ' मुमुक्षू'ने पुढील मत दिलें आहे: " युरोपियन किंवा अमेरिकन समाजचित्रांचें व तेंहि त्यांतील गचाळ भागाचें प्रदर्शन आमच्या तरुण पिढीपुढे मांडण्याने तरुणांचा मतिभ्रंश होण्याचा अधिक संभव असल्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांची शिफारस आम्हांस करवत नाही. "[4]

' ब्राह्मणकन्या', ' गावसासू ' वगैरे इतर कादंबऱ्यांवर अशाच अर्थाचे अभिप्राय वेळोवेळीं प्रकट झालेले आहेत. त्यांची कल्पना आतापर्यंत उद्धृत केलेल्या अभिप्रायांवरून येणें शक्य असल्यांने ते उद्धृत करण्याची जरूर नाही.

उद्धृत केलेल्या अभिप्रायांत सर्वांनी केतकरांच्या कादंबऱ्यांतील विचार-प्रवर्तनाचा गुण एकमुखाने मान्य केला आहे. अनेक जण केतकरांच्या नव्या, विलक्षण व क्रांतिकारक विचारांवर रुष्ट झाले आहेत; पण केतकरांच्या विचारांनी

---

१. 'आशावादी कादंबरीवर लोकमत' वि. से., एप्रि. १९२८. २. कित्ता. ३. कित्ता. ४. कित्ता

त्यांना धक्के दिले, अस्वस्थ केलें, याचीच ती खूण आहे. मुमुक्षु, आनंद वगैरे पत्रांना भीति वाटते, की केतकरांच्या कादंबऱ्यांनी भावी पिढी बहकून जाईल. त्यांना ही जी भीति वाटते तींत केतकरांच्या विचारप्रवर्तनाचा प्रभावीपणा दिसून येतो.

कांही अभिप्रायलेखक ज्या अर्थी रागावले आहेत किंवा नाराज झाले आहेत त्या अर्थी केतकरांचे विचारप्रवर्तन आनंददायक म्हणावें किंवा नाही, अशी शंका येईल. पण कोणतीहि ललित कृति वाचतांना सहृदय वाचक ती क्रीडावृत्तीने वाचतो, तीमधील अरुचिकारक भागाकडे दुर्लक्ष करतो आणि रुचकर भागाची गोडी चाखतो, हें ध्यानीं घेतलें म्हणजे ती शंका दूर होईल. केतकरांचे अनेक विचार अनेकांना अप्रिय वाटतील; पण त्या वेळीं विचारांतल्या अप्रिय भागाकडे दुर्लक्ष करून विचारप्रवर्तनामधील सुख अनुभवतां येईल. विचार क्वचित् अप्रिय झाले तरी विचारप्रवर्तन नेहमी आनंददायक असल्याने केतकरांचें लेखन विचारप्रवर्तनापुरतें तरी आनंददायक आहे, असेंच म्हटलें पाहिजे. प्रत्यक्ष विचारदेखील अनेकांना अप्रिय वाटत असले तरी 'सहृदया'ला अप्रिय वाटतील असें दिसत नाहीं. त्या विचारांत ' रूढ ' नीतिकल्पनांना सुरुंग लावले आहेत, रूढ विचार जमिनदोस्त केले आहेत, पण कोठेहि ' उच्च ' नीति सोडलेली नाही; मनुष्याच्या जीवनाच्या विनाशाचा पुरस्कार केलेला नाही. सर्वत्र त्या विचारांचें तोंड जीवन समृद्ध, सुखी व समाधानी करण्याच्या उद्दिष्टाकडे वळलेलें आहे. तेव्हा ते विचार न पटले, विक्षिप्त वाटले, चुकीचे वाटले तरी ते सहृदयाला अप्रिय वाटणार नाहीत. प्रा. वा. म. जोशांप्रमाणे, ते "सद्भावनापोषक"[१] आहेत असेंच सहृदय म्हणेल आणि त्यांतील नावीन्य, वैविध्य, वैलक्षण्य, बुद्धीची झेप, सूक्ष्मपणा वगैरेंमुळे ते त्याला आनंददायकच होतील.[२]

---

४. लो. शि., मे–जून १९३७. २. येथे प्रा. कुसुमावती देशपांडे यांचीं पुढील वाक्यें लक्षांत घेण्यासारखीं आहेत. "त्यांची वृत्ति क्षुद्र किंवा मन हलकें व कोतें वाटत नाही....जीवनविद्वेषाची किंवा उद्वेगाची छाया त्यांच्या निर्मितीवर पडली नाही. उलट, त्यांच्या समवृत्ति जीवननिष्ठेचेंच त्यांच्या निर्मितींत क्षणोक्षणीं प्रत्यंतर पडतें."—'मराठी कादंबरी' पृ. १८२.

## २१. बोधाविषयी आणखी कांहीः—

बोधामुळे कादंबऱ्यांच्या रचनेवर जो परिणाम झाला आहे त्यांतील कांही भाग मात्र सहृदयाला आनंददायक वाटण्यासारखा नाही. विशेषतः, बोधामुळे एकात्मतेची जी हानि झाली आहे ती असुंदर आहे व म्हणून आनंददायक नाही. एवढेंच काय पण तीमुळे सहृदयाच्या मनाला त्रासच होतो, असा अनुभव आहे. माडखोलकर, वा. म. जोशी वगैरे बहुतेक टीकाकारांनी त्यांच्या कादंबऱ्यांतील विस्कळितपणाला दोष दिला आहे, तो यामुळेच होय.[1]

साधारणतः सर्वांच्या कादंबऱ्या पात्र किंवा कथा यांच्यावर अधिष्ठित असतां त्यांनी आपल्या कादंबऱ्या विशिष्ट विषयावर अधिष्ठित केल्या; पण वाचकाच्या मनाची तशी पूर्वसिद्धता करण्याची सोय अनेकदा केली नाही, हाहि दोष होय. हा दोष कादंबऱ्यांना त्यांनी दिलेल्या नांवावरून स्पष्ट होतो. त्यांनी जर विशिष्ट विषयांवर कादंबऱ्या लिहिल्या तर त्या विषयांचीं निदर्शक अशीं नांवें देऊन त्या विषयांवर वाचकांचें लक्ष त्यांनी केंद्रित करावयास हवें होतें. पण ते भलतींच नांवें देतात व वाचकांना बुचकळ्यांत पाडतात. ‘ गावसासू ’ ‘ विचक्षणा ’ व ‘ ब्राह्मणकन्या ’ हीं अशा तऱ्हेचीं नांवें आहेत. या नांवांचीं पात्रें पहिल्या दोन कादंबऱ्यांत मुख्य नाहीत. तिसरींत पात्र मुख्य आहे पण तें पात्र सर्वच्या सर्व कादंबरी एकत्र गाठवीत नाही. —आणि तीनहि कादंबऱ्यांत पात्रांपेक्षा विशिष्ट विषय हें समावेशक व केंद्रभूत असें तत्त्व आहे. पण त्या विषयाचें नांव न दिल्याने वाचक अंधारांत चाचपडत राहातो. ‘ परागंदा,’ ‘ आशावादी अथवा एका प्रवाहपतिताचें चरित्र ’ व ‘ भटक्या ’ हीं नांवें मात्र विषयदर्शक व म्हणून योग्य आहेत. ‘ विचक्षणा ’ व ‘ भटक्या ’ या कादंबऱ्यांत प्रारंभींच्या प्रकरणांतून कादंबरींतील विषयाची कल्पना देण्याचा प्रयत्न केला आहे. तसाच प्रयत्न इतर कादंबऱ्यांत झाला असता, तर बरें झालें असतें.

बोधांत भावनेच्या तृप्तीपेक्षा जिज्ञासेची, बुद्धीची, विचारशक्तीची वगैरे तृप्ति होते. अशी तृप्ति करून घेण्याची गोडी व कुवत नैसर्गिकपणेंच फार

---

1. माडखोलकर, प्रतिभा, जुलै १९३७; वा. म. जोशी, लो. शि., मे-जून १९३७.

थोड्या लोकांमध्ये असते. त्यामुळे केतकरांच्या बोधबहुल कादंबऱ्या थोड्यांनाच आवडल्या आणि त्यांनी झगझगीत लोकप्रियता कधीहि मिळवली नाही. झगझगीत लोकप्रियता न मिळण्यामागे विस्कळित रचना, बोजड भाषा वगैरे इतर कारणें आहेत; पण बोधबाहुल्य हें त्यांतील प्रमुख कारण होय.

## २२. कथांचा परस्पर संबंध:—

केतकरांच्या कादंबऱ्यांत बोधहेतु प्रधान आहे, बोध हेंच त्यांतील समावेशक व सर्वव्यापी तत्त्व आहे. त्यामुळे प्रथम बोधाचा विचार करून नंतर कथानकांचा विचार होणें, हें स्वाभाविक आहे. कथानकांचा विचार करतां केतकरांच्या कादंबऱ्यांचा पहिला विशेष डोळयांत भरतो तो असा, की त्या कादंबऱ्यांतील कथांचा एकमेकींशीं असलेला संबंध बऱ्याच ठिकाणी कथादृष्ट्या फार सैल आहे. हा संबंध किती सैल आहे, तें एकेका कादंबरीचा विचार केल्यास पुढीलप्रमाणे स्पष्ट होतें.

'प्रियंवदे 'मध्ये रामभाऊ–प्रियंवदा, वैजनाथ–शारदा व हरिभय्या–बिंबा या ज्या तीन कथा आहेत त्या अगदीच सुट्या सुट्या आहेत. त्यांची एकमेकींवर क्रियाप्रतिक्रिया जवळ जवळ शून्यच होते. प्रियंवदा शारदाबाईंना उपदेश करते, की तुम्ही वैजनाथ शास्त्र्यांना खुशाल पकडा !–आणि बिंबाबाई-बरोबर रत्नपूर पाहायला आल्यामुळे शारदाबाईंची वैजनाथ शास्त्र्यांशीं गाठ पडते; एवढाच काय तो या तीन कथांत संबंध आहे. बंडूनानाची जी चौथी कथा कादंबरींत येते तिचा तर या तीन कथांशीं एवढाहि संबंध नाही. बंडूनाना आपली हकीगत रामभाऊला क्वचित् पत्रद्वारें कळवितो, एवढाच त्या कथेचा रामभाऊ–प्रियंवदेच्या कथेशीं नांवापुरता संबंध दाखवितां येईल आणि बंडूनाना बिंबाबाईचा भाऊ असतो एवढाच त्या कथेचा बिंबा–हरिभय्याच्या कथेशीं संबंध, शोधलाच तर सापडेल. शशिपाद–आयडाची एक दुय्यम कथा कादंबरींत येते; पण त्या कथेबद्दल रामभाऊ कांही विचार प्रदर्शित करतो, एवढाच लवमात्र संबंध त्या कथेचा इतर कथांशीं आहे. अनंतराव घरकुट्टे व होरमसजी पेनांगवाला यांच्याभोंवतीं गोळा झालेला कथाभाग आपसांत संबद्ध नाही; पण तो दोन भिन्न मुख्य कथांशीं संबद्ध आहे. होरमसजीची मुलगी व बायको यांच्या भोवतीचा कथाभाग मात्र कोणत्याच मुख्य कथेशीं पुरेसा

संबद्ध नाही; पण त्याची लुडबूड मधून मधून उगीच चाललेली असते. एकंदरींत ' प्रियंवदे 'मधील कथा व उपकथा पुरेशा एकजीव झालेल्या नाहीत, त्या कशा तरी दावणीला बांधलेल्या आहेत, असा याचा उघड अर्थ होतो. यासंबंधी महाराष्ट्रांत अशी टीका आली होती, की संविधानक " सैल" असल्यामुळे " गोंडवनांतील प्रियंवदा व घरकुट्टे घराण्याचा इतिहास " असें दुहेरी नांव कादंबरीला द्यावें लागलें. " तथापि कादंबरींत प्रियंवदेचेंहि चरित्र नाही किंवा घरकुट्ट्यांचाहि इतिहास नाही."[1] 'महाराष्ट्र 'ची ती टीका, शाब्दिक सैलपणाकडे दुर्लक्ष केल्यास, अगदी खरी आहे.

' परागंदे 'मध्ये गंगाधर–रुक्मिणी, रघुनंदन–मयूरी व सरंजामे-लीला या तीन जोडप्यांच्या तीन मुख्य कथा येतात आणि १ ल्या कथेंतील गंगाधरावर २ ऱ्या व ३ ऱ्या कथांतील मयूरीचें व लीलेचें कांही काळ प्रेम बसतें. त्यामुळे त्या कथांत कांही क्रिया–प्रतिक्रिया उत्पन्न होते व त्या कथादृष्ट्या एकमेकींशीं संबद्ध होतात. पण कादंबरींतील सर्व दुय्यम कथा व कथाभाग या तीन मुख्य कथांशीं कथादृष्ट्या मुळीच संबद्ध नाही. कादंबरींत कामत पतिपत्नी, गोगटे पतिपत्नी, शिवराजसिंग पतिपत्नी व विल्कॉक्स पतिपत्नी यांच्या दुय्यम कथा येतात आणि गजपतराय, आशुतोष चौधरी वगैरेंचे छोटे कथाभाग येतात. या दुय्यम कथांतील व कथाभागांतील पात्रांचें मुख्य कथांतील पात्रांशीं कुठे नातें आहे, कुठे मैत्री आहे व ओळख आहे; कुठे दोनहीकडचीं पात्रें एकमेकांशीं बोलतात, इतकेंच. पण तेवढ्यावरून मुख्य कथांशीं या दुय्यम कथा व कथाभाग कथादृष्ट्या संबद्ध आहेत, असें म्हणतां येत नाही. त्यांच्या एकमेकांवर क्रिया-प्रतिक्रिया झाल्या असत्या तरच तसें म्हणतां आलें असतें. दुय्यम कथा व कथाभाग ज्याप्रमाणे मुख्य कथांशीं कथादृष्ट्या संबद्ध नाहीत त्याचप्रमाणे त्यांचा एकमेकांशींहि संबंध नाही.

' आशावादी'मध्ये ब्रह्मगिरींचें चरित्र हें मुख्य सूत्र आहे; पण कादंबरींतील लालनाथ–नंदिका, विश्वामित्र–विहंगमा, अलकनंदा नि तिचा पति, परमानंद–पद्मावती, व ऑडेलिन–हंटर यांच्या कथांशीं तें सूत्र कथादृष्ट्या मुळीच निगडित

१ ' प्रियंवदेचे टीकाकार ' वि. से., मार्च १९२६.

नाहीं. या कथांचा ब्रह्मगिरींच्या जीवनौघावर कोणताच विशेष व प्रत्यक्ष परिणाम होत नाहीं आणि ब्रह्मगिरींच्या जीवनाचा या कथांवरहि कोणताच परिणाम होत नाहीं. या कथांपैकी पहिल्या कथेंतील पात्रें तेवढीं ब्रह्मगिरींच्या ओळखीचीं आहेत! या कथा मुख्य सूत्राशीं अशा संबद्ध नसल्या तरी, त्या एकमेकींशीं थोड्या फार संबद्ध आहेत. पहिल्या कथेंतील नंदिकेचें मन दुसऱ्या कथेंतील विश्वामित्राकडे व चौथ्या कथेंतील परमानंदाकडे कांहीं काळ झुकतें. त्यामुळे १ ली, २ री व ४ थी या कथा संबद्ध होतात. ३ ऱ्या कथेंतील अलकनंदेच्या जीवनक्रमाचा परिणाम २ ऱ्या कथेंतील विहंगमेच्या जीवनावर होतो. त्यामुळे ३ री व २ री या कथाहि संबद्ध होतात. मात्र ॲडेलिन–हंटर यांची शेवटची कथा पहिल्या चार कथांशीं कथादृष्ट्या मुळीच संबद्ध नाहीं. 'आशावादीं'त येणेंप्रमाणे दुय्यम कथा एकमेकींशीं बऱ्याच संबद्ध आहेत; पण त्या मुख्य सूत्राशींच संबद्ध नाहींत.[१]

'ब्राह्मणकन्ये'मध्ये मात्र सर्व कथा एकमेकींशीं चांगल्या संबद्ध झाल्या आहेत. तींत कालिंदी–शिवशरण–रामराव ही मुख्य कथा असून चिंतोपंत–मंजुळा, अप्पासाहेब–शांता, सत्यव्रत–एसतेर, बिनयामिन–उषा व नानाभाई–उपेंद्रवज्रा या उपकथा आहेत. उपकथांपैकी पहिल्या दोन कथांचा उपयोग कालिंदीचे पूर्ववृत्त सांगून तिची विशिष्ट अकुलीन परिस्थिति स्पष्ट करण्यासाठीं होतो. कालिंदीची सर्व कथा तिच्या अकुलीनत्वावर अधिष्ठित असल्यामुळे या कथा तिच्या मुख्य कथेशीं अतिशय निगडित म्हटल्या पाहिजेत. या कथा कालिंदीचें अकुलीनत्वच स्पष्ट करीत नाहीत तर त्यांमधील पात्रें आपापल्या विचारांनी कालिंदीच्या विचारांना व म्हणून जीवनालाहि हेलकावे देतात. तेव्हा, त्या कथा कालिंदीच्या कथेशीं त्यामुळे जास्तच निगडित होतात. या कथांपैकी १ ल्या कथेंतील मंजुळा त्याच कथेंतील

---

१. "या वेगवेगळया उपकथांची जुळणी पहिल्या दोन्ही [ प्रियंवदा व परागंदा ] कादंबऱ्यांपेक्षा बरीच कौशल्यपूर्ण झाली आहे" असें प्रा. कुसुमावती देशपांडे म्हणतात. पाहाः 'मराठी कादंबरी' पृ. १७१. पण त्यांचें म्हणणें वरील विवेचनाच्या दृष्टीने सदोष वाटतें. येथे कांड १४ मधील विवेचनहि लक्षांत घ्यावें.

डॉ. चिंतोपंताची रखेली असते व तिची मुलगी शांता दुसऱ्या कथेंतील अप्पासाहेबांची पत्नी असते. मंजुळेसारख्या रखेलीच्या मुलीशीं लग्न केल्याने अप्पासाहेबांच्या जीवनावर खोल परिणाम झालेले असतात. तेव्हा या दोन उपकथा एकमेकींत चांगल्या गुंतल्या आहेत, असें म्हणण्यास हरकत नाही. कालिंदीने तिसऱ्या उपकथेमधील सत्यव्रत व एसतेर यांचा संबंध जमविलेला असतो आणि उलट एसतेरने कालिंदीला आश्रय व नोकरी देऊन तिचा संबंध नकळत रामरावाशीं जमविलेला असतो. शिवाय सत्यव्रत कालिंदीचा भाऊ असून तिचा विचारांमधील सहकारी असतो व तोच तिची बाजू अप्पासाहेब वगयांना पटवून देतो. तेव्हा, कालिंदीची मुख्य कथा सत्यव्रत–एसतेरच्या उपकथेशीं बरीच समरस होऊन गेली आहे. चौथ्या उपकथेंतील बिनयामिन–उषा यांचा संबंध येण्यास मूलतः कालिंदी व प्रत्यक्षपणें एसतेर कारण होते. त्यामुळे बिनयामिन–उषा यांची चौथी कथा कालिंदीच्या मुख्य कथेशीं व सत्यव्रत–एसतेरच्या उपकथेशीं गुंफली गेली आहे. ही गुंफण मोठीशी पक्की नाही; पण बिनयामिन–उषेची उपकथा फारच कमी महत्त्वाची असल्याने ती आहे तेवढी पुरेशी वाटते. नानाभाई–उपेंद्रवज्रेची गोष्ट कालिंदीने लिहिलेली असते व त्या गोष्टीमुळे तिचा व रामरावाचा प्रथम परिचय होतो. तेव्हा, ती कथा मुख्य कथेमध्ये दुव्यासारखी जाऊन चपखल बसते, हें सरळ आहे. 'ब्राह्मणकन्यें'तील सर्व कथा एकमेकींशीं कथादृष्ट्या अशा संबद्ध आहेत, हें 'ब्राह्मणकन्ये'चा क्रम कथारचनेमध्ये केतकरांच्या कादंबऱ्यांत पहिला लागण्याला एक कारण आहे.

'गावसासू'मध्ये एकच मुख्य कथा आहे व ती म्हणजे कुसुमकलिकेच्या जमातशोधनाची कथा होय. एककवडी मैत्र व लिझी या कुसुमच्या मातापित्यांची जी विवाहकथा कादंबरींत येते ती कुसुमकलिकेला जामात-शोधनाची कला वंशपरंपरेने कशी मिळाली होती, तें सांगण्यासाठी येते. तेव्हा, ती कथा दुय्यम आहे व मुख्य कथेला पूरक असल्याने तिच्याशीं निगडितहि आहे. कुसुमकलिकेच्या विवाहाची कथा तिचा जामातशोधनामधला पूर्वानुभव सांगण्यासाठी येते. तेव्हा तिची स्थितिहि तशीच आहे. कुसुम-कलिकेच्या गृहस्थितीचें ८ व्या व ९ व्या प्रकरणांतील वर्णन जामातशोधनाच्या मुख्य कथेशीं असंबद्ध वाटतें; पण त्याचा त्या कथेशीं अगदीच संबंध नाहीं,

असें नाही. कुसुमकलिकेला जामातशोधनार्थ इंग्लंडमध्ये राहाणें कां शक्य होतें, हें त्या वर्णनावरून कांहीसें कळतें व तें वर्णन जामातशोधनाच्या कथेचाच एक भाग ठरूं शकतें. मात्र या भागाला प्रमाणतः जास्त जागा दिल्यामुळे, नाकापेक्षा मोती जड, अशी त्याची स्थिति झाली आहे. सारांश, 'गावसासूं'तील कथा व उपकथा 'ब्राह्मणकन्ये'इतक्याच जवळ जवळ परस्परांशीं निगाडित आहेत, असें म्हणण्यास हरकत नाही.

'विचक्षणे'मध्ये कोणतीहि एक कथा मुख्य नाही; पण तीमध्ये अनेक कथांचें एक जाळेंच विणलेलें आहे. विचक्षणा–माधव, मधुमालती–संकर्षण, बाळोबा–कृपाबाई, चंदु–तारा–मंजुळा, तर्कटे–रंगूबाई, व मोतीलाल–रामप्यारी या 'विचक्षणे'मधील मुख्य कथा म्हणतां येतील. पैकीं १ ल्या कथेंतील माधवाचें लक्ष मधुमालती, कृपाबाई व मंजुळा यांच्याकडे आकृष्ट झालेलें असतें व रामप्यारीला तर त्याच्यापासून पुत्रप्राप्तीच होते. त्यामुळे १ ली कथा २ ऱ्या, ३ ऱ्या, ४ थ्या व ६ व्या कथेशीं गुंतलेली आहे. ३ ऱ्या कथेंतील बाळोबा प्रथम मंजुळेवर प्रेम करतो व शेवटीं कृपाबाईशीं लग्न करतो. तेव्हा ३ ऱ्या कथेचीं नातीं ४ थ्या कथेशीं जुळलेलीं आहेत. संकर्षण या चित्रकाराला व त्याची पत्नी मधुमालती हिला चंदू सिनेमांतलें काम देऊं पाहातो व मधुमालती–संकर्षण यांच्या संसारावर त्याचा परिणाम होतो. त्यामुळे २ ऱ्या व ४ थ्या कथांचे संबंध एकमेकींत कांही अंशीं गुतलेले आहेत. रंगूबाई डॉ. तर्कट्यांची रखेली असते व मंजुळा रंगूबाईपासून डॉ. तर्कट्यांना झालेली मुलगी असते. मंजुळेच्या सर्व प्रेमसंबंधांवर तर्कटे–रंगूबाई यांच्या विचारांचा परिणाम झालेला असतो. त्यामुळे तर्कटे–रंगूबाई यांची कथा मंजुळेच्या कथेशीं व मंजुळेचा ज्यांच्याशीं प्रेमसंबंध येतो त्या सर्वांच्या कथांशीं संबद्ध असते. 'विचक्षणे'मधील मुख्य कथांचा हा जो परस्परांशीं संबंध आहे तो त्यांच्या ओघावर क्रिया–प्रतिक्रिया करणारा आहे व म्हणून कथादृष्ट्या महत्त्वाचा आहे. या संबंधामुळे सर्व कथांचें एक भक्कम जाळें बनलें आहे, असें म्हटलें तर तें योग्यच दिसेल.

'विचक्षणें'त पद्मनाभ-श्रीरंगाचार्य यांचा जो कथाभाग येतो तो मात्र या कथांशीं कथादृष्ट्या चांगला सांधलेला नाही. त्या कथाभागाने या कथांपैकी फक्त एकाच कथेच्या ओघावर कांही परिणाम घडवलेला आहे; पण बाकीच्या

कथांशीं कथादृष्ट्या त्याचा काडीमात्रहि संबंध नाही. त्या कथाभागानें ज्या एकमेव कथेवर परिणाम होतो ती कथा म्हणजे मोतीलाल–रामप्यारीची कथा होय. रामप्यारीच्या ठिकाणीं परपुरुषाकडून पुत्रोत्पत्ति करविण्याची कल्पना पद्मनाभ–श्रीरंगाचार्य यांच्या आश्रमांतील आचारक्रमावरून मोतीलालला सुचते व मोतीलाल रामप्यारीला आश्रमांत पाठवितो. मोतीलाल–रामप्यारीच्या कथेवर पद्मनाभ–श्रीरंगाचार्य यांच्या कथाभागाचा जो परिणाम होतो तो फार महत्त्वाचा आहे, असें मात्र नाही. कारण पुढे रामप्यारीला प्रत्यक्ष पुत्रप्राप्ति होते ती श्रीरंगाचार्य किंवा त्यांचा शिष्यवर्ग यांच्याकडून न होतां माधवकडून होते व अशा पुत्रप्राप्तीची कल्पना येण्यासाठी श्रीरंगाचार्यांचा आश्रमच हवा होता, असें नाही. एकंदरींत, पद्मनाभ-श्रीरंगाचार्य यांच्या कथाभागानें कादंबरींत जी ऐसपैस पथारी पसरली आहे ती इतर कथांशीं कथादृष्ट्या पुरेशी संबद्ध नाही, हेंच खरें. कादंबरींत प्रा. लोंढ्यांचा कांही कथाभाग येतो; पण तो अत्यल्प असल्यानें विचारांत घेण्याचें कारण नाही.

'भटक्या'मध्ये 'भटक्या'चें चरित्र सूत्रासारखें आहे; पण सर्व उपकथा त्या सूत्राशीं कथादृष्ट्या पूर्णपणें निगडित झालेल्या नाहीत. उदाहरणार्थ, डॉ. घैसास, विठू घोमण, रावबहादुर आपटे व बाबुराव उपासनी, नर्मदाबाई सरवटे वगैरेंच्या कथा 'भटक्या'नें फक्त ऐकल्या आहेत किंवा पाहिल्या आहेत. पण त्या कथांचा त्याच्या जीवनावर कांहींहि परिणाम झालेला नाही. त्या कथांचा एकमेकींवरहि कांही परिणाम झालेला नाही. तेव्हा कथांमधील परस्पर संबंधांत 'भटक्या'ची स्थिति फारच निकृष्ट ठरते, हें उघड आहे. असो.

'ब्राह्मणकन्या,' 'गावसासू' व 'विचक्षणा' या तीन कादंबऱ्या वगळतां बाकी सर्व कादंबऱ्या कथांतील परस्परसंबंधाच्या दृष्टीनें अत्यंत शिथिल आहेत व ब्राह्मणकन्यादि तीन कादंबऱ्यांतहि तसा शिथिलपणा क्वचित् आहे, हें यावरून स्पष्ट होईल. केतकरांच्या कादंबऱ्यांवर ज्यांनी टीका केली, त्यांपैकीं बहुतेकांनी या शिथिलपणाचा उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, "कथानकाची विस्कळित रचना"[1] या शब्दांनी प्रा. वा. म. जोशी त्याचा उल्लेख करतात व "सुसंबद्ध कथानकाचा अभाव" या शब्दांनी ग. त्र्यं. माडखोलकर त्याचा निर्देश करतात.[2]

---

१. लो. शि., मे–जून १९३७. २. प्रतिभा, जुलै १९३७

## २३. कथारचना आणि उत्कण्ठावर्धनः—

कादंबरीचा वेधकपणा वाढविण्याठी वाचकाची उत्कण्ठा कथानकाने सतत ताणून ठेवतां येते. पण केतकरांच्या कादंबऱ्यांत, नव्या विचारासाठी वाचक सोत्कंण्ठ राहात असला तरी कथानकासाठी तो क्वचितच सोत्कण्ठ राहातो. याचें एक कारण म्हणजे बोधहेतूमुळे त्यांच्या कादंबऱ्यांत माहिती, विचार वगैरे जो कथाहीन बोध येतो तो बोध होय. मागे एकात्मतेची चर्चा करतांना, ज्या बोधाचा कथांशीं अन्योन्याश्रय नाही असा 'परागंदा', 'ब्राह्मणकन्या', 'गावसासू' व 'विचक्षणा' यांमधील बोध दाखविला आहे. तसाच बोध इतर कादंबऱ्यांतहि हवा तेवढा दाखवितां येईल. उदाहरणार्थ, 'प्रियंवदे'मध्ये नागपुरी ब्राह्मणांचे आणि नागपूरांतील लाचलुचपतींचें वर्णन येतें; शिवाय कौमार्य, वैधव्य, स्त्रीदाक्षिण्य, स्पिरिच्युअल गोष्टी वगैरेंवर चर्चा येते. पण हें वर्णन नि ही चर्चा यांचा कादंबरींतल्या कोणत्याहि कथेशीं कथादृष्ट्या समर्थनीय संबंध नाही. 'आशावादी'मध्ये, महाराष्ट्राचा वीस वर्षांचा इतिहास, वेश्यांच्या उद्धाराचा प्रश्न, ब्राह्मणेतरांचा प्रश्न वगैरेंवर जें लिखाण झालें आहे तेंहि कथेच्या उचित कक्षेंत सामावत नाही. 'भटक्या'मध्ये कित्येक प्रकरणें कथाहीन बोधाने भरलेलीं कशीं आहेत व त्यांचा कथांशीं कोठलाहि संबंध कसा नाही, हें प्रकरण १, १८, १९, २५ वगैरेंवर दृष्टि टाकली म्हणजे सहज लक्षांत येईल. या कथाहीन व कथेशीं अन्योन्याश्रय नसलेल्या बोधामुळे कथेचें सूत्र वारंवार तुटतें व कथेमुळे वाचकाची उत्कंठा जी सतत धारेवर राहावयाची ती राहात नाही.

बोधहेतूमुळे येणारा हा कथाहीन बोध जसा उत्कंठावर्धनाला मारक होतो तशीच कथांची परस्परसापेक्ष रचनाहि मारक होते. उत्कंठा सतत धारेवर ठेवण्यासाठी कथांची परस्परसापेक्ष रचना तदनुरूप ठेवावी लागते. एकच प्रधान कथा असून उपकथा त्या कथेला पोषक व त्या कथेला उठाव देण्याइतपतच महत्त्वाच्या असतील तर उत्कंठा धारेवर राहाण्यास साह्य होतें, असा सर्वसाधारण अनुभव आहे. पण केतकरांच्या कादंबऱ्यांत अशा प्रकारची कथारचना फारशी आढळत नाही. त्यांच्या कथा बऱ्याच वेळां परस्परपोषक नसतात, शिथिल असतात, हें नुकतेंच दाखविलें आहे. शिवाय त्यांत एक प्रधान कथा,

बाकीच्या उपकथा अशीहि रचना नसते. त्यांच्या अनेक कादंबऱ्यांत एका कथेऐवजी अनेक कथा प्रधान आहेत. उदाहरणार्थ, 'प्रियंवदे'मध्ये चार कथा प्रधान आहेत; 'परागंदे'मध्ये तीन कथा प्रधान आहेत; आणि 'विचक्षणे'मध्ये पांचसहा कथा प्रधान आहेत. अशा प्रकारें कथा परस्परपोषक नसल्याने व अनेक कथा प्रधान असल्याने उत्कण्ठेचें विभजन होतें आणि तिची तीव्रता विभजनाने कमी होते. 'ब्राह्मणकन्या' व 'गावसासू' यांत मात्र कथा परस्परपोषक आहेत व त्यांत एक मुख्य कथा व बाकीच्या उपकथा, अशीहि रचना आहे. त्यामुळे त्यांतील उत्कण्ठेचें विभजन होत नाही व ती विभजनाने कमी तीव्र होत नाही. त्यांतल्या त्यांत कथोपथकांची रचना उत्कण्ठावर्धनाच्या दृष्टीने 'ब्राह्मणकन्यें'त 'गावसासू'हून अधिक सरस आहे. 'ब्राह्मणकन्यें'तील सत्यव्रत-एसतेर व बिनयामिन-उषा या उपकथा मुख्य कथेशीं समकालीन आहेत. त्यामुळे, मुख्य कथेवरील लक्ष त्या क्षणभर आपणांकडे वेधतात आणि वाचकाची उत्कण्ठा चाळवून ती अधिक प्रज्वलित करतात. पण 'गावसासूं'त सर्व उपकथा, कुसुमकलिकेच्या जामातशोधनाच्या मुख्य कथेपूर्वी घडलेल्या असतात व तशाच त्या कादंबरींतहि येतात. त्यामुळे मुख्य कथेबद्दलची उत्कण्ठा चाळवून ती अधिक प्रज्वलित करण्याकडे त्यांचा उपयोग होत नाही. 'ब्राह्मणकन्या' कथोपकथांच्या रचनेंत, उत्कण्ठेच्या दृष्टीने 'गावसासू'हून सरस ठरण्यास, हेंच कारण आहे.

कथांची परस्परसापेक्ष रचनाच नव्हे तर त्यांचें व्यक्तिशः स्वरूपहि केतकर अनेकदा उत्कण्ठावर्धक राखीत नाहीत. कथा घटनाबहुल, प्रवाही, एकजिनसी आणि आंदोलनात्मक असेल तर ती तीव्र उत्कण्ठा जागृत करते. पण त्यांची कथा कधी अगदी स्थिर असते. 'प्रियंवदे'मधील रामभाऊ-प्रियंवदेची कथा हें त्याचें उत्कृष्ट उदाहरण आहे. रामभाऊ परीक्षेंत नापास होऊन बॅरिस्टरीसाठी इंग्लंडला जातो व परत येतो, एवढ्याच घटना या कथेंत सांगतां येतील. इतक्या थोड्या घटनांनी ही कथा स्थिर बनते व ती वाचकांची उत्कण्ठा खेचून घेऊं शकत नाही. कधी त्यांची कथा प्रवाही व घटनाबहुल असते; पण ती एकजिनसी नसते. उदाहरणार्थ, 'प्रियंवदे'मधील बंडूनानाच्या कथेंत तहशीलदारी व भोसला-विजय-मिल्स या मोठ्या घटना आहेत; पण या एकजिनसी नाहीत. बंडूनानाच्या आयुष्यांत त्या घडतात एवढाच

त्यांचा परस्परसंबंध आहे; पण त्यांत बाकी कांहींहि संबंध नाही. त्यांची जात एकच नाही. त्यांचा एकच गमनबिंदु नाही. त्यांच्यांत जन्यजनकभाव नाही. –किंवा त्या कलात्मक दृष्ट्या एकजिनसी नाहीत. त्यामुळे त्या घटना उत्कण्ठेला खंड पाडतात व ती कमी करतात. 'आशावादीं'तील ब्रह्मगिरींचें चरित्र व 'भटक्यां'तील भटक्याचें चरित्र यांची स्थितिहि बंह्र-नानाच्या कथेसारखीच आहे. कधीं कधीं आंदोलनात्मक रचना नसल्यामुळे केतकरांच्या कथा उत्कंठावर्धक होऊं शकत नाहीत. त्या कथांची दिशा व शेवट हीं ठरलेलीं असतात व कथा त्याप्रमाणे नाकासमोर धावत असतात. अशा कथांत 'पुढे काय' हा प्रश्नच उरत नाही व वाचकाची उत्कण्ठा झोपून राहाते. 'प्रियंवदें'तील बिंबा–हरिभय्या आणि वैजनाथ–शारदा या कथा अशा प्रकारच्या आहेत. दोन्हींत शेवटी पुनर्विवाह व्हावयाचा, हें वाचकांना अगोदर-पासून ठाऊक असतें. 'आशावादीं'तील ब्रह्मगिरी–गोदावरी या कथेचा आणि 'ब्राह्मणकन्यें'तील सत्यव्रत–एसतेर व बिनयामिन–उषा या कथांचा प्रकारहि बहुंशीं तसाच आहे.

आतापर्यंत उल्लेखिलेल्या कथा सोडतां, बाकीच्या सर्व मुख्य कथा व उपकथा उत्कंठा तेवत ठेवण्यास एकैकशः समर्थ आहेत, असें म्हणण्यास हरकत नाही. मुख्य कथांपैकी कालिंदीची कथा (ब्रा. कन्या) व कुसुमकालिकेच्या जामातशोधनाची कथा (गावसासू) या तर मुद्दाम उल्लेखिण्याइतक्या उत्कंठावर्धक आहेत. दोनींत योग्य तेवढ्या घटना आहेत, त्या एकजिनसी आहेत, त्यांत आंदोलनें आहेत, अनपेक्षितपणा किंवा विस्मयाचे धक्के आहेत, प्रवाहीपणा आहे –आणि हेंच त्या दोनींच्या उत्कंठामूलक वेधकपणाचें रहस्य आहे.

एकंदरींत पाहातां, केतकरांची कथारचना क्वचित् उत्कंठावर्धक असली तरी बहुधा ती तशी नसते, हें यावरून उघड होतें.

## २४. कथांचें वास्तव वातावरणः—

वास्तवतेच्या दृष्टीने केतकरांच्या कथांकडे पाहिलें तर त्यांपैकी बहुतेक कथा केवळ वास्तवच नव्हे तर अतिवास्तवहि दिसतात. या कथांमधील वातावरण वास्तव असतें, हें त्यांच्या वास्तवतेचें पहिलें कारण सांगतां येईल. सर्व

कादंबऱ्यांत केतकर विशिष्ट सत्य स्थलांचा उल्लेख करतात आणि त्या स्थलीं कथा खेळवीत ठेवतात. ‘ प्रियंवदे ’मध्ये त्यांनी नागपूर, रायपूर, मूर्तिजापूर, उमरावती, रत्नपूर व लंडन हीं सत्य स्थलें उल्लेखिलीं आहेत व तेथे सर्व कथा खेळवल्या आहेत. ‘ परागंदे ’मध्ये मुख्य कथाभाग अमेरिकेच्या ईशान्य भागांत घडतो व कथांमध्ये शिकॅगो, न्यूयॉर्क, कोलंबिया युनिव्हर्सिटी, न्यूजर्सी संस्थान, कोने आयलंड, वॉल्डार्फ अस्टोरिया हॉटेल वगैरे तेथील स्थळें येतात. शिवाय मुंबई, वाई, इंदूर, नागपूर येथेहि कांहीं घटना घडलेल्या आहेत. ‘ आशावादी ’चें मुख्य स्थळ नागपूर व कामटी हें आहे; पण तिच्या कथेचे कांहीं धागे मुंबई, लंडन, आफ्रिका, आयर्लंड, अमेरिका इत्यादि स्थळीं पोहोचलेले आहेत. ‘ ब्राह्मणकन्ये ’चें मुख्य कथास्थल पुणें आहे, ‘ गावसासू ’चें लंडन आहे, ‘ विचक्षणे ’चें पुन्हा पुणेंच आहे व मुख्य कथास्थलांव्यतिरिक्त या कादंबऱ्यांमधील कथांचे संबंध मुंबई, कार्ल्याचीं लेणीं, मीरत, कलकत्ता वगैरे ठिकाणीं जाऊन भिडले आहेत. मुख्य कथास्थलांमधील पेठा, रस्ते वगैरेंचीं नांवेंहि त्यांमध्ये येतात. उदाहरणार्थ, ‘ ब्राह्मणकन्यें ’त पुण्यांतील भवानी पेठ, गूळआळी, खडकवासलें तलाव, हुजूरपागा, कालव्याची बाजू, रास्ता पेठ, शंकरशेट रोड, शुक्रवार पेठ, सदाशिव पेठ वगैरेंचीं नांवें येतात व ‘ गावसासू ’त लंडनमधील कांही भागांचीं नांवें येतात. ‘ भटक्या ’मध्येहि असे सत्य स्थलांचे उल्लेख आले असून त्या त्या स्थलीं कथा घडलेल्या आहेत. अशा प्रकारें सत्य स्थलांचे उल्लेख होऊन त्या स्थलीं कथा घडल्यामुळे वास्तव वातावरण उत्पन्न होतें.

विशिष्ट सनांचे व कालाचे इतिहाससदृश रेखीव उल्लेख करून केतकर या वास्तव वातावरणांत भर घालतात. ‘ प्रियंवदें ’त त्यांनी १८९३ ते १८९७ हा कथाकाल निवडला आहे व त्याला अनुसरून बहुतेक कालनिर्देश केले आहेत. आयडाचा जन्मकाल या कथाकालाला अनुसरून नाहीं; पण ती चूक त्यांनी प्रस्तावनेमध्ये मान्य केली आहे. ‘ परागंदे ’मध्ये १९२० हा मुख्य कथाकाल आहे व त्याला अनुसरून खूपच कालनिर्देश आले आहेत. उदा० १८९५ सालीं गोविंदराव कामत अमेरिकेस जातात, १९२० सालीं कादंबरींतील प्रारंभींचें संभाषण घडतें, १९१४ सालीं मयूरी अमेरिकेस जाते, १९१८ सालीं मयूरी

अमेरिकेहून परत येण्यास निघते, १८८४च्या सुमारास प्रा. गोगटे हायस्कुलांत शिकत असतात, १९२० च्या नोव्हेंबरमध्ये रघुनंदन अमेरिकेंत दाखल होतो, १९११ मध्ये गंगाधर अमेरिकेस जातो वगैरे कालनिर्देश 'परागंदें 'त येतात.[1] 'आशावादी 'चा मुख्य कथाकाल १९२५-२६ हा आहे; 'ब्राह्मणकन्ये 'चा १९२६-३० हा आहे; 'गावसासू 'चा १९११-१२ हा आहे; 'विचक्षणे'चा १९३६-३७ हा आहे आणि त्या सर्व कादंबऱ्यांत मुख्य कथाकालाच्या अनुरोधानें इतरहि कालनिर्देश थोड्या किंवा जास्त प्रमाणांत आले आहेत. 'भटक्या 'चा मुख्य कथाकाल १९१३-१९३१ हा असून त्यांत इतर आनुषंगिक कालनिर्देशहि पुष्कळ आले आहेत. केतकर या कालनिर्देशांबरहुकूम कथेंतील सर्व घटना, सर्व कादंबऱ्यांत ठेवतात, हें विशेष होय. त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांना इतिहासाइतकीच वास्तवता आल्यासारखें वाटतें. 'प्रियंवदे 'मधील 'कायसरे-हिंद ' पदकाचा उल्लेख कालविपर्यासात्मक आहे आणि तो त्यांनी स्वतःच प्रस्तावनेंत दाखवून दिला आहे. पण असे उल्लेख अपवादभूत असून ते ध्यानांत येणें अशक्यप्रायच आहे. तेव्हा त्यांनी वास्तव वातावरण फारसें बिघडत नाही, असें म्हटल्यास चालूं शकेल.

वास्तव वातावरणाच्या निर्मितीसाठी प्रसिद्ध ऐतिहासिक घटना, प्रसंग, व्यक्ति, चर्चेचे प्रश्न वगैरेंचा उल्लेखहि केतकर वारंवार व औचित्यपूर्वक करतात. उदाहरणार्थ, 'परागंदे 'मध्ये कथाकालाला अनुरूप असे गदर आंदोलन, हरदयाळ, साक्रामांटो परिषद्, हिंदी लोकांना अमेरिकेचें नागरिकत्व नाकारणारा कायदा, इंदूरच्या तुकोजीराव होळकरांचें प्रकरण, नानकचंद, चंदावरकर, भांडारकर, शिवाजी उत्सवाबद्दल होणारी दडपशाही, रामतीर्थांची अमेरिकेस भेट वगैरेंचे उल्लेख आले आहेत. सर्वच कादंबऱ्यांत असे उल्लेख इतके होतात, की त्यांचीं उदाहरणें देण्याची गरजच नाही.

वास्तव वातावरणाच्या निर्मितीसाठी केतकर जीं वास्तव समाजवर्णनें करतात त्यांचाहि फार उपयोग होतो. त्या समाजवर्णनांनी मिळणाऱ्या पुनःप्रत्ययाचे पुरावे यापूर्वी दिले आहेत. त्यांवरून त्यांमधील वास्तवतेची चांगली कल्पना येते.

---

१. पृ. ७, ८, ६७, ७०, ७८, १६४, १०२ या ठिकाणीं कालनिर्देश अनुक्रमें सापडतील.

या वास्तव समाजवर्णनांनी वाचकाला वाटतें, की 'आपण खऱ्याखुऱ्या जगांत वावरत आहों '–आणि त्याला तसें वाटलें की वास्तव वातावरणाच्या निर्मितीचें काम फत्ते होतें.

## २५. कथांमधील अंगभूत वास्तवता:—

वातावरणामुळे कथा वास्तव वाटतात हें खरें; पण त्यांची वास्तवता केवळ वातावरणावरच अवलंबून नाही. बहुतेक कथा मुळांतच वास्तव आहेत. विविध व्यक्तींचा जीवनक्रम कसा घडतो, तेंच केतकरांना पूर्ण सत्य स्वरूपांत दाखवावयाचें होतें. त्यामुळे त्या जीवनक्रमाच्या निदर्शनासाठी त्यांनी ज्या कथा लिहिल्या त्या अर्थातच वास्तव वठल्या. 'परागंदा' व 'गावसासू' यांतील सर्व कथा त्यांनी वस्तुस्थितीच्या निदर्शनासाठी लिहिलेल्या दिसतात. 'प्रियंवदें 'तील बंडूनानाची कथाहि वस्तुस्थितिनिदर्शनासाठी लिहिलेली दिसते. 'आशावादीं 'तील जोडप्यांच्या सर्व दुय्यम कथा व गेंगणे–त्रिकूटाचा कथाभाग; 'ब्राह्मणकन्यें 'तील चिंतोपंत–मंजुळा, अप्पासाहेब–शांता, नानाभाई–उपेंद्रवज्रा यांच्या दुय्यम कथा आणि रामराव–करुणसुंदरी नी शिवशरण-तायम्मा यांचा कथाभाग यांची स्थिति तशीच वाटते. 'विचक्षणें 'तील पद्मनाथ–श्रीरंगाचार्यांच्या आश्रमाचा कथाभाग आणि बाळोबा–कृपाबाई व मधुमालती–संकर्षण यांच्या कथा हीं वगळतां बाकी सर्व कथांचें काम वस्तुस्थिति दाखविण्याचेंच बहुतेक आहे.–आणि 'भटक्यां 'त डॉ. घैसासांचें चरित्र, इलेक्शन एजंटांची सभा, रा. ब. आपट्यांची निवडणुकीची पूर्वतयारी, नर्मदाबाईचें सामायिक पतित्व या गोष्टी वगळतां बाकीचा कथाभाग त्या कामाकरताच खर्ची पडला आहे.

वास्तवाच्या वास्तव चित्रणांतच सौंदर्य असतें, असें केतकरांना वाटे. त्यामुळे सौंदर्यासाठी या कथांत त्यांनी कोठेहि कृत्रिमपणा आणलेला नाही. कथा वेधक करण्यासाठी वास्तव घटनांची कृत्रिम जुळणी बहुधा सर्वच सौंदर्यवादी कादंबरीकार करतात; पण तशी जुळणी केतकरांनी कोठेहि केलेली नाही. रहस्य, खलनायक, ओढून ताणून आणलेल्या अडचणी, भडकपणा वगैरे अवास्तवतेचा अंशसुद्धा या कथांत सापडावयाचा नाही. सर्व कथा वाचीत असतां प्रत्यक्ष जीवनक्रम आपण पाहात आहों, ही जाणीव सतत

जागृत राहाते. प्रत्यक्ष जीवनक्रमांत व्यक्तींचीं आयुष्यें कांही अंशीं निगडित असलीं तरी बऱ्याच अंशीं तीं स्वतंत्र असतात; त्यांचा ओघ विशिष्ट पर्यवसानाच्या दिशेने वहात नाही; त्यांतून कांही कलात्मक एकजिनसीपणा बहुधा प्रतीत होत नाही;--आणि हीच गोष्ट केतकरांच्या कथा वाचीत असतां दिसून येते. त्यांच्या कथा अनेकदा पूर्ण परस्पर संबद्ध नाहीत, अनेकदा त्या स्थिर, आंदोलनहीन व सरळ आहेत, हें मागे दाखविलें आहे. त्यांत कलादृष्ट्या दोष असूं शकतील; पण त्यांतच त्या कथांची आत्यंतिक वास्तवताहि आहे. केतकरांनी कोणत्या प्रत्यक्ष व्यक्तींवरून आपलीं पात्रें रंगवलीं, कोणत्या प्रत्यक्ष घटनांवरून आपल्या कथा निर्माण केल्या, तें पुढे सविस्तर दाखविलें जाईल. त्यावरून त्यांच्या कथा शुद्ध वास्तव आहेत, याबद्दल खात्री पटेल. त्यांनी ज्या विशिष्ट समाजांमधील कथा सांगितल्या आहेत त्या समाजांमधील व्यक्तींचीं चरित्रें उपलब्ध असतीं, त्या समाजांतील जीवनक्रमाचा समाजशास्त्रीय अभ्यास उपलब्ध असता; तर त्यांवरून त्यांच्या कथांची वास्तवता पडताळतां आली असती. पण सध्या तसें साहित्य फारसें उपलब्ध नाही व त्यामुळे तीं पडताळतां येत नाहीत. सध्या केतकरांच्या कादंबऱ्यां-वरूनच किंवा कथांवरूनच वास्तव स्थिति समजून घ्यावी, अशी उलट स्थिति आहे. प्रा. इरावतीबाई कर्व्यांनी त्यांच्या कादंबऱ्यांना समाजशास्त्रीय लेखनांत जें महत्त्व दिलें आहे तें या कारणामुळेच होय.[1]

## २१. कांही अवास्तव कथा:—

केतकरांच्या अतिसंख्य कथा वास्तव असल्या तरी त्यांच्या कांही कथा मात्र वास्तव नाहीत. या अवास्तव कथांचा जन्म मतप्रतिपादनाच्या हेतूने बहुधा झालेला दिसतो; आणि क्वचित् इतर हेतुहि त्यांच्या जन्माला कारणीभूत झालेले आहेत.

'प्रियंवदे'मधील हरिभय्या–बिंबा यांच्या कथेंत १८९६–९७ च्या सुमारास झालेला सहवासोत्तर पुनर्विवाह दाखविला आहे. पण त्या काळीं पुनर्विवाहसुद्धा जर विरळा होत असत तर सहवासोत्तर पुनर्विवाह होत नसत, हें उघड आहे.

---

१. लो. शि., मे–जून १९३७.

तरी सहवासोत्तर पुनर्विवाह व्हावे, हें प्रतिपादन करण्यासाठी व त्याचा वस्तुपाठ देण्यासाठी केतकरांनी हरिभय्या-बिंबा यांची कथा १८९६–९७ मध्ये ढकलली आहे. वैजनाथ-शारदा यांच्या कथेंत परिचयोत्तर व प्रेमपूर्व पुनर्विवाह दाखविला आहे. तोहि १८९६–९७ मध्ये वास्तव वाटत नाही. पण वैजनाथांसारख्या ध्येयजीवी व बिनमिळवत्या पुरुषांना मिळवित्या स्त्रियांनी लग्न करून संभाळावें, हें प्रतिपादन करण्यासाठी तसा पुनर्विवाह केतकरांनी वर्णन केला आहे.

'आशावादीं'तील ब्रह्मगिरींचा विरह व पुनर्मीलन यांची कथा अशक्य नाही; पण तींत कृत्रिमपणाचा कांही अंश आहे. ब्रह्मगिरींनीं गोदावरीला सोडून परदेशीं जाणें; पुढें गोदावरी मेली, असें समजून जगभर भटकणें; वीस वर्षांनी परत हिंदुस्थानांत येणें व आश्रमांत राहाणाऱ्या गोदावरीला डिटेक्टिव्हमार्फत त्यांचा पत्ता कळून तिच्याशीं त्यांचें पुनर्मीलन होणें; यामध्ये अद्भुताची झाक आहे. ब्रह्मगिरी जगभर कसे भटकले व हिंदुस्थानांत आल्यावर तीन महिने आशावादीपणानें प्रवाहपतित कसे झाले, हें नुसतें दाखविलें तर त्यांत कांही कथा दिसणार नाही, असें केतकरांना वाटलें असावें, व म्हणून त्यांनी गोदावरीची जोड देऊन कथा उत्पन्न केली असावी. ब्रह्मगिरींच्या कथेंत वस्तुस्थितिनिदर्शनासाठीं कथा सांगण्यापेक्षा कथेसाठीं कथा सांगण्याचा असा हेतु थोडासा प्रतीत होतो व ती प्रतीति वास्तवतेला न्यून आणते. मिसेस हंटरच्या उद्योगमंदिराचा 'आशावादीं'तील कथाभागहि स्त्रीसंस्थांची वास्तव परिस्थिति दाखविणारा नाही. त्यांत केतकरांनी स्वतःला अभिप्रेत असणारी स्त्रीसंस्था दाखविली आहे, हें सहज दिसतें.

'ब्राह्मणकन्ये'तील कालिंदीच्या कथेंत अकुलीनपणामुळें कालिंदी एका वाण्याची रखेली होते, असें दाखविलें आहे. पण १९३० च्या सुमारास जातिभेद फारसा कडक राहिलेला नव्हता व तत्पूर्वी रखेलीच्या मुलीशींहि लग्न करणारे अप्पासाहेबांसारखे सुधारक होते, असें केतकरांनीच दाखविलें आहे. तेव्हा अकुलीनपणामुळे कालिंदीने वाण्याची रखेली व्हावें, हें वास्तव वाटत नाही. अकुलीनपणामुळे कालिंदीच्या लग्नांत केतकरांनी पुष्कळ अडचणी दाखविल्या असत्या, तिला अविवाहित ठेवलें असतें किंवा अविवाहित स्थितींत तिचे गुप्त, वाकडे संबंध दाखविले असते तर तें वास्तव ठरलें असतें. पण ती रखेली होते, हें वास्तव नाही. सुधारक नेते वेश्याकन्यांच्या उद्धाराच्या गप्पा मारतात,

अप्पासाहेबांसारखे तरुण त्या गप्पांना भुलतात, ते शांतेसारख्या रखेलीच्या मुलींशीं लग्नें करतात व मग त्यांच्या मुलांचें जीवन कठिण होतें, म्हणून सुधारकांवर केतकरांना भडिमार करावयाचा होता. तो भडिमार करण्याच्या भरांत कालिंदीला रखेली बनविण्याचा भडकपणा त्यांनी पतकरलेला दिसतो. या भडकपणांतील अवास्तवपणा त्यांनाहि जाणवलेला असावा व म्हणूनच त्यांनी सत्यव्रताला अनेक अंदाज करावयास लावून कालिंदीच्या कृत्यामधील सयुक्तिकपणाची चर्चा कादंबरींत केली असावी. शिवशरणशीं बिनसल्यावर कालिंदीला एका बेनेइस्रायल कुटुंबांत आश्रय मिळतो, ही घटनाहि अवास्तव आहे. बेनेइस्रायलांचें समाजवर्णन करतां यावें व सत्यव्रत–एसतेर, उषा–बिनयामिन हे हिंदु–बेनेइस्रायलांचे इष्ट वाटणारे विवाह लावतां यावे म्हणूनच कालिंदीला बेनेइस्रायलांकडे केतकरांनी आश्रय दिलेला दिसतो. रामराव मूल झालेल्या व रखेली म्हणून दुसऱ्याकडे राहिलेल्या कालिंदीला पत्नी म्हणून स्वीकारतो, यामध्ये वास्तवता असेल; पण वास्तवतेपेक्षा इष्ट वर्णनच त्यांत अधिक दिसतें.

'विचक्षणे'तील बाळोबा–कृपा या हिंदु–ख्रिश्चन विवाहावर व पद्मनाभ–श्रीरंगाचार्यांच्या आश्रमाला दिलेल्या अद्ययावत् आकर्षक स्वरूपावर इष्टवर्णनाची अशीच दाट झाक पसरलेली आहे. असे विवाह व असे आश्रम असतात, असें म्हणण्यापेक्षा असे विवाह व असे आश्रम असावेत, असें म्हणण्याचा त्यांत स्पष्ट अभिप्राय दिसतो. मधुमालती–संकर्षण यांच्या कथेंत मधुमालती संकर्षणासह पळून जाते, ही घटना अवास्तव आहे. मधुमालती विधवा होती, प्रौढ होती, म्हणजे तिला जगाचा अनुभव होता; आपले वडील प्रा. लोंढे यांचे विचार अत्यंत उदार आहेत, हें तिला माहीत होतें. तेव्हां तिनें लग्नासाठी पळून कां जावें, तें कळत नाही. पण केतकरांनी, बहुधा घाटे-पतिपत्नींची कथा कादंबरींत आणण्यासाठी, मधुमालतीला पळून जावयास लावलें आहे आणि अवास्तवतेचा दोष पतकरला आहे.

'भटक्या'मध्ये डॉ. घैसासांच्या चरित्राची घडण विशिष्ट विचार सांगण्यास अनुरूप अशी मुद्दाम घडविलेली दिसते, त्यामुळे तींत अवास्तवपणाचा अंश येतो. इलेक्शन एजंटांची सभा, रा. ब. आपट्यांची निवडणुकीची पूर्वतयारी, नर्मदाबाईचें सामायिक पातित्व वगैरेंमध्ये वास्तवता आहे; पण तीहून इष्टवर्णन अधिक आहे. असो.

समाजाचें सत्य स्वरूप वर्णन करण्याचा जो बोधहेतु केतकरांच्या मनांत होता त्यामुळे त्यांच्या कथा वास्तव किंवा अतिवास्तव कशा बनल्या, हें या-पूर्वीच्या कांडांत स्पष्ट होतें. केतकरांच्या मनांत विचारकथनाचा किंवा प्रतिपादनाचा जो बोधहेतु होता त्यामुळे त्यांच्या कांहीं कथा अवास्तवहि कशा बनल्या, तें प्रस्तुत कांडावरून स्पष्ट होईल.[1]

## २७. वास्तवता व इतर गुणः—

केतकरांच्या अतिसंख्य कथा वास्तव आहेत; पण वास्तवतेमुळे त्या सामान्य व परिचयाच्या आहेत, असें मात्र नाहीं. त्या कथांचें क्षेत्र अमेरिकेपासून हिंदुस्थानापर्यंत पसरलेलें आहे, त्यांत अत्यंत विविध सामाजिक परिस्थिति अभिप्रेत आहे, शिवाय त्यांत व्यक्तींच्या जीवनक्रमाचे भिन्न नमुने आले आहेत, व त्यामुळे त्या अत्यंत अभिनव वठल्या आहेत. वैविध्य, नावीन्य व वास्तवता, हेंच त्या कथांचें मुख्य आकर्षण आहे. या आकर्षणावर ज्याचें मन खिळेल तो वाचक त्या कथांमधील विस्कळितपणा, स्थिरपणा, आंदोलनाचा अभाव, अनपेक्षितपणाचा अभाव वगैरे दोषांकडे दुर्लक्ष करील. त्याला ते दोष म्हणजे दोषच नव्हेत, असें वाटण्याचाहि संभव आहे.

## २८. कांहीं पहिल्या दर्जाचीं पात्रें:—

केतकरांनी सर्व कादंबऱ्यांत मिळून सुमारें शंभर ते सव्वाशे पात्रें निर्माण केलीं आहेत. पण त्या पात्रांच्या सर्वांगीण व परिणामकारक चित्रणाकडे त्यांनी पुरेसें लक्ष पुरवलेलें नाहीं. त्यांनी ज्या पात्रांचें बरेचसें सर्वांगीण व परिणाम-कारक चित्रण केलें आहे व जीं पात्रें मराठींतील पहिल्या दर्जाच्या पात्रांत गणलीं जातील अशीं पात्रें दहाच्यावर भरतील कीं नाहीं, याची शंकाच आहे. त्यांच्या पहिल्या दर्जाच्या पात्रांत वैजनाथ, प्रियंवदा, गंगाधर, रघुनंदन, रुक्मिणी; ब्रह्मगिरी; कुसुमकलिका; व डॉ. तर्कटे एवढ्या पात्रांचा समावेश

---

१. सत्यकथा, ऑगस्ट १९४९ ते पुढे, 'डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या' या लेखमालेंत कु. दुर्गा भागवत यांनी कालविसंगतीचीं दाखविलेलीं उदाहरणेंहि अवास्तवतेच्या दृष्टीने चिन्त्य आहेत.

करतां येईल. हीं पहिल्या दर्जाचीं पात्रें त्यांनी कशीं रंगविलीं आहेत तें पाहिलें, की त्यांच्या पात्रचित्रणाच्या स्वरूपाचें बरेंच आकलन होतें.

या पात्रांपैकी वैजनाथ या पात्राचा क्रम सर्वांत वरचा लागेल, इतकें तें अत्युत्तम वठलें आहे. पात्र वाचकाच्या दृष्टीसमोर उभें करण्यासाठी त्याचें बहिरंग वर्णन करावें लागतें आणि त्यांत पात्राचा वेष, शरीराची ठेवण, लकबी, भाषा वगैरेंचा समावेश करावा लागतो. 'प्रियंवदे 'मध्ये व 'ब्राह्मणकन्ये 'मध्ये जेव्हा वैजनाथ प्रकट होतात तेव्हा त्यांचें अशा प्रकारचें बहिरंग बऱ्याच परिणामकारक रीतीनें सांगितलें जातें. वैजनाथांचा वेष, भाषा व त्यांच्या वर्तुणुकीमधील लकबी एकदम मन वेधून घेतात. शंकऱ्या भागवत, म्हाद्या रानडे वगैरे एकेरी नांवें घेऊन थोर लोकांबद्दल हे वैजनाथ बोलतात. मधून विडी ओढण्याची त्यांना तलफ येते. बोलतां बोलतां विचार करण्यासाठी ते डोळे मिटतात. संशोधनाच्या कार्यांत मग्न असतां जेवणा-खाणाची त्यांना पर्वा राहात नाही. पाण्यांत भिजविलेले पोहे व गूळ यांवर त्यांची वेळ भागते. पण ताजी दशमी, तूप व लोणच्याच्या फोडी कोणी प्रेमानें दिल्या तर ते खुशालून जातात. मात्र जर का ही सुखाभिलाषा आहे, अशी नुसती पुसट शंका आली तर तडातड स्वतःच्या पन्नास थोबाडींत मारून घेण्याची त्यांची तयारी असते! वैजनाथांच्या बहिरंगाचें असें वैशिष्ट्यपूर्ण वर्णन झाल्यामुळे वैजनाथ कल्पनाचक्षूंपुढे खडे उभे राहातात आणि वाचकाचें मन चटकन वेधतात.

बहिरंगाप्रमाणे पात्राचा स्वभाव, त्याचा जीवनक्रम व त्याचे विचार यांमधील वैशिष्ट्यें दाखविलीं, की तें पात्र चांगलें जीवंत आणि परिपूर्ण होतें. वैजनाथांचें पात्र असें जीवंत व परिपूर्ण झालें आहे, यांत शंका नाही. रत्नपूरच्या ऐतिहासिक परिसरांत एका शिलालेखाचा ठसा घेत असतां वैजनाथ दृष्टीस पडतात व त्यांच्या संशोधकाच्या जीवनक्रमाची चांगली ओळख होते. त्यांचा जीवनक्रम केवळ संशोधकाचा नसून विमर्शकाचा ( 'थिंकर'चा ) आहे, हें त्यांच्या भाषणांतून सारखें प्रतीत होतें. त्यांच्या मृत्यूच्या वेळींहि कोकणांतील हस्तलिखितांसाठी ते कोकणांत गेलेले असतात व तेथेच संशोधकास उचित असा त्यांचा अंत होतो. 'ज्वलन्निव ब्रह्ममयेन तेजसा' असा त्यांचा स्वभाव आहे, त्यांत विक्षिप्तपणा काठोकाठ भरलेला आहे, त्यांत रोगांचें भय आहे,

कडकडीत तपस्वी बाणा आहे आणि प्रतिक्षणीं दुसऱ्याला जाणवणारा रसरशीत व ' जगत्तुच्छं मन्ये ' म्हणणारा आर्ष अहंभाव आहे. जीवनक्रम व स्वभाव याप्रमाणे त्यांचे विचारहि स्मरणीय आहेत. त्यांची ऋषिमंडळाची कल्पना, स्त्रीसत्ताक कुटुंबपद्धतीच्या पुनरुज्जीवनाची कल्पना वगैरेंमधील विचार इतके उत्तुंग, इतके विलक्षण आहेत, की त्या विचारांवरच मी मी म्हणणाऱ्या विचारवंतांनी गुंग होऊन जावें. शारदाबाईशीं किंवा अप्पासाहेब डग्गयांशीं वैजनाथांचीं जीं संभाषणें होतात, त्यांमध्येहि त्यांचे विचार, त्यांतला एकांडेपणा, विचित्रपणा वगैरे सतत मनावर बिंबत राहातात.

उत्कृष्ट पात्रचित्रणाचें एक गमक असें आहे, की त्यांत पात्राचीं विविध वैशिष्ट्यें एकदाच सलग सांगून भागत नाही. तीं पुनःपुनः वेगवेगळ्या प्रसंगांनी वाचकांपुढे यावीं लागतात व वाचकांच्या मनांत भिनावीं लागतात. वैजनाथ ' प्रियंवदे'त ' व ' ब्राह्मणकन्ये'त असे दोनदा येत असल्यामुळे त्यांच्या बाबतींत हें साहजिकच घडतें. केतकर वैजनाथांचीं ' प्रियंवदे 'तील सर्व वैशिष्ट्यें ' ब्राह्मणकन्ये 'त निरनिराळ्या संदर्भात पण जशींच्या तशीं चितारतात व वैजनाथांचा ठसा वाचकाच्या मनावर जणू वज्रलेप होऊन राहातो. वैजनाथांचें पात्रचित्रण असें सर्वांगपरिपूर्ण व उत्कृष्ट आहे.

केतकरांचीं जीं इतर पहिल्या दर्जाचीं पात्रें आहेत त्यांचा प्रकार मात्र वैजनाथांसारखा नाही. त्या पात्रांचें चित्रण बहुंगलक्षी असलें तरी सर्वांगलक्षी नाही आणि शिवाय पात्रवैशिष्ट्यें पुनःपुनः वाचकांसमोर येऊन पात्र जें ठसठशीत व्हावें लागतें तेंहि कित्येक पात्रांच्या बाबतींत होत नाही. मात्र या पात्रांचीं जीं अंगें केतकर दाखवितात तीं फार वेधक व वैशिष्ट्यपूर्ण असतात; त्यांत कृत्रिमपणा किंवा अस्वाभाविकपणा क्वचितच असतो आणि त्यामुळे तीं पात्रें वाचकांच्या मनाचा चांगला तावा घेतात.

' प्रियंवदे 'मधील प्रियंवदा हें असेंच एक पात्र आहे. सभेच्या वेळीं पोरांना चिमटे काढून गंमत करण्याचा खोडकरपणा प्रियंवदेमध्ये आहे. नवरा अभ्यासाला बसला म्हणजे त्याच्यावर संत्र्याच्या साली फेकून लपून बसावें, त्याला शृंगारिक श्लोकांचे अर्थ मुद्दाम विचारावे, तो इंग्लंडला गेला की ' लाडक्या नवऱ्या ' असा मायना घालून त्याला आकर्षक पत्रें लिहावीं— अशी ती शृंगाराप्रिय आणि खेळकर आहे. तिच्यांत या प्रकारच्या स्वभाव-

वैशिष्ट्याबरोबर कांही वैचारिक चमक आहे व विचारवैशिष्ट्य आहे. ‘ स्त्री म्हणजे राष्ट्र ’ हा तिचा विचार कोणाच्याहि लक्षांत राहील आणि तिने पाश्चात्य स्त्रियांच्या पुरुषाकर्षणाची उडविलेली रेवडी बऱ्याच जणांना गमतीची वाटेल. तिचा विरही जीवनक्रम केतकर असा तपशीलवार देतात, की त्यामुळे तिची ओळख चिरकाल राहावी. प्रियंवदा अशी वैशिष्ट्यपूर्ण, जीवंत व म्हणून वेधक आहे. पण तिचें बाह्यांगवर्णन फडक्यांच्या कुशलतेने किंवा आस्थेने ते कोठेहि देत नाहीत. ती “ अत्यंत देखणी ” असल्याचें ते एकदा सांगतात; पण त्या सांगण्यांत कांहीच हशील नाही. कारण त्यांचीं वहुतेक स्त्रीपात्रें अशींच ‘ देखणीं ’ असतात. त्यांची शांताबाई ( परागंदा ), त्यांची कालिंदी, त्यांची कपिला, त्यांची मत्तमयूरी वगैरे सर्वच देखण्या आहेत ! मग प्रियंवदा जर तशीच देखणी असेल तर तिचें विशिष्ट चित्र वाचकांपुढे कसें उभें राहावें ?

‘ परागंदे ’मधील गंगाधर त्याच्या ज्वलन्त देशप्रेमामुळें, रसरशीत स्वाभिमानामुळे, नेटामुळे, प्रामाणिकपणामुळे, परागंदा देशभक्ताच्या विशिष्ट जीवनक्रमामुळे व माणुसकीमुळे मनाचा ठाव घेतो. गदर चळवळीबद्दलचे त्याचे स्वतंत्र विचार ऐकून त्याची वैचारिक कुवतहि मनावर बिंबते. पण तो दिसे कसा, बोले कसा, हसे कसा, तें केतकर कोठेच सांगत नाहीत आणि त्याच्या चित्रणांत बाह्यांगवर्णनाची उणीव भासतेच. शिवाय त्याचीं सर्व वैशिष्ट्यें पुनःपुनः वाचकांसमोर आणून त्याचें चित्रण पुरेसें ठसठशीत करण्याची काळजीहि केतकरांनी घेतलेली नाही.

‘ परागंदे ’तील रुक्मिणी प्रियंवदेसारखीच अव्याजमनोहर आहे. तिच्या जीवनांतील कारुण्य, तिचें मार्दव, तिच्या स्वभावांतील ऋजुता, तिचा मोठ्या जगाशीं असलेला अपरिचितपणा, नवऱ्यावर रुसण्याची तिची अपुरी इच्छा वगैरे वैशिष्ट्यांनी ती मन मोहून टाकते. “ रुक्मिणी ही आर्य स्त्रीचा केतकरांच्या कादंबरींतला एक उत्कृष्ट नमुना आहे.” असें जें दुर्गाबाई भागवतांनी म्हटलें आहे, तें खरें वाटतें.[1] पण ‘ रुक्मिणी ’ मध्ये इतके अंगभूत आकर्षक विशेष असूनहि तिचें चित्रण वैशिष्ट्यांच्या पुनरुक्तीने ठळक करण्याची काळजी

१. सत्यकथा, सप्टें. १९४९.

केतकर हवी तेवढी घेत नाहीत, असें वाटतेंच. रुक्मिणीची तुलना प्रियंवदेशीं केली म्हणजे हें लक्षांत भरतें. प्रियंवदेची शृंगारप्रियता व तिचा खव्याळपणा केतकरांनी किती परोपरीने सांगितला आहे; पण रुक्मिणीचें कारुण्य, मार्दव वगैरे विशेष ते तितक्या परोपरींने सांगत नाहीत. शिवाय रुक्मिणी देखणी होती, एवढेंच सांगून ते तिचें बाह्यांगवर्णन संपवून टाकतात.

'प्रियंवदें' तील रघुनंदन त्याच्या उत्साहामुळे, खेळाडूपणामुळे, चावट व धटिंगण शृंगारामुळे, धष्टपुष्ट व उंचनिंच बांध्यामुळे छानदार वठला आहे; पण त्याच्या चित्रणांत निष्काळजीपणाचा किंवा धसमुसळेपणाचा दोष आहेच. तो हुशार अर्थशास्त्रज्ञ होता; "अमेरिकेंतील अनेक हिंदूंपेक्षा हिंदुस्थानच्या सामाजिक व राजकीय प्रश्नांवर अधिक माहिती असलेला व अधिक विचार करणारा होता."[१]—असें कादंबरी संपत आल्यावर केतकर सांगतात व त्याच्या पूर्वोक्त वर्णनाला जोड लावतात; पण तो जोड नीट सांधलेला नाही. केतकरांना रघुनंदनकरवी इंग्लंडमधील व हिंदुस्थानांतील कांही सामाजिक व आर्थिक प्रश्न पुढे आणावयाचे होते व म्हणून त्यांनी तो जोड दिला आहे, हें लपूं शकत नाही. केतकरांनी रघुनंदनचा समाजशास्त्रीय व अर्थशास्त्रीय अभ्यास जाणवेल, अशी प्रारंभापासून व्यवस्था केली असती तरच हा जोड, जोड वाटला नसता. पण उत्कृष्ट पात्राच्या चित्रणांतहि काळजी व बारकावा ठेवला तर मग ते केतकर कसले ?

'आशावादीं' तील ब्रह्मगिरीच्या चित्रणांत काळजी व बारकावा यांचा असाच अभाव आहे. ब्रह्मगिरी आशावादी विचारांवर कसे तरंगत असतात, त्यांचे विचार कसे भेदक पण मुलुखावेगळे असतात, ते कामभावनेने कसे अनेकदा मोहाच्या काठावर जाऊनदेखील बचावतात, त्यांचा जीवनक्रम एखाद्या "भूगोलतुडव्या" भटक्यासारखा कसा होतो, तें केतकरांनी फारच बहारीने दाखविलें आहे. पण विचार, भटकेपणा व कामभावना म्हणजे कांही पूर्ण पात्र नव्हे. त्या पात्राला याव्यतिरिक्त कांही भावना, कांही स्वभाव असला पाहिजे व तो निदान ब्रह्मगिरीसारख्या मध्यवर्ती पात्राचे बाबतींत तरी सांगितला पाहिजे. ब्रह्मगिरीचे विचार राष्ट्रविकासाबद्दल आहेत; तेव्हा

---

१. पृ. १४९.

गंगाधराप्रमाणे त्याची देशभक्ति केतकरांना उत्कटतेने दाखवितां आली असती. पण केतकर तसें कांही करीत नाहीत. ब्रह्मगिरीच्या छाटीचा व सूटचा उल्लेख वगळतां त्याचें बाह्यांगवर्णनहि ते करीत नाहीत. त्यामुळे ब्रह्मगिरीचें चित्रण अपुरें वाटतें. हें चित्रण पूर्ण करण्याचें सामर्थ्य केतकरांमध्ये पुरेपूर होतें; पण निष्काळजीपणामुळे तें त्यांनी वापरलें नाही.

'गावसासू' मधील कुसुमकलिकेचें चित्रण त्यांनी बरेंच पूर्ण व बरेंच यशस्वी आहे. केलें सर्व कादंबरींत कुसुमकलिका मध्यवर्ती असल्याने तिच्या स्वभावांतील विशेष पुनःपुनः प्रकट होऊन परिणामकारक होतात. तिची 'जावईपकडूपणा 'ची खटपट व लटपट, स्वार्थीपणा, कावेबाजपणा, वात्सल्य, सावत्र मुलाचा जहरी मत्सर, नैतिक वर्तनांतील पघळपणा वगैरे विशेष तिच्या चित्राला पूर्णता आणतात. पण तिच्या बाह्यांगवर्णनाकडे केतकरांनी दुर्लक्ष केलें आहे, असें म्हणावें लागतें. त्यांनी जान्हवी कैलासनाथ हें जे कादंबरींतील दुय्यम पात्र त्याचे तोंडावरील देवीचे वण, श्यामल वर्ण, धूम्रपान, सिगारेटच्या डबीचा अभिमान वगैरे विशेष सांगितले आहेत; पण कुसुमकलिकेचे असे बाह्य विशेष सांगितले नाहीत, हें तर फारच आश्चर्य. नित्याप्रमाणे कुसुमकलिका देखणी होती, एवढें सांगून त्यांनी काम भागविलें आहे.

' विचक्षणे 'तील डॉ. तर्कटयांचें नांव उत्कृष्ट पात्रांच्या संदर्भात घेतां येऊं शकेल. डॉ. तर्कटे त्यांच्या अत्यंत सनातनी पण अत्यंत पुरोगामी अशा विक्षिप्त नी अभिनव विचारांनी ध्यानांत राहातात; पण विचार हेंच कांही त्यांचें एकमेव वैशिष्ट्य नाही. नायकिणीची पोरगी होड लावून पळवून आणणारा, तिला रखेली ठेवणारा व तिच्यासह न डरतां समाजांत वावरणारा हा डॉक्टर आपल्या जीवनक्रमांतहि वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांचें बाह्य वर्तन पाहावें तर त्यांतहि वैशिष्ट्य आहेच. फटकळपणा, स्पष्टवक्तेपणा, एखाद्याच्या ताठ कॉलरवरून त्याच्याबद्दल अंदाज बांधण्याचा तऱ्हेवाईकपणा वगैरे हवीं तेवढीं वैशिष्ट्यें त्यांच्या बाह्य वर्तनांत आहेत. पण असें अनेक वैशिष्ट्यांनी उत्कृष्ट झालेलें पात्रहि केतकरांनी काळजीपूर्वक परिपूर्ण केलेलें नाही. डॉ. तर्कटे कसे दिसत, तें केतकर कोठेच सांगत नाहीत आणि त्यांचें विक्षिप्त वागणें, बोलणें व विचार याशिवाय त्यांच्या अंतरंगाचा कसलीहि ओळख देत नाहीत. त्यामुळे त्यांच्या चित्रणाला अपूर्णतेचा ठळक डाग लागला आहे.

## २१. पात्रचित्रणांतील दोन दोषः—

सर्वच पात्रांचें चित्रण सर्वांगलक्षी असावें, अशी अपेक्षा नसते; पण जीं पात्रें आपल्या विशिष्ट अंगांमुळे पहिल्या प्रतींत जाऊन बसतात त्यांचें चित्रण सर्वांगलक्षी असावें, त्यांत न्यून नसावें, अशी अपेक्षा असते. त्या अपेक्षेच्या दृष्टीनेच पहिल्या प्रतीच्या पात्रांच्या चित्रणांतील न्यून वर · दोषस्वरूप ठरविलें आहे.

कादंबरींत ज्या पात्राच्या कथेला अग्रमहत्त्व असेल त्या पात्राचें चित्रणहि पहिल्या प्रतीच्या पात्राच्या चित्रणाप्रमाणे सर्वांगलक्षी असलें पाहिजे. पण तेथेहि केतकर न्यूनें ठेवतात, असें दिसतें. ' आशावादीं'त ब्रह्मगिरीच्या कथेला व ' गावसासूं'त कुसुमकलिकेच्या कथेला अग्रमहत्त्व आहे; पण त्या पात्रांचें चित्रण अपूर्ण आहे, हें वर येऊन गेलें आहे. ' ब्राह्मणकन्ये'त अग्रमहत्त्वाचा मान कालिंदीच्या कथेला मिळतो; पण तिच्या चित्रणांत केतकर अक्षम्य अपुरेपणा ठेवतात. कालिंदी तिच्या विशिष्ट, भडक जीवनक्रमामुळे लक्षांत राहाते. एका वाण्याची रखेली म्हणून जीवन कंठीत असतां व त्याच्यापासून मूल झाल्यावर आणखी एका पुरुषाशीं प्रेमसंबंध ठेवीत असतां ती जी नैतिक उदात्तता प्रकट करते तीमुळेहि ती मनावर ठसते. पण एकंदरींत, सामान्यपणें स्वभावाचे जे असंख्य प्रकार दृष्टीस पडतात त्यांतलाच एक स्वभाव म्हणजे तिचा स्वभाव आहे. तिच्या जीवनांतील विलक्षण घटनांची प्रतिक्रिया त्या स्वभावांत छान दिसते. पण तो स्वभाव सामान्याच्या किंवा दृढभाजकाच्या किंवा प्रकाराच्या पलीकडे जात नाही. त्यांत पृथगात्मता नाही, ठळक वैशिष्ट्य नाही किंवा स्वयंभू, विशिष्ट व्यक्तिमत्व नाही. तिला कांही विशिष्ट बाह्य रंगरूपहि केतकर देत नाहीत. तिचा पोषाख, तिचें सौंदर्य, तिच्या बोलण्याचालण्यांतील ढब यांचा पत्ताच लागत नाही. त्यामुळे हा अपुरेपणा उद्भवतो.[1] ' भटक्या'मध्ये

---

१ " कालिंदी ही केतकरांनी निर्मिलेल्या व्यक्तिरेखांत एक विशेश स्पष्ट व बांधेसूद अशी व्यक्तिरेखा झाली आहे." असें प्रा. कुसुमावती देशपांडे म्हणतात. पाहाः ' मराठी कादंबरी ' पृ. १७६ त्यांचें मत येथे तुलनेसाठी चिन्तनीय आहे.

' भटक्या'ची कथा सूत्रभूत असतांहि त्याच्या चित्रणांत या अपुरेपणाचा कळस होतो. ' भटक्या ' प्रथमपुरुषी कथन करीत असल्यामुळे त्याचें नांव कळण्याची मारामार पडते! त्याच्या बाह्य व्यक्तित्वाचें वर्णन डिटेक्टिव्ह नेमूनहि कोठे सापडावयाचें नाही. त्याला कांही स्वभाव असलाच तर तो पाण्यासारखा पाणचट, रंगहीन व रूपहीन आहे. त्याच्यांत विचारवैशिष्ट्य कांहीच नाही आणि त्याला जरी भटकेपणाचा वैशिष्ट्यपूर्ण जीवनक्रम आहे तरी त्याच्या अवलोकनकथनाला एवढें महत्त्व आलें आहे, की तो जीवनक्रम मनावर मुळीच बिंबत नाही. कादंबरींत ज्याची कथा सूत्रभूत आहे त्या पात्राची एवढी दुर्दशा इतरत्र क्वचितच झाली असेल.

दुय्यम पात्राचें चित्रण सर्वांगलक्षी नसलें, बव्हंगलक्षी किंवा अल्पांगलक्षी असलें तरी चालतें. त्या दृष्टीनें केतकरांच्या दुय्यम पात्रांत फारसा दोष दाखवितां येणार नाही. पण कधी कधी दुय्यम पात्रांचें चित्रण ते अल्पांगलक्षी नव्हे तर एकांगलक्षी किंवा शून्यांगलक्षी करतात!—आणि तें दोषास्पद वाटतें. उदाहरणार्थ, ' आशावादीं 'तील मोरे व कपिला नुसते विचारच बोलतात आणि 'भटक्यां'तील नर्मदाबाई सरवळ्यांना फक्त विशिष्ट जीवनक्रमच आहे. ' गावसासू 'तील प्रारंभींच्या तीनचार प्रकरणांतील नीतिसेन छबिलदास, भंमाणी, मश्रूवाला वगैरे पात्रांचीं तर फक्त नांवेंच कळतात; पण बाकी तीं परब्रह्मासारखीं निर्गुण, निर्विकार व शून्य आहेत! सारांश, केतकरांच्या प्रधान व अप्रधान पात्रांत चित्रणाचा अपुरेपणा हा एक ठळक दोष आहे, यांत शंका नाही.

पौनःपुन्याने पात्रचित्रण ठसठशीत व परिणामकारक न करणें हा दुसरा दोष केतकरांच्या पात्रचित्रणांत वारंवार जाणवतो. गंगाधर व रुक्मिणी या पात्रांची नुकतीच केलेली चर्चा आठवली म्हणजे हा दोष प्रधान किंवा पहिल्या प्रतीच्या पात्रांच्या चित्रणालाहि कसा चिकटला आहे, तें स्पष्ट होईल. कांही विशेष अपवाद वगळले तर तो दोष बऱ्याच दुय्यम पात्रांच्या चित्रणांतहि थोडाबहुत दिसतो. उदाहरणार्थ, ' भटक्यां 'तील भटक्या वगळतां सर्व पात्रें एकेका कालखंडांत रंगभूमीवर येतात व अदृश्य होतात; त्यामुळे त्यांची वैशिष्ट्यें फिरून फिरून दृष्टीसमोर येत नाहीत व तीं पात्रें ठसठशीत नी परिणामकारक होत : नाहीत. ' परागंदें 'तील विल्कॉक्स पतिपत्नी,

'आशावादीं'तील सर दामोदर व बॅ. विश्वामित्र, 'गावसासू'तील ललिता दास वगैरेंची स्थितिहि तशीच आहे.

## ३०. दोषांची कारणमीमांसा:—

केतकरांच्या पात्रचित्रणांत चित्रणाचा अपुरेपणा व पौनःपुन्याने चित्रण ठसठशीत न करणें हे जे दोन दोष आहेत ते उत्पन्न होण्याला विविध कारणें दिसतात. पैकी एक कारण म्हणजे त्यांच्या पात्रांची अतिरिक्त संख्या होय. त्यांनी विषयनिष्ठ कादंबऱ्या लिहिल्यामुळे विशिष्ट विषयाचीं अनेक अंगोपांगें एकाच कादंबरींत त्यांना दर्शवावीं लागलीं व त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांत 'परागंदे'प्रमाणे किंवा 'विचक्षणे'प्रमाणे पात्रसंख्या फारच फुगली. आपल्या डोक्यांत असलेल्या शेकडो व्यक्ति जीवनक्रमाच्या किंवा अन्य वैशिष्ट्यामुळे वाङ्मयांत नोंदवाव्या अशी त्यांना घाई होती. त्यामुळेहि 'आशावादी'प्रमाणे किंवा 'भटक्या'प्रमाणे त्यांची पात्रसंख्या वाढली. —आणि क्वचित् नाना प्रकारचे विचार सांगण्यासाठीच मोरे, कपिला यांसारखीं पात्रें उत्पन्न करावीं लागून त्यांच्या पात्रसंख्येला आणखी भरती आली. त्यांची पात्रसंख्या अशी नाना कारणांनी अतिरिक्त झाल्यामुळे पात्रचित्रणासाठी त्यांना वाव राहिला नाही व त्यांच्या पात्रचित्रणांत अपूर्णतेचा दोष राहिला. पात्रांचीं वैशिष्ट्यें पुनःपुनः पुढे आणून पात्रें ठसठशीत करण्यामध्येहि ही पात्रांची अतिरिक्त संख्याच त्यांना आडवी आली.

त्यांच्या पात्रचित्रणांतील दोषांमागे पात्रसंख्येप्रमाणे असणारें दुसरें कारण म्हणजे त्यांच्यांतील कलात्मक दृष्टीचा अभाव हें होय. त्यांच्यांत कलात्मक दृष्टि असती तर त्यांनी पात्रचित्रणांतले उपर्युक्त दोष टाळले असते, असें वाटतें. त्यांची दृष्टि कलेकडे नसून बोधाकडे असे. व्यक्तींत कांही 'नवें' असेल तरच तें सांगण्यांत त्यांना स्वारस्य वाटे व तेंच-तें पुन्हा सांगण्यांत— सौंदर्यासाठी, कलेसाठी— पुन्हा सांगण्यांत त्यांना कालापव्यय झाल्याचें दुःख होई. त्यामुळे त्यांनी चित्रणें अपुरीं ठेविलीं व पौनःपुन्य टाळलें.

कित्येकदा पात्रचित्रणामधील दोषांमागे त्यांची असमर्थताहि कारणरूपाने उभी आहे. त्यांनी (वैजनाथांचा अपवाद वगळतां) कोणत्याहि पात्राच्या शारीरिक ठेवणीचें व पोषाखाचें रेखीव, ठळक व हुबेहूब वर्णन केलेलें नाही.

( वैजनाथ व होरमसजी पेनांगवाला यांचे अपवाद वगळतां ) एकाहि पात्राच्या बाबतींत पात्रविशिष्ट भाषा वापरलेली नाही; तेव्हा तसें करण्याला ते असमर्थ होते, असेंच म्हणावें लागतें.

‘ गावसासू ’ प्रमाणे रंगरूपहीन ५-७ शून्य पात्रें जेव्हा ते पुढे आणतात तेव्हा मात्र, सकारण फुगलेली पात्रसंख्या, कलात्मक दृष्टीचा अभाव, चित्रणाची असमर्थता यांपैकी कोणतेंच कारण संभवत नाही. तेव्हा एकच कारण संभवतें; तें म्हणजे त्यांचा भोंगळपणा व त्यांची दडपेगिरी !

## ३१. पात्रचित्रणांतील ठळक गुणः—

केतकरांच्या पात्रचित्रणांत कांहीहि दोष असले तरी त्यांचीं पात्रें अत्यंत रसरशीत, जीवंत व वास्तव आहेत, यांत शंका नाही. त्यांच्या पात्रांत कृत्रिमपणा, अस्वाभाविकपणा वगैरे दोष सहसा सापडावयाचे नाहीत. त्यांनी अतिमानुष किंवा अमानुष असें एकहि पात्र रंगविलेलें नाही, ही त्यांच्या स्वाभाविक पात्रचित्रणाची एक खूण आहे. पात्राच्या स्वभावांत अनैसर्गिक परिवर्तन त्यांनी कोठेहि दाखविलेलें नाही, ही त्यांच्या स्वाभाविक पात्रचित्रणाची दुसरी खूण आहे. ते पात्रांचीं कांही अंगेंच उजेडांत आणतात; पण तीं अंगें पूर्णपणें वास्तव, वैशिष्ट्यपूर्ण आणि वेधक असतात. वर त्यांच्या पहिल्या दर्जाच्या पात्रांचें जें विवरण केलें आहे त्यावरून तर हें ध्यानांत येईलच पण त्यांच्या दुय्यम पात्रांकडे पुढीलप्रमाणे नजर टाकली तर त्यांवरूनहि हें ध्यानांत येईल.

‘ प्रियंवदें’तलि हरिभय्या एक अल्पशिक्षित पण बहुश्रुत असा गवई व कीर्तनकार आहे आणि चावट शृंगाराचा तो मोठा भोक्ता आहे. कळण नायकीण स्वतःवर खूश झाल्याची दंतकथा तो ऐकवतो आणि रामजोशाची छेकापन्हुति बिंबेसारख्या विधवेला ऐकवून तिला स्वतःच्या पत्नीपदावर आणून बसवतो. ...‘परागंदें’तील गजपतराय म्हणजे हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्याचा एक गाळीव नमुना आहे. त्यांचें उत्कट देशप्रेम, प्रामाणिकपणा वगैरेबद्दल शंका नाही; पण त्यांतच परमार्थाबरोबर स्वार्थ साधावा, कॉंग्रेसच्या कामासाठी इंग्लंडला जाऊन, जातांना कोर्टाचीं खाजगी कामेंहि बरोबर न्यावीं, असा एक अन्तःप्रवाह आहे. देशभक्तीच्या रूढ कल्पनांनी त्यांचें मन इतकें ग्रासलेलें असतें, की देशभक्ती-

बद्दलचे शास्त्रीय, विलक्षण व धाडसी विचार ऐकून त्यांच्या डोळयांपुढे काजवेच चमकतात...'ब्राह्मणकन्ये'तील शिवशरण एक वाणी आहे. आप्तांच्या द्रव्यलालसेमुळे त्याच्या गळयांत एक स्त्रीत्वहीन स्त्री पत्नी म्हणून पडते आणि तो एक ब्राह्मणाची रखेली बाळगतो. पुढे रखेलीचा जामानिमा ठेवणें त्याच्या आवाक्याबाहेर जातें, तो बाह्यतः कठोरपणा आणून तिला हुसकून लावतो; पण अखेर सर्वनाश झाल्यावर रखेलीवरील अत्युदात्त प्रेम व्यक्त करून तो आत्महत्या करतो...' गावसासू 'तील चंदनानी एक उमदा, अभिमानी व कांहीसा व्रात्य विद्यार्थी आहे...' विचक्षणे'तील रंगूबाई रखेली आहे; पण तिची वागणूक अशी निर्मळ व पवित्र आहे, कीं ती एखादी पतिव्रताच वाटावी.

केतकरांची पात्रें अशा प्रकारचीं आहेत. तेव्हा तीं जीवंत, रसरशीत, वास्तव व वैशिष्ट्यपूर्ण आहेत, वेधक आहेत, हें स्पष्टच आहे. "त्यांच्या कादंबऱ्यांतील पात्रांचा सहसा विसर पडत नाही. पात्रांच्या भूमिका उठून दिसतील अशा रीतीनें रंगविल्या पाहिजेत, या गोष्टीकडे डॉ. केतकरांचें तितकेसें लक्ष नव्हतें. तरीहि पात्रें इतकीं प्रभावी आणि परिणामकारक वठलीं आहेत."[१] असें प्रा. मा. त्र्यं. पटवर्धन म्हणतात, तें अगदी खरें आहे. "त्यांची निवेदनपद्धति 'अचतुर' असली तरी त्यांच्या पात्रांचें व्यक्तित्व सुललित कलात्मकतेंतून निर्माण झालेल्या पात्रांपेक्षाहि जास्त परिणामकारक व जीवंत वाटतें."—असे जे उद्‌गार प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी काढले आहेत तेहि उचितच आहेत.[२]

"स्वभावदर्शनाच्या दृष्टीने पाहिलें तरी त्यांचीं पुष्कळशीं पात्रेंहि विशिष्ट मतप्रणालीचीं प्रतीकभूत किंवा केतकरांचीं स्वतःचीं मुखपात्रें असल्यामुळे मानवी स्वभावचित्रणाच्या दृष्टीने त्यांस कांहीच महत्त्व नाही."[३]—असें मत प्रा. बापट व प्रा. गोडबोले केतकरांच्या पात्रांवर देतात. पण तें मत केतकरांच्या कादंबऱ्या न वाचतां किंवा न आकलन होतां दिलेलें दिसतें. कपिला, मोरे यांसारखीं केतकरांचीं कांही पात्रें नुसते विचार बोलतात, हें खरें आहे. हरिभय्यासारखीं पात्रें स्वतःच्या कुवतीशीं विसंगत असे विचार बोलतात, हेंहि

---

१. प्रतिभा, जुलै, १९३७. २. 'मराठी कादंबरी' पृ. १८२.
३. 'मराठी कादंबरी' पृ. २२२.

खरें आहे. पण हीं पात्रें " पुष्कळशीं " नाहीत, अल्पशीं आहेत; नव्हे, अत्यल्प आहेत. अनेक पात्रें विचार बोलतात; पण नुसते विचारच बोलत नाहीत. त्यांना कांहीं विशिष्ट जीवनक्रम व विशिष्ट स्वभाव आहे आणि त्याप्रमाणे तीं विचार बोलतात. वैजनाथ, डॉ. तर्कटे, प्रा. गोगटे, ब्रह्मगिरी वगैरे पात्रांच्यावरून हें लक्षांत येईल. तेव्हा हीं पात्रें जरी केतकरांचे कांहीं विचार बोलत असलीं तरी तीं केतकरांचीं " मुखपात्रें " आहेत असें म्हणतां यावयाचें नाही. केवळ "विशिष्ट मतप्रणालीचीं प्रतीकभूत " म्हणूनहि त्यांना रजा देतां यावयाची नाही. शिवाय, केतकर अशीं दशकांनी मोजण्यासारखीं पात्रें चितारतात, की ज्यांना कांहीं मतें आहेत; पण ज्यांचा कोणत्याहि मतप्रणालीशीं संबंध नाही. 'प्रियंवदे'तील अनंतराव घरकुटे व बंडूनाना; 'परागंदे'तील रुक्मिणी, रघुनंदन, मत्तमयूरी व कामत पतिपत्नी; 'आशावादीं'तील नंदिका, लालनाथ, विहंगमा व गोदावरी; 'ब्राह्मणकन्ये'तील शिवशरण, शांताबाई, एसतेर व मल्लिकार्जुन मडकी; 'गावसासू'तील कुसुमकालिका, सुनीति, ललिता व चंदनानी; 'विचक्षणे'तील रंगूबाई, माधव छत्रे वगैरे अनेक पात्रें आणि 'भटक्यां'तील ( डॉ. धैसास व इलेक्शन एजंटांचे आचार्य वगळतां ) बहुतेक पात्रें, ह्यांना कांहीं मतें असतील; कारण मनुष्याला मतें असावयाचींच; पण हीं पात्रें कोणत्या हि मतप्रणालीचीं प्रतीकें नक्की नाहीत. अशा स्थितींत 'पुष्कळशीं' पात्रें विशिष्ट मतप्रणालीचीं प्रतीकभूत आहेत.' असें म्हणणें धादान्त अयोग्य होय.

इतर कादंबरीकार साधारणतः बाह्यांगवर्णन, स्वभावदर्शन व क्वचित् जीवनक्रम एवढ्यावर पात्रचित्रण थांबवितात; पण केतकर त्या पात्राच्या स्वभावानुरूप व जीवनक्रमानुरूप त्या पात्राचे विशिष्ट विचारहि सांगूं शकतात. हें केतकरांचें असामान्य वैशिष्ट्य व सामर्थ्य आहे. त्या वैशिष्ट्याच्या व सामर्थ्याच्या तेजालाच हे रूढिप्रिय टीकाकार दिपलेले दिसतात.

" मानवी स्वभावचित्रणाचे दृष्टीने " केतकरांच्या पात्रांना " कांहीच किंमत नाही."—या म्हणण्याबद्दल इतकेंच म्हणतां येईल, की या म्हणण्यालाच कांहीं किंमत नाही. आतापर्यंत केतकरांच्या मुख्य व दुय्यम पात्रांचें जें विवरण झालें त्यावरून हें स्पष्ट होईल. पुढे त्यांच्या मनोविश्लेषणाबद्दल जें लिहिलें आहे त्यावरून तर ह्याबद्दल खात्री पटेल.

प्रा. बापट व प्रा. गोडबोले यांच्या मताचा एवढा परामर्श घेण्याचें कारण इतकेंच, की त्यांनी आपलें मत मराठी कादंबरीची सर्वांगीण चर्चा करूं पाहाणाऱ्या पुस्तकांत नोंदवून ठेवलें आहे व त्यामुळे त्याला महत्त्व आहे. शिवाय तें मत कांही जणांचें प्रातिनिधिक मतहि आहे. असो.

रसरशीतपणा, जिवंतपणा व वास्तवता या गुणांबरोबरच केतकरांच्या पात्र-चित्रणांत आणखी दोन गुण समाविष्ट केले पाहिजेत. वैविध्य व नावीन्य हे ते गुण होत. त्यांनी साती कादंबऱ्यांत मिळून सुमारें सव्वाशे पात्रें निर्माण केलीं आहेत. पैकी सुमारें पंचवीस नाममात्र व चित्रणशून्य आहेत. बाकीच्या पात्रांत सुमारें दहा पात्रें इतर पात्रांशीं फार साम्य असल्यामुळे वैविध्याच्या चाचणींत बाजूला काढावीं लागतील; पण सुमारें नव्वद पात्रें अगदी वेगवेगळीं आहेत. तेव्हा त्यांच्या पात्रचित्रणांत अतिशय वैविध्य आहे, हें आपोआप स्पष्ट होतें. त्यांच्या पात्रांतील वैविध्य स्वभावांतील भिन्नतेमुळे तर उत्पन्न होतेंच; पण त्यांत मुख्यतः जीवनक्रमाची भिन्नता आहे. त्यांच्या पूर्वी मराठी कादंबरींत इंग्लंड–अमेरिकेंतील हिंदी व्यक्ति, रखेल्या, वेश्या, सामाजिक उच्चतेसाठी धडपडणाऱ्या अकुलीन व्यक्ति किंवा इतर व्यक्ति, स्वार्थसाधनेच्या व्यवहारांत परिपूर्ण गढलेल्या व्यक्ति, क्रांतिकारक विचार सांगणाऱ्या व्यक्ति, फारशा किंवा मुळीच दृष्टीस पडत नव्हत्या. पण त्यांच्या कादंबऱ्यांत त्या विपुल आहेत. शिवाय कांही अभिनव स्वभावाच्या व्यक्तिहि त्यांच्या कादंबऱ्यांत आढळतात. त्यामुळे त्यांच्या पात्रचित्रणांत नावीन्य उत्पन्न झालें आहे. 'प्रियंवदे'वर 'केसरी'ने असा अभिप्राय दिला होता, की "पुण्या-मुंबईकडील उपवनांतील कमला-वसंतांचे विलासांस विटलेल्या वाचकांचें ही गोंडवनांतील प्रियंवदा चित्ताकर्षण करील व त्याने वाङ्मयांतील तोंडपालट होईल."[1] या अभिप्रायांत स्वभावचित्रणांतील नावीन्य अभिप्राय–लेखकाला चांगलें जाणवलेलें आहे. अशाच प्रकारचे अनेकांचे अभिप्राय केतकरांच्या पात्रचित्रणावर पडलेले आहेत.

## ३२. समाजबद्ध पात्रें:—

श्री. नी. म. केळकरांनी केतकरांच्या कादंबऱ्यांवर असें मत व्यक्त केलें

---

१. पाहा, आशा.चें मलपृष्ठ.

आहे, की " डॉक्टरांच्या कादंबऱ्या कधीच सर्वस्वीं व्यक्तिनिष्ठ होऊं शकल्या नाहीत. वैयक्तिक मनाच्या स्वाभाविक इच्छा, सुखदुःखें यांचें कारण नेहमी सामाजिक स्थितींतच शोधणाऱ्या डॉक्टरांच्या भूमिका व्यक्तिप्रकर्षानें तळपत नाहीत...आंतरजागृत व्यक्तींपेक्षा समाजबद्ध व्यक्ति डॉक्टरांच्या ललित वाङ्मयांत वावरतात."[1] श्री. केळकरांच्या या मतांत केतकरांच्या पात्रचित्रणांतील एक फार मोठें वैशिष्ट्य व्यक्त होतें. केतकरांच्या कादंबऱ्यांत वैजनाथ, ब्रह्मगिरी, प्रियंवदा, कुसुमकलिका वगैरे कांहीं थोडीं पात्रें अशीं आहेत, की ज्यांचे स्वभाव त्यांच्या परिस्थितीहून उंच व मातबर दिसतात. पण केतकरांचीं बहुसंख्य पात्रें अशीं आहेत, की ज्यांचे स्वभाव 'फारसे' मातबर नाहीत व ज्यांच्या स्वभावांचा उपयोग त्यांच्या जीवनक्रमाचें, परिस्थितीचें वगैरे प्रतिबिंब दाखविण्यासाठीच अधिक होतो. कित्येक पात्रें अशींहि आहेत, की ज्यांचा जीवनक्रम त्यांना त्यांच्या स्वभावापेक्षा वैशिष्ट्य उत्पन्न करतो.

उदाहरणार्थ, 'प्रियंवदें'तील बंडूनानांत कांही तडफ आहे; पण तीहून त्याचा सिरोंचा तहशिलींतील व भोसले विजयमिल्समधील जीवनक्रमच महत्त्वाचा आहे. 'परागंदें'तील कामत पतिपत्नी परागंदा भारतीयांमधील परिस्थितिमूलक स्थित्यंतरेंच मुख्यतः दाखवितात. 'आशावादीं'तील डॉ. परमानंद पद्मावतीशीं विवाह-बाह्य संबंध कां ठेवतो, तर त्याचें लग्न होत नसतें म्हणून; आणि त्याचें लग्न कां होत नाही, तर त्याच्या जातींत वाढलेल्या मुली नसतात म्हणून. नंदिका-लालनाथ हीं पात्रें म्हणजे तर परिस्थितिबद्ध पात्रचित्रणाचे उत्कृष्ट नमुने आहेत. नंदिका 'इंग्लंड-रिटर्न्ड' डॉक्टरीण असते तर लालनाथ साधा कारकून असतो. त्यामुळे दोघांच्या मनांत जें द्वैत उत्पन्न होतें त्याचेंच चित्रण त्यांच्या कथेंत आहे. नंदिकेच्या मनांत पाश्चात्य समाजाच्या परिचयामुळे अनुनय करून घेण्याची तीव्र इच्छा जागृत असते. डॉक्टरीच्या व्यवसायामुळे तिचा परमानंदाशीं संबंध येऊन तिची ती इच्छा प्रज्वलित होते आणि हिंदी समाजांत वाढलेला लालनाथ ती इच्छा पुरवूं शकत नाही. म्हणजे नंदिका व लालनाथ यांचे स्वभावविशेष अत्यंत परिस्थितिमूलक आहेत व त्यांच्यामधील द्वंद्वहि परिस्थितिमूलकच आहे. त्यांच्या

---

१. प्रतिभा, जुलै १९३७.

स्वभावांत परिस्थितिनिरपेक्ष असें कोणतेंहि स्वयंभू वैशिष्ट्य नाही व तशा वैशिष्ट्याने त्यांच्यामधील द्वंद्व उत्पन्न होत नाही. परिस्थितीनेच त्यांच्या स्वभावांत व द्वंद्वांत वैशिष्ट्य आलें आहे व तें फारच चित्ताकर्षक झालें आहे. ' ब्राह्मणकन्यें ' तील शिवशरणचें सर्व वर्तन लोकविलक्षण आहे; पण त्याच्या विशिष्ट परिस्थितीमुळेच तें मुख्यतः घडून आलें आहे. त्याच्या स्वयंभू स्वभाव-वैशिष्ट्याचा अंश त्यांत फार थोडा आहे. केतकरांच्या पात्रांच्या भावना, रागद्वेष, विचार, वर्तन वगैरे किती परिस्थितिबद्ध असतात, तें ' आशावादीं '-तील विहंगमा व अलकनंदा, ' ब्राह्मणकन्यें'तील एसतेर व कालिंदी आणि ' विचक्षणें'तील विचक्षणा, चंदू लटके व रा. ब. खेडकर यांच्यावरूनहि चांगलें स्पष्ट होईल.

" त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये, मनुष्यस्वभावावर व वर्तनावर सभोवतालच्या परिस्थितीचा व सामाजिक रचनेचा सूक्ष्म पण अत्यंत प्रबल असा परिणाम होतो, हें तत्त्व पटविलेलें आहे."[१] —असें प्रा. वा. म. जोशी म्हणतात; आणि " व्यक्ति–परिस्थिति–सापेक्षत्वाचें चित्रण केतकरांच्याइतकें स्पष्टपणें व भरीव-पणें मराठी कादंबरींत क्वचितच कोणीं केलें आहे. "[२]—असें प्रा. कुसुमावती देशपांडे म्हणतात. त्यांत, केतकरांचीं पात्रें आंतरजागृत असण्यापेक्षा समाज-बद्ध आहेत, या श्री. केळकरांच्या मताचाच पुरस्कार आहे.

## ३३. मनोविश्लेषणः—

पात्रचित्रणांत मनोविश्लेषण येतेंच; पण केतकरांनी केलेलें मनोविश्लेषण विशेष महत्त्वाचें असल्यामुळे त्याचा वेगळा परामर्श घेणें भाग आहे.

केतकरांनी ज्या अनेक भावनांची फोड कादंबऱ्यांतून केली आहे त्यांत प्रेम, काम किंवा स्त्रीपुरुषांच्या परस्परविषयक भावना यांना सगळयांत जास्त महत्त्व आहे. या भावनांबद्दलच्या अनेक रूढ कल्पना किंवा संकेत त्यांनी उध्वस्त केले आहेत व त्यांचें नग्न, सूक्ष्म, वास्तव स्वरूप उघडें केलें आहे. प्रेम स्थिर नसतें, एका स्त्रीचें अनेक पुरुषांवर व एका पुरुषाचें अनेक स्त्रियांवर प्रेम जडूं शकतें, हें

---

१ लो. शि., मे–जून १९३७. २. ' मराठी कादंबरी ', पृ. १८१.

त्यांनी दाखविलें आहे.[१] प्रेम नुसतें उदात्त गुणांवर अवलंबून नसतें, त्याला शारीरिक आकर्षणाची जोड लागते, हें त्यांनी स्पष्ट केलें आहे.[२] स्त्री कितीहि उच्च भावनांची असली तरी तिला नवऱ्याजवळ येणारी दुसरी स्त्री सहन होत नाही,[३] हें त्यांनी सांगितलें आहे. आपल्या प्रेमाची जाणीव प्रेमिकालाच नसते;[४] अनुनयांत शारीरसंबंध येतातच;[५] स्त्रीचें प्रेम अनेकदा पराभूत पुरुषावरच वसतें[६] वगैरे सत्यें ते निदर्शनास आणतात. अनेक ध्येयनिष्ठ, संभावित किंवा पुढारी व्यक्तींच्या मनांतील कामभावना रंगवून त्या भावनेचा व्यापकपणा त्यांनी मनावर बिंबवला आहे.[७] चांगलें खाणें पुरुषांना देऊन त्यांचें प्रेम जिंकतां येतें,[८] हा ठोकताळा ते अनेकदा सांगतात. मनाच्या शुद्धपणामुळे नव्हे तर बाह्य कारणांनी अनेकांचें ब्रह्मचर्य टिकतें;[९] वाढत्या वयाबरोबर स्त्रीचें प्रेम पुरुषापेक्षा पैशावरच जडतें;[१०] प्रेमभावनेपेक्षा पुष्कळदा स्वार्थ बलवत्तर असतो;[११] आपला धंदा वाढविण्यासाठी अनेक बॅरिस्टर, कंत्राटदार वगैरे बायकोच्या सौंदर्याचा उपयोग करतात;[१२] इत्यादि सत्यें त्यांच्या लेखणींतून पुनःपुनः बाहेर पडतात.

प्रेम, काम या भावनांप्रमाणे स्वार्थाचें स्वरूप त्यांनी आवर्जून स्पष्ट केलें आहे. गजपतरायांसारखा थोर पुढारी कॉंग्रेसच्या कामासाठी कॉंग्रेसच्या पैशाने इंग्लंडला जातो पण जातांना वकिलीचीं खाजगी कामें घेऊन जातो, हें सांगण्यास ते विसरत नाहीत.[१३] क्रांतिकारकांनी फासावर चढावें, त्यांना भिऊन सरकारने आपल्या पदरांत अधिकार टाकावे, आपण मनांतून क्रांतिकारकांना शाबासक्या द्याव्या पण वृत्तपत्रांतून त्यांचें वर्तन चुकीचें म्हणावें, या प्रकारचा थोर पुढाऱ्यांच्या वर्तनांतील दंभ व स्वार्थ त्यांनी चव्हाट्यावर मांडला आहे.[१४]

---

१. उदा०—ब्रा. क., प्र. १२ वें. २. कादंबऱ्यांतील बहुतेक सर्व प्रेमप्रसंग. ३. उदा०—लीला परागंदेंतील; प्रियंवदा गों. प्रि. मधील. ४. उदा०—शारदा गों. प्रि. मधील. ५. उदा०—नानाभाई–उपेंद्रवज्रा यांचा संबंध, ब्रा. क. ६. ब्रा. क., पृ. ६७. ७. उदा०—ब्रह्मगिरी, आशा.; गोविंदराव कामत, गों. प्रि. ८. गों. प्रि., पृ. ७९. ९. आशा., पृ. २०९. १०. विच., पृ. १७३. ११. उदा०—गा. सा., लिझी व कुसुमकलिका. १२. उदा०—गों. प्रि., होरमसजी. १३. परा., पृ. ५६. १४. कित्ता, पृ. १४२.

"बोकडखाऊ रवींद्रनाथास यज्ञीय पशूचीच कींव येऊन त्यावर तो नाटक लिहितो."[१]—असें ते म्हणतात. स्त्रियांच्या सुधारणेसाठी खटपटणाऱ्या सुधारकांच्या मनांत स्त्रियांच्या ओळखी व्हाव्या, असा उद्देश असल्याचें ते निदर्शनास आणतात.[२] जानवें टाकून देण्यासाठी चळवळ करणाऱ्या केशवचंद्र सेनाची जात वैश्य होती, त्या जातीला जानवें घालण्याचा अधिकार नव्हता व त्यांत केशवचंद्राच्या चळवळीचें मूळ होतें, असा गौप्यस्फोट ते करतात.[३] समाजांतल्या या प्रत्यक्ष व्यक्तींमागील व कृतींमागील स्वार्थ जसा त्यांनी विवरून दाखविला आहे तसा आपल्या पात्रांच्या मागीलहि दाखविला आहे. स्वार्थ–भावनेने मनुष्याचें वर्तन कसें बनतें, तें त्यांच्या अनेक पात्रांवरून समजतें. विशेषतः 'प्रियंवदे'तील अनंतराव घरकुट्टे व होरमसजी पेनांगवाला; 'परागंदे' तील रोझनबाम; 'आशावादीं'तील सर दामोदरराव, गोदावरीची जाऊ नी दीर, व अलकनंदेचा आय. सी. एस. पति; 'ब्राह्मणकन्ये'तील मल्लिकार्जुन मडकी; 'गावसासू'तील लिझी व कुसुमकलिका; आणि 'भटक्यां'तील संस्थानिक व बाबूराव उपसनी या पात्रांचीं चरित्रें म्हणजे मनुष्याच्या स्वार्थभावनेचीं वास्तव व विदारक प्रदर्शनेंच आहेत. केतकर उदात्त किंवा संभावित वर्तनामागील स्वार्थ उघड करतात; स्वार्थानें माणसाच्या कृतींना कशीं स्वरूपें येतात, तें वर्णन करतात; पण स्वार्थाचें एकांगी, काळेंकुट्ट किंवा अमानुष चित्र ते कोठेंहि रेखाटीत नाहीत, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. त्यांच्या मनोविश्लेषणांतील वास्तव दृष्टि येथे चांगलीच जाणवते. दुष्टपणा किंवा स्वार्थ यांना अनेकदा परिस्थितिच कारणीभूत असते,[४] असें ते वारंवार म्हणतात.

प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी केतकरांच्या प्रतिभेविषयी असें लिहिलें आहे, की "दंभ, स्वार्थ, विषयवासना यांनीच मानवी व्यवहार कसा नियमित झाला आहे, याचें विश्लेषण व विदारक चित्रण करण्यांत केतकरांची प्रतिभा रंगली होती."[५] केतकरी कादंबऱ्यांतील कामभावना व स्वार्थभावना यांबद्दलचें वरील विवेचन ध्यानीं घेतलें, की कुसुमावतीबाईंच्या लिहिण्यांतील सत्य सहज कळून येईल.

---

१. विच., पृ. २९९. २. ब्रा. क., पृ. २७६. ३. आशा., ६९.
४. उदा०—आशा., पृ. १११, ११२. ५. मराठी कादंबरी, पृ. १६५

मानवी मनांतील सामाजिक उच्चतेच्या आकांक्षाचें चित्रण, हें केतकरांच्या मनोविश्लेषणांतील आणखी एक महत्त्वाचें अंग आहे. त्यांचीं कित्येक पात्रें मुख्यतः याच आकांक्षेनें प्रेरित झालेलीं आढळतात. 'आशावादीं'तील अनिरुद्ध नगरकर व सर दामोदर, 'विचक्षणें'तील रा. ब. खेडकर व सर्व कादंबऱ्यांतील अकुलीनपणांत सापडलेलीं कित्येक पात्रें यांमध्यें या आकांक्षेचें अनेकांगी चित्रण केतकरांनी केलें आहे.

मनुष्यामधील देशभक्ति, प्रामाणिकपणा, ध्येयनिष्ठा वगैरे अतिशय उदात्त व पवित्र भावनाहि ते रंगवितात. 'परागंदें'तील गंगाधर व रुक्मिणी, 'आशावादीं'तील ब्रह्मगिरी, हंटर पतिपत्नी व लालनाथ, 'भटक्यां'तील डॉ. घैसास यांच्यामध्यें तशा भावनांचा विशेष प्रकर्ष आढळतो.

त्यांनी मुख्यतः कोणत्या भावनांच्या दृष्टीनें मनोविश्लेषण केलें आहे व तें कसें वास्तव व सूक्ष्म केलें आहे तें इतक्या विस्तारावरून ध्यानांत येईल. मनुष्याच्या वर्तनाची व भावनांची जी सूक्ष्म उकल ते पदोपदीं करतात तिचे कांही नमुने पुढील उताऱ्यांत चांगल्या प्रकारें दिसतील.

"प्रेमांत सापडलेल्या अगर निव्वळ स्त्रीजयिष्णु लोकांचा एक असा प्रयत्न असतो, की स्त्रियांशीं अधिकाधिक निकटपणा स्थापन करावयाचा आणि तो तिला कितपत आवडतो तें प्रत्येक क्षणीं पाहून अधिकाधिक स्थापन करावयाचा ...जो स्पर्श करावयाचा तो कांही तरी मिष काढून करावयाचा...हरिभय्यानें या प्रकारचे प्रयत्न पूर्वी पुष्कळ करून...बिंबाबाईचें मन ओळखून ठेविलें होतें." (गो. प्रि. ८५)

"लोकांना संन्यासधर्माची चेष्टा करणारा हवा होता; पण तो संन्यासीच हवा होता. जगांतील आयुष्यक्रमणाचा हेतु आत्मनिर्मूलन हा नसून आत्म-संवर्धन हा आहे, असें सांगणाराहि गुरु पाहिजे होता; पण तसें सांगणारा गुरुदेखील भगव्या कापड्यांचाच हवा होता. मताप्रमाणे आचरण करणारी व्यक्ति लोकांस नको, असेंच दिसतें." (आशा. १८४) "आपण ज्या गावांत कायमची वसती करतों त्या गावांतील लोकांचें आपल्याविषयी मत वाईट होऊं नये म्हणून आपण खटपटत असतों. आपलें मन, नीतीची वेसण जरा सैल करावी आणि कामवृषभाला यथेच्छ संचार करूं द्यावा, या भावनेचें झालें तरी लोक आपणांस काय म्हणतील या एका भावनेचेंच दडपण

आपल्यावर राहातें. पण जेव्हा एक देश सोडून दुसऱ्या देशांत आपण जातों तेव्हा...मनोवारूचा लगाम सैल सुटतो." ( आशा. पृ. २०६ )

" खोटें बोलण्यास जें नैतिक धैर्य लागतें तें बालिकेस नसतें; पुरंध्रीस असतें." ( गा. सा. ११५ )

" आपणांकडे माधव छत्रे हा वळला आहे हा आपल्या आर्थिक सुस्थितीमुळे वळला आहे, असें मानावयास ती तयार नव्हती. आपल्या सुसंस्कृत मनाचें महत्त्व त्यास पुष्कळ वाटतें आणि त्यामुळे तो आपल्या संगतीची इतकी आवड दाखवितो, असेंच समजावयास ती उत्सुक होती." ( विच. ३४ ) " ज्यांनी वेडेवाकडे व्यवहार केले नाहीत त्यांची सहानुभूति व्यापक कधीच होणार नाही." ( विच. ८२ ) " पावित्र्याचा अहंकार चांगला कीं पापीपणाच्या जाणिवेमुळे उत्पन्न होणारी लीनता चांगली ? परमेश्वरा, मला सांग. माझी बुद्धि येथे चालतच नाही." ( विच. १२४ ) " मुलगी सोळा वर्षांची असते, तेव्हा आपण मेलों तर हरकत नाही पण आपला नवरा जिवंत राहो, असें म्हणणारी ती असते. पण तीच चाळीस वर्षांची झाली म्हणजे नवरा मेला तरी हरकत नाही, पण त्याने मोठा विमा उतरलेला असावा, असें तिला वाटतें. बायकांचें वय जसजसें वाढत जातें, तसतशी त्यांच्या प्रेमसंबंधांत व्यावहारिकतेची वाढ होत जाते." (विच. १७३) " आपला जन्माचा सोबती आपणांस हीन कुळांतील समजून औदार्याने आपणांशीं लग्न लावतो, ही भावना आपणांस एकसारखी आनंदकारक झाली असती काय ? अर्थात् नाही." (विच. २४१ )

परिस्थितीप्रमाणे माणसांत होणारा बदल केतकर अनेकदा फार मार्मिकपणें दाखवून देतात. रामभाऊ इंग्लंडमध्ये असतो, तेव्हा त्याची प्रियंवदा स्त्रियांच्या हक्कांबद्दल क्रांतिकारक विचार सांगूं लागते; पण रामभाऊ परत येऊन तिला मुलें झालीं म्हणजे ती ते विचार पार विसरते व आपलीं मुलें इतरांच्या मुलांपेक्षा किती टवटवीत व स्वच्छ आहेत, हें पाहाण्यांतच गर्क होते.[1] त्यांचा गंगाधरपंत नेहमी आदरणीय व गंभीर असतो; पण दीर्घकालीन विरहानंतर व संकटांनंतर रुक्मिणी त्याला भेटली, की त्याच्या तोंडा-

१. गों. प्रि., पृ. ११९.

वर तजेला येऊन त्याचें रूपांतर पोरवयांत झाल्यासारखें वाटतें.[१] त्यांची कालिंदी शिवशरणचा रखेलीपणा सोडून आत्महत्येस प्रवृत्त झालेली असते; पण पुढें १५० रु. ची नोकरी लागतांच तिच्यांत केवढें स्थित्यंतर होतें! तिला आपण पतिता नाही, असे वाटूं लागतें. विशिष्ट जीवनक्रमास अयोग्य पण दुसऱ्या कोणत्या तरी जीवनक्रमास आपण योग्य आहों, अशी तिची खात्री पटते. आपली कोणी निर्भत्सना करील तर त्याचा आपण प्रतिकार करूं, असें ती म्हणते. जर आपल्या मुलाला आपल्या लग्नाच्या योगामुळे कुलीनता येणार नाही तर लग्न तरी कशाला, असे विचार तिच्या डोक्यांत उसळूं लागतात आणि मुलगा मोठा करून इंग्लंडला पाठविण्याचे मनोरे ती रचूं लागते.[२]

मनुष्याच्या वर्तनाचे व भावनांचे केतकरांनी केलेलें सलग विश्लेषण पाहावयाचें असेल तर 'परागंदें'तील ४ थें व ५ वें प्रकरण वाचावें. त्यांत मत्तमयूरी व रुक्मिणी यांच्या वर्तनाचे व भावनांचे अतीव वास्तव व अतीव सुंदर विश्लेषण झालें आहे. 'आशावादी'तील बाराव्या, चौदाव्या व बाविसाव्या प्रकरणांत लालनाथ व नंदिका यांच्या भावनांचें विश्लेषणहि नमुनेदार आहे.

केतकरांच्या मनोविश्लेषणांत वास्तवता, नावीन्य, सूक्ष्मपणा व खोलपणा हे गुण प्रामुख्याने दिसून येतात. आतापर्यंतच्या विवेचनावरून हें सहज स्पष्ट होईल. त्यांच्या मनोविश्लेषणाबद्दल वि. ह. कुलकर्णी म्हणतात, की "प्रत्येक व्यक्तीच्या मताचें व कृतीचें सर्वांगीण परीक्षण करून त्या व्यक्तीचें अंतरंग उकलून दाखविण्यांत डॉक्टरसाहेब फार वाकबगार आहेत, यांत शंका नाही." प्रा. वा. म. जोशी म्हणतात, की "स्त्रीपुरुषांच्या हृदयदरींतील ज्या कांही भावभावनांकडे पूर्वकालीन कादंबरीकारांनी दुर्लक्ष केलें होतें त्यांकडे त्यांनी लक्ष वेधलें आहे...त्यांनी...भावनांचें अंतरंग सर्वांत अधिक सूक्ष्मतेने व व्यापक दृष्टीने ओळखण्यास शिकविलें." ग. त्र्यं. माडखोलकर म्हणतात, की "समाजांतील व्यक्ति, (संस्था, घटना आणि आचार) यांचें त्यांच्याइतकें मूलगामी आणि विदारक विश्लेषण दुसऱ्या कोणत्याहि ललित लेखकाने केलेलें

---

१. परा., पृ. १०६. २. ब्रा. क., पृ. १३६-१३७.

नाहीं." या अभिप्रायांत त्यांच्या मनोविश्लेषणाचें उपर्युक्त स्वरूपच वेगळ्या शब्दांत व्यक्त झालें आहे.[1]

## ३४. कथनशैलीचें मुख्य स्वरूपः—

केतकरांच्या कथनशैलीचीं कांहीं वैशिष्ट्यें सांगितलीं, की तिच्या स्वरूपाचें बहुतेक आकलन होऊं शकेल. कथाप्रसंगांना दृश्य व श्राव्य स्वरूप आलें तर ते फार परिणामकारक होतात, असा अनुभव आहे. पण कथाप्रसंगांना दृश्य व श्राव्य स्वरूप आणण्याची कला केतकरांच्या लेखणींत अगदींच नाही. प्रसंग दृश्य व श्राव्य होण्यासाठी पात्रांच्या विविध व बारीकसारीक हालचाली, भोवतालची परिस्थिति, सृष्टिसौंदर्य, आवाजांतील बद्दल वगैरेंमधील वेचक भागांचे उल्लेख आवर्जून करावे लागतात; पण केतकरांचें या गोष्टीकडे अगदी दुर्लक्ष आहे. पात्रांचें बाह्यस्वरूप सांगण्याबद्दल त्यांचा कटाक्ष नाहीं, याचा पूर्वी उल्लेख आलाच आहे. भोवतालची स्थिति, आवाज यांची गोष्ट तशीच आहे. —आणि त्यांच्या सर्व कादंबऱ्यांत एखादें सृष्टिवर्णन औषधालाच सापडलें तर सापडेल. त्यामुळे त्यांनी सांगितलेले प्रसंग बुद्धीला कळतात पण डोळ्यांना दिसत नाहीत किंवा कानांना ऐकूं येत नाहीत. त्यांचें सर्व कथन ठसठशीत व परिणामकारक न होण्याला, हें एक मोठें कारण आहे.

प्रसंग डोक्यांतच न शिरतां हृदयांत शिरला पाहिजे, हें परिणामकारक कथनशैलीचें आणखी एक गमक आहे. पण या गमकाच्या दृष्टीनेहि त्यांची शैली अगदी अयशस्वी आहे. त्यांच्या कथनाने भावना तापत नाहींत; मनांत एखादा रस उचंबळून येत नाही किंवा सर्वांगाचे कान व्हावे, इतकें त्यांचें कथन वेधक होत नाहीं. 'ब्राह्मणकन्यें'तील शिवशरणचा मृत्यु, 'आशावादीं'तील परमानंदाचें मोहजाल, 'परागंदें'तील मयूरीच्या सहवासांत गंगाधराचें होणारें क्षणैक पतन, 'प्रियंवदें'तील बिंबा–हरिभय्याचें मीलन वगैरे प्रसंग वेधक व कांहींसे रसोत्कट आहेत, हें खरें. पण ते प्रसंग म्हणजे केवळ अपवाद होत. वाचकाच्या हृदयाची पकड घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या कथनशैलींत नाहीं, हें

---

१. अर्वाचीन मराठी साहित्य; लो. शि., मे–जून १९३७; व प्रतिभा, जुलै १९३७ –अनुक्रमें.

सर्वसाधारणपणें खरें आहे. ' आशावादीं'त जेव्हा ब्रह्मगिरीची व गोदावरीची अनेक वर्षांच्या दीर्घ विरहानंतर भेट होते, तेव्हा त्यांच्या कथनशैलींतला हा दुबळेपणा चांगलाच दिसतो. त्या प्रसंगाचें एखाद्या हरिभाऊ आपट्यांनी किंवा फडक्यांनी असें वर्णन केलें असतें, की वाचकाचें हृदय उत्कट भावनांनी उतूं गेलें असतें. पण केतकरांची लेखणी त्या प्रसंगाच्या वर्णनांत अडखळते आणि ते म्हणतात, " गोदावरीचें या वेळेचें अंतःकरण वर्णन करण्याचें काम पूर्वी भवभूतीनेच केलें आहे. तें अंतःकरण वर्णन करण्यास लागणारी भाषा प्रस्तुत कथानक लिहिणाऱ्यास नसल्यामुळे तो भवभूतीच्याच शब्दांचें अवतरण करीत आहे "[1] त्यांच्या शैलींतलि हृदयाची पकड घेण्याच्या सामर्थ्याचा हा जो अभाव त्याचा प्रत्यय ' परागंदे'तलि गंगाधर–रुक्मिणीची भेट,[2] रघुनंदन–मयूरीचा विवाहोत्तर विरह,[3] ' ब्राम्हणकन्ये'तील कालिंदीचा आत्महत्येचा प्रयत्न[4] वगैरे अनेक प्रसंगांच्या वर्णनांत तीव्रतेने जाणवतो. त्यांनी ' ब्राह्मण-कन्ये'त शिवशरण–कालिंदीच्या बिनसण्याचा प्रसंग किंवा कालिंदीच्या गृह-यागाचा प्रसंग फारसें वर्णन न करतां नुसता उल्लेखिला आहे; ' प्रियंवदें'त रामभाऊ–प्रियंवदा यांच्या विरहाचा किंवा मीलनाचा प्रसंग वर्णन न करतां टाळला आहे. ही जी उत्कट प्रसंगांच्या वर्णनाची टाळाटाळी ते करतात, त्यांतहि त्यांच्या कथनशैलींत वाचकांच्या हृदयाची पकड घेण्याचें सामर्थ्य नाही, हें दिसतें.[5]

त्यांचें कथन असें दृश्य नाही, श्राव्य नाही, हृदयांत शिरणारें नाही; पण तें बुद्धीला रिझवणारें, हलवणारें, तिचें उद्बोधन करणारें मात्र नक्की आहे. कोणतीहि कथा सांगतांना ते त्या कथेमधील वळणांचीं कारणें देतात व त्या कथेचें एकंदर स्वरूप विशिष्ट प्रकारचें कां घडलें, तें बरोबर पटवून देतात. पात्राचें पूर्ववृत्त किंवा जीवनक्रम सांगतांनाहि, ते असेंच करतात. त्यांची कोणतीहि कथा, कोणतेंहि पूर्ववृत्त किंवा कोणताहि जीवनक्रम काढून पाहिल्यास

---

१. पृ. २३८. २. पृ. १०२. ३. पृ. १६५. ४. प्र. १०.
५. ब्रह्मगिरी आपली छाटी जाळून टाकतात, ही घटनाहि केतकरांना नाट्यपूर्ण व भावनोत्कट रंगवतां आली नाही, हें प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी दाखविलें आहे. पाहा, ' मराठी कादंबरी ' पृ. १७३.

त्यांत हें नक्की दिसेल. पात्रांचे विचार सांगतांना, विचार ज्या परिस्थितींत उद्भवले ती परिस्थिति ते अनेकदा सांगतात व त्या विचारांचें परिस्थितिदृष्ट्या स्पष्टीकरण करतात. ‘ आशावादीं ’तील ब्रह्मगिरीचे विचार किंवा ‘ ब्राह्मणकन्यें ’तील सत्यव्रताचे विचार किंवा ‘ विचक्षणें ’तील तर्कटे, लोंढे, पद्मनाभ वगैरेंचे विचार यांचें अशा तऱ्हेचें स्पष्टीकरण त्यांनी केलें आहे. विचारांतील सर्वच भाग ते सांगत नाहीत; त्यांतला नवा, विक्षिप्त, लक्षणीय तेवढाच भाग ते सांगतात आणि समाजवर्णनांतहि जवळ जवळ अशीच रीत ते अनुसरतात. या सर्वांचा परिणाम वर सांगितल्याप्रमाणे वाचकाच्या बुद्धीला रिझवण्यांत, हलविण्यांत किंवा तिचें उद्बोधन करण्यांत होतो. स्थूलपणें असें म्हणतां येईल, की त्यांनी जरी कादंबऱ्या लिहिल्या असल्या तरी त्यांच्या कथनशैलींत कादंबरीकाराचे गुण नाहीत, तर एखाद्या निबंधकाराचे किंवा प्रबंधकाराचे गुण आहेत.

## ३५. कथनशैलीचे इतर विशेष :—

त्यांची कथनशैली कादंबरीकाराची नसून प्रबंधकाराची आहे, एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या कथनशैलीचें मुख्य वर्णन संपतें. तरीपण त्या कथनशैलीचे पुढील विशेष ठळकपणें डोळयांत भरण्यासारखे असल्याने ते उल्लेखनीय आहेत.

पहिल्या तीन कादंबऱ्यांत कथानकांतील प्रस्तुत किंवा वर्तमानकालांतील भाग ते कालक्रमानुसार सांगतात व पूर्ववृत्तें जेथे वाव सापडेल तेथे नोंदवून टाकतात. पण पुढील कादंबऱ्यांत या पद्धतीमध्ये त्यांनी बदल केलेला आहे. कार्य आधी सांगावें व मागून त्यामागील कारणपरंपरा देऊन तें कार्य कसें घडलें, त्याचें स्पष्टीकरण करावें, अशी ‘ स्पष्टीकरणात्मक ’ किंवा ‘ कार्यकारणक्रमानुसारी ’ पद्धति ते पुढील कादंबऱ्यांत स्वीकारतात. उदाहरणार्थ, ‘ ब्राह्मणकन्यें ’त कालिंदी रखेली झाल्याचें वृत्त ते १ ल्या प्रकरणांत ऐकवतात व पुढे ४–५ प्रकरणांत ती रखेली कां झाली, त्याचीं कारणें किंवा स्पष्टीकरण देतात. कालिंदीने शिवशरणचा रखेलीपणा सोडल्यावर ती एसतेरकडे गेली, असें पृ. ४३ वर व प्र. १० च्या आरंभीं ते सांगतात व पुढे प्र. १० मध्ये ती एसतेरकडे कशी गेली, तें स्पष्ट करतात. ‘ गावसासू ’मध्ये चंदनानी व

सुनीति यांचें बिनसल्याची वार्ता २ ऱ्या प्रकरणांत ते कानावर घालतात व पुढे अनेक प्रकरणांत बिनसलें कसें, त्याची कारणपरंपरा मांडतात. प्र. १३मध्ये सुनीतीचें व चंदनानीचें जमल्याची दुसरी वार्ता ते कथन करतात व पुढे उरलेल्या प्रकरणांत कसें जमलें, त्याचें विवरण करतात. ' विचक्षणे 'मध्ये तर प्रा. लोंढयांचे विक्षिप्त विचार १ ल्या प्रकरणांत त्यांनी दिले आहेत व पुढे सर्व कादंबरी, ते विचार कसे बनले, तें सांगण्यासाठी, तसा स्पष्ट निर्देश करुन लिहिली आहे.[1] कादंबरींतील कथाभागहि याच पद्धतीने त्यांनी निवेदन केलेला आहे. ' भटक्या ' मध्ये मात्र ही स्पष्टीकरणात्मक पद्धति त्यांनी फारशी वापरलेली नाही.

स्पष्टीकरणात्मक पद्धतीने कथन कधी कधी उत्कंठावर्धक होतें. उदाहरणार्थ, कालिंदी रखेली झाल्याचें भडक वृत्त आधी कानीं पडलें, की ' हें कसें काय झालें ? ' म्हणून वाचक कान टवकारतो व त्या वृत्ताचें स्पष्टीकरण उत्कंठेने वाचीत जातो. पण स्पष्टीकरणात्मक पद्धतीचा उपयोग केतकरांनी नेहमी व हेतुतः उत्कंठावर्धनासाठी केला आहे, असें नाही. विशिष्ट घटना कशा घडतात, त्याचें समाजशास्त्रीय किंवा मानसशास्त्रीय स्पष्टीकरण देण्याचा त्यांचा हेतु असे व म्हणून त्यांची कथनपद्धति स्पष्टीकरणात्मक होई, असें दिसतें. या पद्धतीने उत्कंठावर्धनाचें कार्य क्वचित् जाणीवपूर्वक तर बहुधा सहजासहजीच झालें असावें.

कथनाच्या आधुनिक पद्धतींत कादंबरीकार स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव वाचकांना शक्यतों देत नाही; कथाभाग किंवा पात्रें यांची वाचकांशीं समोरासमोर गाठ घालून देऊन तो नाटकाच्या सूत्रधारासारखा नेहमी पडद्याआड राहातो. त्यामुळे वाचक कथाभागाशीं, पात्रांशीं वगैरे अधिक तद्रूप होऊं शकतात आणि कादंबरीची वेधकता वृद्धिंगत होते. केतकरांना कथनाच्या या पद्धतीचीं फारशी जाणीव नाही. हरिभाऊ आपटयांप्रमाणे ' वाचकहो ! ' म्हणून ते मधून मधून हाका मारतात व वाचकांच्या तद्रूपतेचा भंग करतात. त्यांच्या पहिल्या कादंबरींत हा प्रकार फार दिसतो आणि पुढेहि " शिवशरणप्पाची आणि वाचकांची अजून प्रत्यक्ष ओळख नाही. "— वगैरे तऱ्हेचीं वाक्यें ते लिहितात.[2]

---

१. पाहा, पृ. १०, १७. २. ब्रा. क., पृ. १४६.

कादंबरीचे व प्रकरणांचे आद्यन्त ही वाचकांचें लक्ष वेधून घेण्याची मोक्याची जागा असते. पण तिचा उपयोग केतकर पुरेपूर करून घेत नाहीत. ‘भटक्या’ वगळतां बहुतेक कादंबऱ्यांचे प्रारंभ कांही ना कांही कारणाने आकर्षक झाले आहेत; पण त्यांच्या एकाहि कादंबरीचा अन्त दिलखेचक किंवा मनाला चटका लावणारा नाही. ‘भटक्या’ अपूर्ण असल्याने त्याला अन्तच नाही; पण बाकी सर्व कादंबऱ्यांत ते शेवटीं एक उपसंहाराचें प्रकरण जोडतात आणि त्यांत प्रत्येक पात्राची खबरबात सांगून लेखणी खाली ठेवतात. या प्रकाराने कादंबरीचा कलात्मक शेवट होत नाही; ती मुद्दाम संपविल्यासारखी वाटते, हें उघड आहे. मात्र हा प्रकार त्यांच्या अतिवास्तवतेला साजेसा होता, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. ‘ब्राह्मणकन्ये’तील व विशेषतः ‘विचक्षणें’तील वगैरे प्रकरणांचे शेवट कधी काव्यात्म, कधी ध्वनियुक्त तर कधी उत्कंठावर्धक करण्याचा यत्न त्यांनी केलेला दिसतो. पण एकंदरींत प्रकरणांचे आद्यन्त आकर्षक करण्याकडे त्यांचें कटाक्षपूर्वक लक्ष नव्हतें, असेंच म्हणावें लागतें.

त्यांचे संवाद अचतुर असतात, अस्वाभाविक असतात, वगैरे तक्रारी अनेक टीकाकारांनी केल्या आहेत व त्या खऱ्याहि आहेत. विशिष्ट प्रश्नाची साधक-बाधक चर्चा व्हावी, विशिष्ट मतें उजेडांत यावीं; म्हणून पात्रांकडून केतकर प्रश्नोत्तरें घडवून आणीत आहेत; तीं आपोआप विकास पावत नाहीत, असें त्यांचे संवाद वाचतांना सतत जाणवतें. उदाहरणार्थ, ‘प्रियंवदे’ तील बिंबा—हरिभय्याचा भग्न देवालयांतील मीलनोत्तर संवाद किंवा ‘आशावादीं’तील नंदिका–ब्रह्मगिरींचा ‘नंदिकेच्या घरीं’ भोजनप्रसंगीं झालेला संवाद हे पाहाण्यासारखे आहेत. पैकी पहिल्या संवादांत पुनर्विवाहाविषयी बिंबा हरिभय्याला लागोपाठ एकेक प्रश्न विचारते व हरिभय्या त्यांचीं उत्तरें देतो आणि दुसऱ्यांत संन्यासाविषयी डॉ. नंदिका ब्रह्मगिरींना तसेच प्रश्न विचारते व ब्रह्मगिरी त्यांचीं उत्तरें देतात. हीं प्रश्नोत्तरें अत्यंत कृत्रिम आहेत. त्यांत प्रश्नांतून उत्तर येतें; पण उत्तरांतून पुन्हा प्रश्न येत नाही. जुन्या पाठय पुस्तकांतून ‘लोखंड’ ‘जस्त’ वगैरे विषयांचें ज्ञान देण्यासाठी बापलेकांचे जे संवाद घालीत तसा या संवादांचा थाट वाटतो.

या संवादांत अनेकदा पात्रें धडाधड अशा गोष्टी सांगून टाकतात, की ज्या सहसा कोणी बोलणार नाही. ‘ब्राह्मणकन्ये’मध्ये रामरावाला करुणसुंदरी प्रेम-

चेष्टा करण्यास सवलत देते; पण रामरावाने लग्नाची मागणी करतांच ती त्याला मूक भावप्रदर्शनाने नकार न देतां एक चर्चा ऐकवते आणि विशेष म्हणजे आपण लग्न केल्यास " मुलांचें काय व्हायचें " असाहि प्रश्न विचारते.[1] असा प्रश्न कोणतीहि स्त्री एकदम आपल्या प्रियकराला किंवा जाराला विचारील काय ? ' गावसासू ' मध्ये कुसुमकलिकेची आई लिझी आपल्या मुलीला आपला इतिहास सांगते, त्यांत पुढील वाक्यें येतातः " मी सोळा वर्षांची झालें तेव्हापासून तरुण मुलांबरोबर हिंडण्याचें स्वातंत्र्य मीं घेतलें. त्याच्याआधीं चोरून मी तरुण पोरांबरोबर हिंडत होतेंच...माझा पहिला प्रियकर ऑम्नीबसवाला गाडीवान होता...तो...जरी देखणा होता आणि त्याच्या मिशा जरी पीळदार होत्या तरी त्याच्यावर मी आपलें अंतःकरण जाऊं दिलें नाही. "[2] एक आई आपल्या मुलीजवळ असला इतिहास असल्या धडधडीतपणें सांगणें शक्य आहे काय ? ' परागंदें'त डॉ. सरंजामे लीलेला विचारतात, की तुला रुक्मिणीचा मत्सर ' होतो ' काय ? लीला लगेच उत्तरते, " अर्थात् होतो. मी स्त्रीच आहें, हें मी सरळ कबूल करतें. "[3] एक प्रेयसी आपल्या मत्सराचें इतकें धृष्ट प्रदर्शन आपल्या प्रियकरापाशी करील, असें वाटत नाही.

प्रश्नोत्तरांतील कृत्रिमपणा व धृष्ट कथन यांच्या जोडीला पात्रनिष्ठ भाषेचा अभाव हाहि एक दोष त्यांच्या संवादांत सतत दिसतो.

मात्र त्यांचे संवाद असे दोषपूर्ण असले तरी त्यांत कांही गुणहि आहेत. संवादांतील धृष्ट कथनामुळे मनुष्याच्या मनांतील अगदी खोल दडलेले भाव एकदम प्रकट होतात व ते आनंददायक वाटतात. शिवाय, त्यांचे संवाद म्हणजे अनेकदा बौद्धिक झटापटीचा रंगलेला फडच आहे, असें दिसून येतें. ' परागंदें'तील सरंजामे–गजपतराय यांचा संवाद[4] किंवा ' आशावादी 'तील नंदिका–विहंगमा यांचा संवाद[5] किंवा ' ब्राह्मणकन्ये 'तील एसतेर–शांताबाई यांचा किंवा सत्यव्रत—बिनयामिन यांचा संवाद[6] म्हणजे अशा बौद्धिक झटापटी आहेत. दोन मल्लांची कुस्ती पाहातांना किंवा कोंबड्यांची झुंज पाहातांना जी उत्कंठा, जो विस्मय, जी चमत्कृति अनुभवाला येते ती सर्व या

---

१. पृ. १२७. २. पृ. २८, २९. ३. पृ. १०८.
४. प्र. २१. ५. प्र. १३. ६. पृ. १५६–१५७ व पृ. २५० ते २५२.

संवादांत अनुभवाला येते व त्यांनी अवर्णनीय बौद्धिक आनंद मिळतो. कधी कधी स्वाभाविक संवाद लिहून शिवाय असा आनंद त्यांच्या द्वारां ते देऊं शकत, हें 'गावसासूं'तील 'ब्रिटिश म्युझियममधील संभाषणा'वरून सिद्ध होतें. हें संभाषण संवादचित्रणाच्या दृष्टीने विलक्षण सरस व चिन्तनीय आहे, असें जें प्रा. मा. त्र्यं. पटवर्धनांनी म्हटलें आहे,[१] तें अगदीं खरें आहे.

त्यांच्या कथनशैलींत विनोद, उपहास, उपरोध, बिंगें दाखविणें, पात्रांनी एकमेकांना अस्सल टोमणे देणें वगैरे गोष्टींमुळे बऱ्याच वेळां चांगला खमंगपणा येतो. 'गावसासू'मध्ये एका व्याख्यानांत एक महाराष्ट्रीय विद्यार्थी ओरडतो, की युरोपाय बाईशीं लग्न करण्याला हिंदु धर्मशास्त्राचा आधार आहे! अध्यक्षांनी बोलण्याची परवानगी देतांच तो म्हणतो, "मनुस्मृतीप्रमाणे देवलस्मृतिदेखील मान्य आहे आणि देवलस्मृतींत तो आधार आहे...तें आधारवाक्य 'सावळा वर बरा गौर वधुला' असें आहे."[२] कधी मोठ्या विनोदी कल्पना केतकर मांडतात व वाचकांना हसवतात. —'आपल्या तरुण मुलांना गुजराथी स्त्रिया आवडल्या तर त्यांच्याशीं प्रेम जुळवायला आपण गुजराथी पगडी डोक्यावर घातली तर काय झालें!"—अशी कल्पना त्यांनी 'परागंदे'मध्ये मांडली आहे.[३] विनोदासाठी द्व्यर्थी शब्दयोजना,[४] स्वभावांतील खोचेचें प्रदर्शन,[५] शाब्दिक कोट्या,[६] विनोदगर्भ प्रसंग[७] वगैरेंचा उपयोग ते अधूनमधून करतात. 'परागंदें'तील गजपतराय व कॅथलिन मर्फी यांचें वर्णन त्यांनी उपरोधपूर्ण केलें आहे आणि 'विचक्षणें'तील ९ व्या व १० व्या प्रकरणांत त्यांनी उपरोधाची अशी बहार उडविली आहे, की तीवरून शिवरामपंत परांजप्यांच्या उपरोधाची वारंवार आठवण व्हावी. त्यांनी सुधारकांबद्दल, ब्रह्मोंबद्दल, प्रार्थनों-बद्दल किंवा बंगाली लोकांबद्दल जें विकीर्ण लेखन केलें आहे, त्यांत त्यांचा उपहास चांगला दिसून येतो. 'ब्राह्मणकन्यें'त सालोमनचें एक बिंग ते एका मिल सेक्रेटरीकडून वदवितात;[८] त्यावरून बिंगांच्या प्रदर्शनाने त्यांचें कथन

---

१. प्रतिभा, जुलै १९३७. २. पृ. ९८. ३. पृ. ११९. ४. गा. सा., पृ. ४१. ५. कित्ता, पृ. १६; ब्रा. क., पृ. ८१. ६. ब्रा. क., पृ. ८०. ७. कित्ता, पृ. ९५., गा. सा; पृ. १२९. ८. पृ. २२३.

क्वचित् कसें फोडणीदार होतें, याची कल्पना येईल. ' गावसासू 'त सुनीति व मॅक्‌ग्राथ यांनीं एकमेकांला दिलेले टोमणे,[1] म्हणजे टोमण्यांनी ते आपलें कथन कसें चुरचुरीत करीत, त्याचा एक नमुना आहे. विनोद, उपहास वगैरेंचा भाग त्यांच्या कथनशैलींत असा लक्षणीय व वेधक असला तरी तो फारच अल्प आहे, हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे.

कथनामध्ये अवतरणांचा उपयोग करण्याची त्यांची सवय वारंवार जाणवते. त्यांचें अफाट वाचन व तीक्ष्ण स्मृति यांमधून या अवतरणांचा उगम झालेला दिसतो. कधी कधी हीं अवतरणें पुनरुक्त होतात आणि केतकरांच्या प्रतिभेंत वर्णनासाठी लागणारे नवनवोन्मेष नाहीत, हें स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थ, " ते नेत्र, ते कुरळ कुंतल, ते कपोल " हा श्लोक ' प्रियंवदे 'त[2] बिंबा-शारदा यांच्या वर्णनासाठी त्यांनी वापरला आहे व ' विचक्षणे 'त[3] तोच श्लोक पुन्हा संकर्षणाने काढलेल्या एका मधुमालतीसदृश चित्राच्या वर्णनासाठीहि उपयोगिला आहे. उत्कट भाववर्णन करण्याचें आपलें दौर्बल्य झाकण्यासाठीहि ते कधी अवतरणांचा उपयोग करतात. ' भटक्या ' मध्ये काशीची विरही अवस्था सांगण्यासाठी एका लावणीचा असा उपयोग केला आहे.[4]

त्यांच्या कथनशैलींतील शेवटचें व महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणजे गबाळेपणा किंवा सैलपणा हें होय. ' प्रियंवदे 'तील एका संवादांत प्रियंवदा म्हणते, की डॉक्टर भुस्कुटे एकदा वैजनाथशास्त्र्यांना " जेवायला " बोलाविण्यास गेले होते. त्यावर शारदाबाई विचारतात, " मग ते आले काय ? " तेव्हा प्रियंवदा उत्तरते, " छे, व्याख्यान देण्याचें त्यांनी नाकारलें. " येथें जेवण व व्याख्यान यांचा घोटाळा केतकरांनी केला आहे.[5] ' आशावादी 'त विहंगमा इंग्रजी कादंबरी वाचीत होती, असें पृष्ठ १७९ वर म्हटलें आहे; तर तत्पूर्वी पृ. १३४ वर इंग्रजी पुस्तक न समजण्याइतकी अडाणी तिला दाखविली आहे. पृ. ७० वर " आनंदरावाने " डॉ. नंदिकेस मागणी घातल्याचें केतकर सांगतात; पण हा आनंदराव कोण याचा पत्ता उभ्या कादंबरींत कोठेच सापडत नाही. लालनाथाऐवजी आनंदराव हें नांव त्यांनी गलथानपणें

---

१. पृ. १७४ ते १७९. २. पृ. २७. ३. पृ. २८. ४. पृ. ३५. ५. पृ. ११३.

लिहिलेलें दिसतें. उपसंहारांत ते म्हणतात, की " गोदावरीच्या मुलीचा बाप कोण, हेंहि पंतास [ देवीदासपंतास ] कळलें " पण गोदावरीचें जर देवीदास-पंतांशीं नुकतेंच मीलन झालें होतें तर तिला मुलगी कशी होणार ? आणि त्या मुलीचा बाप जर देवीदासपंतच असणार तर त्या बापाचें नांव देवीदासपंतास कळलें म्हणजे काय ? केतकरांना ' पद्मावती ' च्या मुलीच्या बापाबद्दल बोलावयाचें होतें; पण ' पद्मावती 'बद्दल ' गोदावरी ' घालून त्यांनी भलताच प्रसंग आणला आहे. ' ब्राह्मणकन्ये 'त पृ. ७६ वर त्यांनी सत्यव्रताऐवजी असाच शांताराम हा शब्द वापरला आहे व ' विचक्षणे 'त पृ. ४५ वर डॉ. तर्कश्यांच्या बायकोचें नांव उषा होतें, असें सांगून पृष्ठ ९६-वर तें लक्ष्मीबाई होतें, असें म्हटलें आहे. ' गावसासू ' त या गबाळेपणाचा एका ठिकाणीं कळसच होतो. कादंबरीच्या प्रारंभीं ' मी ' हा प्रथमपुरुषी कथाकथक असतो पण पुढे तो कोठे गुप्त होतो, तें एका ईश्वराला माहीत कीं केतकरांना माहीत !

### ३९. भाषेवरील इंग्रजीचें दडपण :—

केतकरांच्या भाषेचें स्वरूप अत्यंत अनाकर्षक आहे, याबद्दल कोणाचें दुमत नाही. वळणदार व बालबोध मराठीपासून केतकरांची भाषा दूर भरकटल्यामुळे तिचें स्वरूप असें अत्यंत अनाकर्षक झालें. अनेक वर्षांच्या परदेशनिवासामुळे, इंग्रजी लेखनामुळे व घरांतील वातावरणामुळे त्यांच्या भाषेवर इंग्रजीची जबर-दस्त छाप पडली आहे. त्यांचें लिखाण वाचतांना पावलोपावलीं असा भास होतो, की इंग्रजी ग्रंथाचें एक रद्दी मराठी भाषांतरच आपण वाचीत आहों. इंग्रजी धर्तीचे शब्दप्रयोग व वाक्यप्रयोग त्यांच्या लिखाणांत शेकड्यांनी मोजण्याइतके विपुल आहेत.

" मयूरी, तूं मला कांहीच आशा देत नाहीस काय ? " ( परा. ७० ) " जेवण जेवीत असतां " ( १०६ ) " पण तूं चांगला मुलगा झालें पाहिजेस " ( १०९ ) " मयूरीची प्रॅक्टिस दुखविली गेली." ( १५० ) " मी तुझ्यापेक्षा देखणा आहे काय ?—अरे, माझी अशी तंगडी ओढूं नको. पण डॉ. सरंजामे, मिस कामतवर तूं प्रेम करतोस कीं नाही ? " ( ३१ ) " उद्या तुला पुरा कार्यक्रम आहे. " ( आशा. ६५ ) " आपण आपल्या मुलीस सुखकर आयुष्य-

क्रम कसा देऊं, याची त्यांस कल्पना नव्हती." ( ब्रा. क. ४२ ) " सात-मजली गोपुरांवरून " ( ७१ ) " आपल्या बहिणीने आपल्या कवितेचें... गौप्य करावें, यांत आबाला आश्चर्य वाटलें नाही." ( ७७ ) " मिसेस कैलासनाथ जरी धूम्रपान करीत होत्या तरी त्या त्यासंबंधाने गूढ करीत नव्हत्या." ( गा. सा. ५ ) " ही पोरगी...आपलें प्रेम एका हिंदु तरुणालाच देत आहे." ( १९ ) " जो तरुण हिला मिळवील तो मत्सरस्थान होईल." ( ३६ ) " विवाहास लायक असलेले तरुण त्या मुलींकडे आकर्षिले जातील आणि त्यांची मुलगी मात्र दुर्लक्षिली जाईल." ( ९१ ) " आपण अजून खाणेंदेखील बोलाविलें नाही." ( १७८ ) " जे आम्ही स्त्रियांपासून अगदी अलिप्त ठेविलेले असतों ते इकडे आल्यानंतर स्त्रियांच्या अरण्यांत सोडून दिले जातों. ( १९२ ) " मला तुम्ही आशावादी बनवीत आहां." ( विच. २१७ ) " बाळचें आगमन जें व्यावहारिक कार्यासाठी होतें तें सामाजिक भेटीचा प्रसंग होई." ( २१८ ) " तिची एक मोलकरीण जी पुलाच्या वाडींत रहात होती ती कामावर आली नव्हती." ( २३१ ) " आकर्षिलों गेलों." (३१२) वगैरे शब्दप्रयोगांत व वाक्यांत इंग्रजीचें अनुकरण ते किती प्रकारांनी करीत, तें स्पष्ट दिसतें.

इंग्रजींत उद्देश्याला प्राधान्य देऊन उद्देश्य प्रथमेंत घालण्याची फार प्रवृत्ति आहे. अशी प्रवृत्ति मराठींत नाही. पण ते मराठीची प्रवृत्ति न जुमानतां उद्देश्य प्रथमत घालण्याचा इंग्रजी धडाका सारखा चालू ठेवतातः " त्याचें डोकें लवविणें अगदी सहज झालें." ( ब्रा. क. २४७ ) " तो सभ्य मनुष्याच्या पोषाखांत दिसला." ( २४८ ) " तिचें चहाचा सेट खरेदी करणें अभि-रुचीच्या दृष्टीने अगदी बिनचूक असे." ( गा. सा. ५६ ) " बाळ तिचें सावज होत होता." ( विच. २२७ ) वगैरे वाक्यांत उद्देश्य प्रथमेंत घातल्यामुळे त्यांची भाषा बाळबोध मराठीपेक्षा किती भिन्न होई, त्याचा उत्तम प्रत्यय येतो.

इंग्रजीप्रमाणे विशेषणात्मक वाक्यांशांची रेलचेल ते नेहमीच उडवून देतात. " करुणसुंदरीला मी अजून पेचांत सांपडलेली परंतु माझ्यावर प्रेम करणारी मुलगी समजत होतों." ( ब्रा. क. १३० ) " इत्यादि विचार जे तिच्या मनांत आले, तेच विचार सत्यव्रताच्या समागमाची इच्छा वाढवणारे झाले." ( १३८ ) " त्या मोठेपणाची ऐट करणाऱ्या आणि आपल्याकडे जर आपण

कोणास बोलाविलें तर आपण त्याचा मोठा सन्मान केला असें वाटणाऱ्या व त्याप्रमाणे वागणाऱ्या होत्या." (गा. सा. ९४) इत्यादि वाक्यांतील विशेषणात्मक वाक्यांश थेट इंग्रजीवरून उतरलेले आहेत.

केतकरांनी इंग्रजी शब्दांचींच केवळ मराठींत भाषांतरें केलीं असतीं तर तें तितकेसें अपरिचित वाटलें नसतें व खटकलें नसतें. पण ते शब्दांऐवजी शब्दप्रयोग व वाक्यप्रयोग, वर दर्शविल्याप्रमाणे, इंग्रजी धर्तीचे घालतात आणि आपल्या मराठीला जणू इंग्रजी बनवितात. वाचकाला हें 'इंग्रजी' मराठी सारखें खटकतें आणि तो त्रासून जातो. केतकर इंग्रजींत विचार करीत व मराठींत लिहीत त्यामुळे त्यांचें मराठी असें 'मिशनरी मराठी' किंवा 'पाद्री मराठी' बनलेलें दिसतें. 'मनोरंजन' मध्ये 'परागंदा' कादंबरीवर टीका करतांना श्री. सत्यबोध हुदलीकरांनी त्यांच्या भाषेवर टीका केली होती. तिला उत्तर देतांना ते म्हणतात, की "परागंदा कादंबरीच्या भाषेविषयी टीका पुष्कळ ठिकाणीं आली आहे. तथापि कादंबरी पुन्हा एकदा त्या दृष्टीने वाचूनहि भाषाविषयक दोष आढळून येत नाहीत. खाजगी तऱ्हेने चौकशी केली असतां, असें दिसतें, की परागंदा झालेल्या व्यक्तींच्या मराठी भाषेंत जे फरक उत्पन्न होतात ते या कादंबरींतील संभाषणांत व्यक्त झाले असल्यामुळे ते फरकच पुष्कळ वाचकांस अरुचि उत्पन्न करतात. पण तेथें कादंबरीकाराचा इलाज नाही. तसे फरक कादंबरींत नसते तर कादंबरीचें यथार्थत्व बिघडलें असतें."[1] केतकरांचें हें समर्थन परागंदा हिंदी लोकांच्या तोंडीं घातलेल्या भाषेबद्दल मान्य करावयास हरकत नाही. पण जेव्हा केतकर स्वतः निवेदन करतात तेव्हाहि त्यांची भाषा पाद्री पद्धतीची येते. 'ब्राह्मणकन्या', 'विचक्षणा' वगैरे कादंबऱ्यांत एकहि पात्र परागंदा हिंदी लोकांपैकी नसतां त्यांतील पात्रेंहि पाद्री मराठींतच बोलतात. तेव्हा केतकरांचें समर्थन अपुरें व लंगडें आहे, यांत संशय नाही.

## ३७. संस्कृत शब्दांची बोजड भरतीः—

विचार इंग्रजींत व लेखन मराठींत अशी विचित्र स्थिति झाल्यामुळे अनेकदा त्यांनी इंग्रजी शब्दांचीं भाषांतरें केलीं आणि संस्कृतशीं चांगला परिचय

१. वि. से., डिसें. १९२६.

असल्यामुळे हीं भाषांतरें त्यांनी संस्कृतच्या आधारें केलीं. कधी कधी आपल्या नव्या कल्पना व्यक्तवण्यासाठी त्यांनी संस्कृतवरून शब्द बनवले आणि कधी कधी आपल्या कल्पना सांगण्यासाठी त्यांना मूळ संस्कृतांतील शब्दहि आठवले. त्यामुळे मराठींत न आढळणारे पुष्कळ, संस्कृतोत्पन्न, नवे, बोजड शब्द त्यांच्या भाषेंत घुसले. 'स्त्रीशिक्षणविकासेच्छु' (आशा ७९), 'सुपथत्याग' (ब्रा. क. ४), 'भवितव्यविलोकन' (१६), 'गृहत्याग' (३५) 'सुशिक्षितता' (३५), 'जनपदहितकर्तृत्व' (४८), 'ऐंद्रियिक आकर्षण' (९२), 'द्रव्योत्पादनसमर्थता' (१३७), 'वैयक्तिकत्वाचें स्पष्टीकरण' (१७३), 'प्रत्यक्षमूलक ज्ञान' (१७४), 'भित्रता' (२५५), 'आदराभाव' (गा. सा. ६२), 'सहकारिता' (७६), 'सत्कारेच्छु' (९४), 'अभ्यागता' (१०२), 'औद्धत्ययुक्त' (१२७), 'नाट्यमंदिरगामी जनता' (१५८), 'नियंत्रणेच्छा' (१६७), 'यशस्वित्रेचें असौख्य' (१७३), शीर्षनमन' (१७५), 'विवाहार्हता' (विच. १६), 'परीक्षोत्तीर्ण कर्तृत्वाचा काळ' (१९), 'उपहास्यास्पद' (३२), 'प्रेमाभाव' (४८), 'आयुष्यकार्यनिश्चय' (६७), 'आश्रमीय सदाचरण' (७९), 'पद्मनाभीय पूरणिका' (१०७), 'भावनात्मकता' (२०७), 'संशययुक्तपणा' (२१३), 'विवाह्य' (२४१), 'परस्परानुकूल्य' (२८३), 'खैलिक चतुःसूत्री' (३०७) वगैरे शब्दांवरून त्यांच्या भाषेंत संस्कृतोत्पन्न, बोजड व अपरिचित शब्दांची किती गर्दी होते, याची कल्पना येऊं शकेल. या शब्दांपैकी 'नाट्यमंदिरगामी जनता', 'शीर्षनमन' वगैरे शब्द इंग्रजी शब्दांच्या भाषांतरांतून निर्माण झाले आहेत; 'ऐंद्रियिक आकर्षण', 'विवाहार्हता', 'विवाह्य' वगैरे शब्द प्रत्यक्ष इंग्रजी शब्दांच्या भाषांतरांतून निर्माण झालेले नसून आपल्या कल्पना अचूकपणें व्यक्त करण्यासाठी त्यांनी बनविले आहेत आणि पूरणिका, जनपदहितकर्तृत्व, खैलिक वगैरे शब्द मूळ संस्कृतांतून त्यांनी उचलले आहेत.

नाना तऱ्हांनी त्यांच्या भाषेंत घुसलेल्या या शब्दांनी त्यांची भाषा कांहीशी अवघड केली; आणि विशेष म्हणजे बालबोध मराठीपेक्षा तिचें रूप अगदी भिन्न बनविलें. क्वचित् 'ऐंद्रियिक आकर्षण', 'वैयक्तिकत्वाचें स्पष्टीकरण' यांसारख्या शब्दांनी त्यांची भाषा कर्णकटुहि झाली. या शब्दांपैकी कांही शब्द त्यांना अपरिहार्यपणें वापरावे लागले, हें खरें; पण बहुसंख्य शब्द विनाकारण त्यांनी वापरले, यांत शंका नाही. 'मित्रते'बद्दल मैत्री, 'अभ्यागते'बद्दल

पाहुणी, ' सहकारिते 'बद्दल सहकार्य वगैरे शब्द त्यांना वापरतां आले असते आणि आपली भाषा बालबोध मराठीला अगदी जवळ राखतां आली असती. वेदांच्या संहितांमधील पुरवणीवजा भागाला ' खिल ' ही संज्ञा आहे. उदाहरणार्थ, वाजसनेयि संहितेंतील २६ ते ३५ अध्यायांना ' खिल ' म्हणतात. त्या वेदसंबद्ध नांवावरून ' विचक्षणें'त तर्कटनीतीला जोडलेल्या पद्मनाभाच्या पुरवणीवजा चतुःसूत्रीला त्यांनी "पद्मनाभाची खैलिक चतुःसूत्री" हें नांव दिलें!

संस्कृतोत्पन्न शब्दांच्या या अतिरिक्त वापरामुळे त्यांचीं वाक्यें कशीं विचित्र बोजड किंवा क्लिष्ट बनत, तें पुढील वाक्यांवरून दिसूं शकेल. " ती म्हणे, की बगदादी व यूरोपीय ज्यू लोकांत एसतेर नांवाचें अस्तित्व आणि बेने-इस्रायलांत त्याचा अभाव मूलस्थानीय ज्यूंच मिश्र रक्ताचे बनले त्याचें द्योतक आहे. " ( ब्रा. क. ६१ ) " मी तुझ्याशीं वागतांना औचित्याचा अतिक्रम केला असेल पण तो केवळ प्रेममूलक आहे. " ( ८९ ) " तिचा चेहरा आनंदयुक्त झाला होता. भेटावयास आलेल्या मंडळींशीं स्मितयुक्त बोलण्याच्या तिच्या नेहमीच्याच पद्धतीमुळे तिची आकर्षक दिसणारी मुद्रा या आनंदयुक्ततेमुळे अधिकच आकर्षक झाली होती. " ( २२९ ) " आपल्याकडे ही संशययुक्त नजरेने पहात आहे, असा कालिंदीस भास झाला. त्या स्त्रीच्या डोळयांत निव्वळ संशययुक्तता आहे कीं त्या संशययुक्ततेंत मत्सरयुक्तता देखील आहे, याविषयीं कालिंदीच्या मनांत विचार उत्पन्न होत होते. " ( २६१ ) " मिसेस दास या अत्यंत आनंदरूप झाल्या. " ( गा. सा. १९९ ) " गृह्य इतिहासाच्या वैशिष्ट्यामुळे मधुमालतीने मुद्दाम उत्पन्न केलेली दूरता फार दिवस टिकली नाही. " ( विच. २८ ) " विचक्षणेने पराभूतत्वाची छटा न दाखवितां स्मितयुक्तताच दाखविली. " ( १३९ ) " भिन्नधर्मीय समाजांत शिरल्याने उच्चवर्गसायुज्यता मिळेल काय याविषयी अधिकाधिक संशय उत्पन्न होऊं लागला आहे. " ( १४५ ) शास्त्रीय लेखनांत अचूकपणा व मोजकेपणा ( ब्रेव्हिटी ) यांची अपेक्षा असते; त्यामुळे त्यांत अवघड पारिभाषिक शब्द आले, बोजड शब्द आले तरी चालतात. पण कादंबरीमध्ये प्रसाद व सौंदर्य यांची मुख्य अपेक्षा असते, त्यामुळे त्या गुणांची हानि करणारे अवघड, पारिभाषिक शब्द व बोजड शब्द कादंबरींत खपत नाहीत. केतकरांचे बहुतेक संस्कृतोत्पन्न शब्द या दृष्टीनेच दोषास्पद वाटतात.

## ३८. अनभिजात, असुंदर व अशुध्द शब्द:—

केतकर केवळ इंग्रजी व संस्कृत पद्धतीचेच शब्द किंवा शब्दप्रयोग बनवून थांबत नाहीत; तर अस्सल मराठमोळा पद्धतीचे पण नवीन नी अपरिचित शब्द ते पुष्कळ बनवतात. ' मालखपव्या ' ( परा. ११४ ), ' गोतविसरू ' ( आशा. ५४ ), ' जातविसरू ' ( ५४ ), ' परीक्षामोजू ' ( ब्रा. क. १९५ ), ' जावईपकडू ' ( गा.सा. ७० ) , ' बाजारपाठलागी ' ( भट. ८ ), ' भजीतळेथ ' ( १०३ ) वगैरे शब्द त्या प्रकारचे आहेत. हे शब्द शुद्ध मराठी असले तरी नवे आहेत व म्हणून त्यांमुळे नावीन्याचा, अन्वर्थकतेचा वगैरे आनंद होऊनहि ते केतकरांची भाषा अभिजात मराठीपेक्षा कांहीशी वेगळी बनवितात.

' कां की ' ( आशा. ९२ ), ' क्रिया ' ( ब्रा. क. १३३, २१५, गा. सा. १६८, विच. २, ७, ८, २९, ३०, १२०, १४५, १८८, १९०, ३०३, ३०८ वगैरे वगैरे ) ' चावटपणा ' इत्यादि कांही शब्द केतकरांचे फार लाडके आहेत. ते तर सारखा धुडगूस घालून त्यांच्या भाषेला विचित्र वैशिष्ट्य आणतात. ' पृच्छती झाली. ' ( ब्रा. क. २३६ ), ' सांगते झाले. ' ( २३९ ), ' व्यक्त करती होईल. ' ( २६४ ), ' करता झाला. ' ( गा. सा. ३५ ), 'पाठ फिरवती झाली. ' ( १४३ ), ' पृच्छिलें. ' ( १९७ ), ' विचार करावयास लावती झाली. ' ( विच. ७ ), हे दुसऱ्या तऱ्हेचे लाडके शब्दप्रयोग त्या विचित्र वैशिष्ट्यांत आणखी भर घालतात.

"मनाच्या अगदी आंतल्या **कोठींत**" (परा.३६), "माझा **पैसेवालीपणा**" ( ११५ ), " **दुःप्रसिद्धि** " ( ब्रा. क. ५ ), " त्यांनी...शांताबाईच्या... **वांशिक प्रश्नाकडे** [ म्हणजे अकुलीनपणाकडे ! ] दुर्लक्ष केलें. " ( २५ ), ' **अन्यलिंगीशीं** ओळख करण्याचा प्रयत्न ' ( ७९ ), ' दारिद्र्य व श्रीमंती या दोहोंमधील **खळगा** ' ( १३० ), ' मिसेस दास धक्का **लागल्यासारखें** होऊन म्हणाल्या. ' ( गा. सा. ७० ), ' तुमच्या या सामाजिक सासूबाई-पणाच्यामागे सँक्शन काय आहे ? दुसऱ्यास **इजा** करण्याची शक्ति आहे काय ? ' ( १२७ ), प्रो. लोंढे...लेखासाठी **कथित** करीत. ' ( विच. २२ ), ' **स्टेजनांव** ' ( १६१ ), यांतील शब्द निरनिराळया कारणांनी आक्षेपार्ह आहेत. अशा आक्षेपार्ह शब्दांनीहि त्यांच्या भाषेचें अभिजात स्वरूप नष्ट होऊन ती बकाल होते.

कधी कधी अवाचक किंवा अनर्थकारक शब्द वापरून ते कमालच करतात. उदाहरणार्थ " आफ्रिकन स्त्रिया युरोपीयन **स्त्रियांच्या** रखेल्या होतात ! " ( आशा. २०९ )—असें त्यांनी म्हटलें आहे. " तेथे कोच वगैरे सुखाने ओलांडण्याजोगें [ म्हणजे ज्यावर सुखाने लवंडतां येईल असें ! ] सान्निध्य [ म्ह. फर्निचर ] असे. " ( ब्रा. क. १२६ )—अशीं वाक्यें त्यांनी लिहिलीं आहेत. " लंडन बाजारांतील हिंदु तरुणींची **विक्रयता**" [ म्ह. लग्न होण्याची संधि ! ] ( गा. सा. ८३ )—अशीं शीर्षकें त्यांनी दिलीं आहेत. " त्यांना काटकसरीने **खर्चिकपणा** [ म्ह. खर्च ! ] कसा करावा, हें समजत असे. " (गा. सा. ९३)—अशीं विधानें त्यांनी केली आहेत.—आणि "तुझ्या **बाबानेच** [ म्ह. वडिलांनी !] लग्न लावलें तर माझी हरकत नाही. " (विच.३१३) " त्याचें खरें स्वरूप डॉ. सरंजामे यास ठाऊक होतें, पण तितकें त्याच्या **बापालाहि** [ म्ह. वडिलांना ! ] ठाऊक होतें कीं नाही कोण जाणे. " ( परा. ४९ )—अशीं वाक्येंहि त्यांनी घातलीं आहेत. " खरें विवाहसौख्य दूरस्थित असलें म्हणजे कल्पनेंत मनुष्य अवगाहन करूं लागतो आणि काल्पनिक वैवाहिक सौख्यामध्ये **गटंगळ्या खातो.** [म्ह. डुंबतो !] त्याच्या **अननुभूत** सौख्यापेक्षा [ म्ह. प्रत्यक्ष सौख्यापेक्षा !! ] काल्पनिक विवाहसौख्य अधिकच असलें पाहिजे. " ( भ. २९ )–या वाक्यांत अवाचक व अनर्थकारक शब्दांमुळे त्यांनी माजविलेला घोटाळाहि उल्लेखनीय आहे. असो.

नव्या बनावटीचे शब्द, लाडके पुनरुक्त शब्द व शब्दप्रयोग, असुंदर व अनुचित शब्द, अवाचक व अनर्थकारक शब्द यांनी त्यांची भाषा अतिशय दोषसंकुल होते, हें एवढ्या विस्तारावरून सहज स्पष्ट होईल. नाटक व सिनेमा, तूं व तुम्ही यांची गल्लत ते अधून मधून करतात, हेंहि येथे ध्यानांत घेण्यासारखें आहे. [ पाहा, गा. सा. १४३, गों. प्रि., १११, विच. १६५. ]

## ३९. दोषसंकुल वाक्यरचना :—

त्यांची वाक्यरचना पाहावी तर तीहि अनेकदा दोषांनी बुजबुजलेली आहे. आतापर्यंतच्या विवेचनांत त्यांच्या वाक्यरचनेंतील कांही दोष येऊन गेले आहेत. त्याव्यातिरिक्त पुढील दोष त्यांच्या वाक्यरचनेंत दिसतात. " कालिंदीला एक तुझ्यासारख्याच जन्माच्या मनुष्याकडून मागणी आली

आणि त्या मागणीवरून तुझ्या नवऱ्याला राग आला आणि ती मागणी तुझ्या नवऱ्याने नाकारली, हें ऐकून मला फार दुःख झालें." ( ब्रा. क. १९ ) —या वाक्यांत दूरान्वय व बेंगरूळपणा आहे. " कर्मधर्मसंयोगाने **तिच्या** खुर्चीच्या पाठीमागेच **कालिंदीचा** भाऊ सत्यव्रत हा बसला होता." ( ब्रा. क. २६ )—या वाक्यांत ' तिच्या ' व ' कालिंदीच्या ' या शब्दांची उलटापालट होऊन वाक्य अशुद्ध झालें आहे. आधीं नाम व मग सर्वनाम हा मराठींतील क्रम होय. " तूं केवळ औचित्याच्या कठोर नियमाची **स्वतः लागणारी** विलक्षण आत्मसंयमनाची व त्याबरोबरच मजविषयी प्रेमभाव अपुरा असलेली मुलगी आहेस, असें वाटूं लागलें." ( ब्रा. क. ९४ )—हें वाक्य बेडौल असून त्यांत कांहीं निरर्थक शब्द रेंगाळत आहेत. " या गोष्टी**पासून** कालिंदीच्या आचरणाविषयी जी शंका त्याच्या **मनांत येई** ती जरी त्याच्या **मनांत डोकावत होती** तरी तिला तो नाकारीत होता. आपली बहीण अयोग्य संबंध पत्करती झाली ती अगोदरच तिचें वाकडें पाऊल पडलें, त्यामुळे नसून केवळ मिश्र रक्ताच्या स्त्रीस भावी आयुष्यक्रमाविषयी नैराश्य उत्पन्न झालें त्यामुळे पत्करती झाली, असें त्यास हवें होतें "—या वाक्यांत पुनरुक्ति आहे, सफाई नाही, हें सहज दिसण्यासारखें आहे. शिवाय ' पासून 'बद्दल संदर्भाप्रमाणे ' मुळे ' हें अव्यय हवें होतें. ' या कथेंत जें कांहीं आणखी दाखविलें होतें तें हें की **जेव्हा** तरुणाची आणि स्वतःची अविश्वसनीयता उपेंद्रव्रजेस किंबहुना दोघांस कळली **असतां** दोघेंहि मळवलीस एकत्र भेटलीं आणि त्याचे वाईट परिणाम झाले." ( ब्रा. क. ११६ )-येथे ' जेव्हा ' अनवश्य आहे. " ज्या समाजांत खाजगी मालमत्ताच नाही त्या समाजाचें स्वरूप कसें असेल,याची त्याला कल्पना होईना **व तेव्हा त्याने** कांहीं हिंदी पत्रें घेऊन **वाचीत बसला होता**." (ब्रा. क. १८५)—यांत कर्त्याप्रमाणें क्रियापद नाही आणि 'व. तेव्हा' पैकी एक उभयान्वयी अव्यय अनवश्य आहे.

पुढील वाक्यांतील दोष आतापर्यंतच्या स्पष्टीकरणावरून, ठळक टंकावरून व कंसांतील निर्देशावरून सहज कळतील व सदोष वाक्यरचना आणखी स्पष्ट होईल. " सांपत्तिक विषमतेचें उन्मूलन **करून** गिरणीच्या धंद्यांतील मजुरास त्याच्या प्रयत्नाचें फल अधिक **मिळण्यास** क्षेत्र **मिळावें**, हें माझ्या आयुष्याचें प्रथम ध्येय आहे." ( ब्रा. क. २३८ ) " आपण द्रव्य नाकारणारे

आहोंत, हें कळल्यामुळे तिची थोडीशी निराशा झाली आहे, हेंहि आपणांस दिसलें तर **आपल्याला** याच परिस्थितींत म्हणजे **आपण** ध्येयासाठी द्रव्य लाथाडणारे आहोंत, याला प्रत्यक्ष पुरावा मिळाला असतां ती **आपणाला** पत्करते कीं काय, हें पाहिलें पाहिजे." ( ब्रा. क. २६६ ) [ बेंगरूळ ] " खरा बखरकार सापडण्यापूर्वी कांही थोडे देखावे **पाहिलेल्याचें** त्रोटक **टाचण** म्हणून या **कथेचा** उपयोग आहे." ( गा. सा. ३ ) [ ' पाहिलेल्या कांही, थोड्या देखाव्यांचें टाचण म्हणून ' असें हवें. ] " जणू काय आपल्या मनांतीलच गोष्ट, पण त्या पाठीमागच्या गोष्टी मनाला लागल्यामुळे मीं हें कौटिल्य केलें, असें तुम्ही त्यांना कळवायला माझी कोणतीच हरकत नाही." ( गा. सा. १४४ ) [ अर्थ पूर्णपणें स्पष्ट होत नाही. ] " हें गीत **ज्या वेळेस** तिने गायिलें **तेव्हा** बंगाली मंडळी अगदी खूष होऊन गेली. पण इतर हिंदी विद्यार्थी **तितके खूष झाले नाहीत**; पण **तिचा** मंजुळ स्वर, हिंदुस्थानी पद्धतीचे कांही शब्द गातांना **सुनीतिच्या** मुखावर आलेलें रसयुक्त [ ? ] औत्सुक्य आणि तो एकंदर [ ? ] वासकसज्जिकेचा पोषाख पाहून इतर हिंदी मंडळी **अगदी खूष होऊन गेली**." ( गा. सा. १६० ) त्यांची वाक्यरचना बहुधा सुगम असते; पण अनेकदा ती कशी अशुद्ध, बेंगरूळ व दुर्बोध होते, तें या उद्धृत वाक्यांत अगदी उघड दिसतें.

### ४०. भाषेचें एकंदर स्वरूपः—

कादंबरीसारख्या ललित वाङ्मयप्रकाराची भाषा ललित व सुंदर असावी; लालित्यासाठीं व सौंदर्यासाठी तींत उचित अलंकार व कल्पना यांचा वापर व्हावा, अशी साहजिक अपेक्षा असते. पण ही अपेक्षा केतकरांच्या भाषेनें कुठेहि पूर्ण होत नाही. इंग्रजी वळणाचे शब्दप्रयोग व वाक्यप्रयोग, जाडे व अपरिचित संस्कृत शब्द, नवे पण तऱ्हेवाईक मराठी शब्द, अवाचक व असुंदर शब्द, बेंगरूळ, बेडौल व अशुद्ध वाक्यें वगैरेंनी त्यांची भाषा अतिशय खडबडीत व बकाल झाली आहे. बैलगाडींतून जातांना जसा चाकांचा खडखडाट होतो, वारंवार धक्के बसून हाडें खिळखिळीं होतात त्याप्रमाणे त्यांची भाषा वाचीत असतांना वाचकाची स्थिति होते. सुंदर अलंकार किंवा कल्पना यांची भेट त्यांच्या भाषेंत सहसा व्हावयाचीच नाही. त्यांनी कधी-

काळीं उपमा दिलीच तर ती ठरीव आणि अगदी गद्य अशी ' कंपनी 'ची उपमा असावयाची, हें जणू ठरलेलें आहे.[१] कपिलाषष्ठीचा योग जमून त्यांनी रूपक वापरलें तर त्याची गत पुढीलप्रमाणे होते. " आपलें मन, नीतीची वेसण जरा सैल करावी आणि **कामवृषभाला** यथेच्छ संचार करूं द्यावा, या भावनेचें झालें तरी लोक आपणांस काय म्हणतील या एका भावनेचेंच दडपण आपल्यावर राहातें. पण जेव्हा एक देश सोडून दुसऱ्या देशांत आपण जातों तेव्हा मधल्या बंदरांत असतांना **मनोवारूचा** लगाम जरा सैल सुटतो."[२] या वाक्यांत प्रथम ' काम ' हा ' वृषभ ' किंवा बैल होता आणि त्या बैलाचें धनीपण ' मना 'कडे होतें; पण लगेच धनी असणारें मन पुढे ' वारू ' किंवा घोडा बनलें आहे ! सारांश, अलंकार आणि कल्पना यांचा त्यांच्या भाषेंत दुष्काळ आहे आणि जेव्हा केव्हा अलंकार आणि कल्पना त्यांच्या भाषेंत येतील तेव्हा त्यांत सौंदर्य नसावयाचें, असा जवळ जवळ निरपवाद नियम आहे. त्यांच्या अशा अत्यंत दोषसंकुल भाषेंत एखादा गुण असलाच तर तो हा आहे, की अभिधामूलक अर्थव्यक्ति त्या भाषेने बऱ्याच वेळां व बऱ्याच प्रमाणांत होऊ शकते ! याशिवाय दुसरा कोणताहि गुण त्यांच्या भाषेंत दाखविणें अगदी अशक्य आहे. त्यांच्या या गुणहीन व दोषसंकुल भाषेचा त्यांच्या कादंबऱ्यांच्या एकंदर वेधकपणावर व कलात्मकतेवर इतका परिणाम झाला आहे, की त्यांच्या कादंबऱ्या " कलेच्या दृष्टीने हिणकस " व्हावयाला त्यांची भाषा हें एक महत्त्वाचें कारण होय, असें माडखोलकरांसारखे टीकाकार म्हणतात.

### ४१. व्यक्तित्व आणि कादंबऱ्या[३]:—

केतकरांच्या कादंबऱ्यांचा त्यांच्या व्यक्तित्वाशीं अत्यंत घनिष्ठ संबंध आहे. किंबहुना असें म्हणतां येईल, की त्यांच्या विशिष्ट व्यक्तित्वामुळेच त्यांच्या कादंबऱ्यांना मराठी वाङ्मयांत स्वतंत्र व विशिष्ट स्थान प्राप्त झालें. प्रज्ञा हें त्यांच्या व्यक्तित्वाचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य होतें. त्या प्रज्ञेच्या जोरावर नवे,

---

१. उदा० परा., पृ. ९३. २. आशा, पृ. २०६. ३. या कांडांत व्यक्तित्वाचे जे विशेष सांगितले आहेत त्यांचें साधार विवेचन माझ्या डॉ. केतकरांवरील प्रबंधांत केलेलें आहे. येथे विस्तारभयास्तव आधार दिलेले नाहीत.

विलक्षण, विपुल नि सूक्ष्म विचार ते सांगूं शकले आणि समाजाचें मूलगामी विश्लेषण करूं शकले. त्यांच्या कादंबऱ्यांतील विचारप्रवर्तन व समाजविश्लेषण म्हणजे त्यांच्या प्रज्ञेचा आविष्कार होय. त्यांची निरीक्षणशक्ति मोठी सूक्ष्म अन् व्यापक असे. ती सामाजिक अवलोकनांत नि नाना व्यक्तींची पाहाणी करण्यांत रंगून जाई. त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांत समाजवर्णन व व्यक्तिवर्णन यांनी मोठा भाग व्यापून टाकला. व्यक्तींची पाहाणी करतांना व्यक्तींच्या मनांत बुड्या मारून त्यांचा ठाव घ्यावा याची त्यांना हौस होती. इतकी की आपल्या नवपरिणीत पत्नीच्या मानसिक प्रक्रियांचें निरीक्षण करून तिला प्रयोगशाळेंत विच्छेदनार्थ आणलेल्या प्राण्याप्रमाणे वागविण्यांत त्यांना कांही अनैसर्गिक वाटलें नाही ! या हौसेमुळे मनोविश्लेषणाचा एक नवा नमुना ते कादंबऱ्यांत मराठी वाचकांना सादर करूं शकले. ते मुख्यतः प्रज्ञावन्त असल्याने जगांतील सौंदर्यपूर्ण गोष्टींपेक्षा उद्‌बोधक गोष्टी बघण्याकडे त्यांची प्रवृत्ति होती आणि धारणा किंवा स्मृति असामान्य असल्याने त्या उद्‌बोधक गोष्टींचें एक असीम भांडार त्यांच्या मनांत साठलें होतें. हें सारें भांडार त्यांनी कादंबऱ्यांतून रितें केलें आणि त्यांच्या कादंबऱ्या बोधबहुल बनल्या; त्यांना ज्ञानकोशाचें स्वरूप आलें.

पण निरीक्षणशक्ति, मनोगाहनशक्ति, धारणा वगैरेंनी सज्ज झालेली प्रज्ञा त्यांच्यापाशी जितक्या मोठ्या प्रमाणांत होती तितक्याच छोट्या प्रमाणांत त्यांच्यापाशी प्रतिभा होती. प्रतिभावन्त पुरुष व विशेषतः प्रतिभावन्त कादंबरीकार सौंदर्यग्राही दृष्टीने जगाकडे पाहातो; जें दिसतें त्यांत कल्पनेची भर घालतो; त्याची मोडजोड करतो आणि एक लहान पण परिपूर्ण, अभिनव व सुंदर प्रतिसृष्टि निर्माण करतो. त्यांची प्रतिभा क्षीण असल्याने यांपैकी कोणतीच गोष्ट पुरेशा प्रमाणांत त्यांनी केली नाही. सौंदर्याची त्यांच्या कादंबऱ्यांत वाण उत्पन्न झाली आणि कल्पिताचा तुटवडा पडला. शिवाय, त्यांची कादंबरी म्हणजे एक परिपूर्ण कलाकृति आहे, असें वाटणें अशक्य झालें. त्यांच्या कादंबरींत विषयाचें विवेचन, कथांची परस्परसापेक्ष जुळणी, पात्रचित्रण वगैरे अंगें व्यक्तिशः अपूर्ण राहिलीं आणि त्या सर्व अंगांचा मिळून एकजीव तयार झाला नाही. विकीर्ण, स्फुट, विस्कळित गोष्टींचा संग्रह म्हणजे त्यांची कादंबरी असा संस्कार वाचकावर होऊं लागला. ज्या कादंबऱ्या

विशिष्ट विषयावर त्यांनी केंद्रित केल्या आहेत त्या कादंबऱ्यांचे बाबतींतदेखील हें खरें आहे. विषयामुळे त्या कादंबऱ्यांना एक सर्वसमावेशक तत्त्व मिळतें; पण त्या तत्त्वाने सर्व कादंबरी म्हणजे एक ' परिपूर्ण ' ' कलाकृति ' आहे, असें वाटत नाही. प्रतिभावन्ताचा आणखी एक गुण असा, की तो वाचकाच्या नाना भावना जागृत करूं शकतो. पण हा गुण फार थोडा असल्याने केतकर वाचकाच्या भावना जागृत करूं शकत नाहीत आणि त्यांच्या कादंबऱ्यांत रसपरिपोष होत नाही. प्रतिभावन्त स्वतः निर्माण केलेली ' प्रतिसृष्टि ' गोचरहि करूं शकतो. पण प्रतिभेच्या अल्पत्वामुळे केतकरांच्या कादंबऱ्यांत दृश्य, श्राव्य, स्पर्श्य असा गोचर भाग येत नाही आणि त्या ' अगोचर ' व बुद्धिगम्य बनतात. प्रतिभावन्ताला आपली प्रतिसृष्टि ' सुंदर ' बनवावयाची असते व त्याकरिता प्रमाण, औचित्य, श्रवण-सुभगता वगैरेंची जाणीव त्याला जागृत ठेवावी लागते. पण ही जाणीव केतकरांपाशी जवळ जवळ नसल्याने त्यांची पात्रसंख्या कधी प्रमाणाबाहेर फुगली, कधी मुख्य कथेच्या मानाने उपकथा व पूर्ववृत्तें मोठीं झालीं,[1] कधी मुख्य पात्र बाजूला पडून गौण पात्र पुढे आलें[2] आणि सदैव भाषा कर्णकटु राहिली. पात्रचित्रणाला ते क्वचित् मागाहून जोड किंवा ठिगळें लावतात त्याचें कारण सौंदर्यापेक्षी औचित्य त्यांच्यांत कमी होतें हें होय.

सारांश, निरीक्षणशक्ति, मनोगाहनशक्ति, धारणा वगैरेंनी सज्ज झालेली प्रचंड प्रज्ञा व जिचा सगळा परिवार पांगला आहे अशी क्षीण प्रतिभा या दोन गोष्टींचें मीलन त्यांच्या व्यक्तित्वांत झालें होतें आणि त्या मीलनांतून त्यांच्या कादंबऱ्यांचें वैशिष्ट्यपूर्ण, स्वतंत्र स्वरूप जन्म पावलें.

त्यांच्या कादंबऱ्यांतील अंगोपांगांकडे व तपशिलाकडे आणखी दृष्टिक्षेप

---

१ उदा०आशावादींतील मिसेस हंटरचें पूर्ववृत्त व नंदिका-विहंगमा-अलकनंदा यांच्या उपकथा पाहा; किंवा भटक्यांतील रा. ब. आपटे, नर्मदाबाई सरवटे यांच्या उपकथा बघा. २. उदा० 'विचक्षणें'त विचक्षणा मुख्य म्हणावी तर तीमध्ये मधुमालती, कृपा व विशेषतः मंजुळा यांना महत्त्व आलें आहे आणि ' गावसासूं 'त कादंबरीच्या नांवावरून मिसेस कैलासनाथ या गांवसासूला प्रमुख समजावें तर ती मुळीच प्रमुख नाही.

टाकला तर तीं अंगोपांगें व तो तपशील यांमागे त्यांच्या व्यक्तित्वाचे आणखी विशेष कारणरूपाने उभे असलेले दिसून येतात. त्यांच्यामध्ये गबाळेपणा व दडपेगिरी बऱ्याच प्रमाणांत वसत होती. पैकी गबाळेपणामुळे एकदा रंगभूमी-वर आणलेलीं पात्रें त्यांनी नंतर बेपत्ता केलीं, पात्रांचीं नांवें बदललीं, कथनाला प्रथमपुरुषी प्रारंभ करून नंतर त्याला चाट दिली आणि नाना घोटाळे केले. त्यांच्या षड्विध बोधांत 'ज्ञानदान' म्हणून जो भाग पूर्वी सांगितला तो बऱ्याच अंशीं त्यांच्या दडपेगिरीमुळे कादंबरींत आला आहे. केवळ प्रस्तुत तेंच सांगावयाचें, विषयांतराची दडपेगिरी करावयाची नाही, असें त्यांनी ठरविलें असतें तर इतकें ज्ञान त्यांना कादंबरींत घुसडतां आलें नसतें. 'ब्राह्मणकन्या' छापीत असतां आधी 'विद्यासेवकां'त प्रसिद्ध झालेलीं प्रकरणें त्यांनी छापखान्याकडे पाठविलीं; पण 'ब्राह्मणकन्ये'च्या मजकुरामागे माधव जुलियनच्या 'सुधारक' काव्याचें जें समालोचन छापलेलें होतें तें खोडून टाकण्यास ते विसरले. त्यामुळे 'ब्राह्मणकन्ये'बरोबर तें समालोचनहि जुळाऱ्यांनी जुळविलें व उपमुद्रितावर उठवून आणलें. जुळाऱ्यांचे श्रम वाया जाऊं नयेत म्हणून त्यांनी त्या समालोचनाच्या पुढेमागे दुवा जुळवणारीं वाक्यें लिहून तें समालोचन 'ब्राह्मणकन्यें'त सुखेनैव दडपून दिलें ![1] त्यांची कामभावना सरासरीपेक्षा थोडीफार अधिक तीव्र होती. त्यामुळे 'चावट' वर्णनें किंवा उत्तान शृंगार त्यांच्या कादंबऱ्यांत कांही वेळां समाविष्ट झाला.[2] वेश्या, रखेल्या, कडू प्रजा यांवर त्यांनी पुष्कळ लिहिलें, याचें कारण त्यांच्या समाजशास्त्रीय जिज्ञासेंत आहे; पण त्यांच्या कामभावनेशींहि त्या लिहिण्याचा संबंध असणें शक्य आहे. त्यांचे रागद्वेष मोठे बळकट होते. त्यांना कोंकणस्थपणाचा व ब्राह्मणपणाचा अभिमान असे; सुधारकांचा, प्रार्थनोंचा, बंगाल्यांचा तिरस्कार असे; आणि न्यायमूर्ति रानडे, चंदावरकर, भांडारकर, न. चिं. केळकर, म. गांधी वगैरे व्यक्तींचा द्वेष

---

१. पाहा, 'साहित्यिकांच्या गोष्टी' मनोहर, सप्टें. १९४५. २. उदा० गों. प्रि. मधील हरिभय्या–बिंबा यांच्या शृंगारचेष्टांचें वर्णन, प्र. १६; आणि 'परागंदे'तील रघुनंदन–मत्तमयूरी यांच्या शृंगारचेष्टांचें वर्णन, प्र. २२; पाहा.

असे. त्यांचे हे सारे रागद्वेष कादंबऱ्यांतून विखरून राहिलेले आहेत. त्यांच्या स्वभावांत विनोद, उपहास, उपरोध, खवचटपणा यांची एक विशेष लकेर होती. ती लकेर त्यांच्या कथनशैलींत अनेकदा प्रकट झाली आहे. त्यांचा विक्षिप्तपणा त्यांच्या लोकविलक्षण विचारांत स्पष्ट होतो. त्यांचा देशाभिमान फार प्रखर होता. देशाच्या असंख्य प्रश्नांवर जे असंख्य विचार त्यांनी कादंबऱ्यांत मांडले, त्याचें कारण त्यांचा प्रखर देशाभिमानच होय. अध्यात्म्याविषयींची त्यांची उदासीनता व ऐहिकाविषयींचा त्यांचा उत्साह त्यांनी ज्या प्रकारचीं पात्रें चितारलीं त्यावरून दिसून येतो. त्यांचें एकहि पात्र आध्यात्मिक भावनांत गुंतलेलें नाही; सर्व पात्रें स्वार्थ, काम, ममुत्कर्ष, अधिकार वगैरेमध्ये मग्न झालेलीं आहेत.

त्यांच्या व्यक्तित्वाचे सर्व विशेष असे त्यांच्या कादंबऱ्यांत सर्वत्र भरून राहिलेले दिसतात. कादंबऱ्यांत त्यांचें व्यक्तित्व जितक्या बहुविधपणें व प्रकर्षानें तळपतें तितकें तें त्यांच्या कोणत्याहि अन्य वाङ्मयांत तळपत नाही. त्यांचें व्यक्तित्व विशाल, खोल, जटिल, बहुविध नि मनोरंजक आहे. त्यामुळे कादंबऱ्या वाचतांना त्यांच्या व्यक्तित्वावरच जर एखादा वाचक आपलें लक्ष केंद्रित करील तर त्याला कांही वेगळयाच आनंदाचा लाभ होईल.

## ४२. कादंबरीलेखनाची मीमांसा:—

केतकरांची प्रतिभा क्षीण होती, हें वर सांगितलें आहे. प्रतिभा क्षीण असतांना त्यांनी कादंबरीसारखा ललित वाङ्मयप्रकार हाताळला, यामध्ये त्यांनी स्वतःची बरीच सोय पाहिलेली दिसते. आपल्या निरीक्षणांत आलेल्या " विविध प्रकृति " त्यांना लोकांपुढे ठेवावयाच्या होत्या; म्हणजे अनेक व्यक्ति व त्यांचे जीवनक्रम त्यांना चितारावयाचे होते. हें काम होण्याला कथा व पात्रें या अंगांमुळे कादंबरी हा वाङ्मयप्रकार त्यांना सर्वांत सोयिस्कर वाटला असावा. त्यांनी जें निरीक्षण केलें होतें, समाजविश्लेषण केलें होतें, ज्ञान मिळविलें होतें किंवा विचारनिष्पत्ति केली होती तींत सलग व परिपूर्ण भागाबरोबर स्फुट व विस्कळित भाग बराच होता. या स्फुट व विस्कळित भागाची नोंद व्हावी, असें तर त्यांना वाटत होतें. ही नोंद पात्रें व प्रसंग यांच्या वैपुल्यामुळे त्यांना कादंबरींत सहजासहजी करतां आली. दुसऱ्या

कोणत्याहि वाङ्मयप्रकारांत ही सोय इतक्या सहजासहजी त्यांना लावतां आली नसती. स्फुट व विस्कळित विचारांबरोबर अपूर्ण, अपक्व व कदाचित् चूक ठरतील असे विचार किंवा खात्रीने चुकीचे पण लक्षणीय नी विचार-शक्तीला चालना देणारे विचार त्यांच्या डोक्यांत अमाप होते. ते विचार नीट पारखून पूर्ण व पक्व करण्याला त्यांना सवड नव्हती आणि ते आपल्याच डोक्या-बरोबर विरून जावे, असेंहि त्यांना वाटत नव्हतें. ते विचार अपक्व, अपूर्ण किंवा चुकीचे असले तरी इतरांना उपयुक्त होतील, अशी त्यांची समजूत होती. तेव्हा त्यांची नोंद करण्यासाठी त्यांनी कादंबरीचा आश्रय घेतलेला दिसतो. नाना पात्रें उत्पन्न करून त्यांच्या तोंडीं त्यांनी हे विचार घातले व ते चिरंजीव करून टाकले. ' ब्राह्मणकन्यें 'त रामरावाने सहकारी तत्त्वावर मजुरांच्या ताब्यांत गिरण्या द्यावयाची मांडलेली योजना किंवा ' विचक्षणें ' त बाळोबाने गिरणजगावर दिलेलें व्याख्यान पाहिलें, की त्यावरून अपक्व व अपूर्ण विचार ते कादंबरींत कसे गोवीत, तें चांगलें समजतें. रामरावाचे विचार अव्यवहार्य होते, असे ते स्वतःच ' विचक्षणे ' मध्ये बाळोबाच्या तोंडून सांगतात[1] आणि बाळोबाचे विचारांत पूर्णता नाही, हें त्यांच्या स्वरूपावरूनच सिद्ध होतें. पण हे विचार त्यांनी कादंबरींत अनेक दृष्टींनी लक्षणीय म्हणून गोविले आहेत. चुकीचे विचारहि कादंबरींत आणण्याचा त्यांचा प्रयत्न ' भटक्या ' मध्ये स्पष्ट होतो. 'भटक्यां' तील डॉ. घैसास आपणांला हुकुमशाहीची तरफदारी ऐकवतात; पण केतकरांना हुकुमशाही मुळीच नको होती, ते लोकशाहीचे कट्टे पुरस्कर्ते होते, हें सर्वविश्रुत आहे.[2] म्हणजे डॉ. घैसासांचे किंवा स्वतःचे हुकुमशाहीच्या बाजूचे विचार जरी त्यांना चुकीचे वाटत होते तरी ते अनेक दृष्टींनी लक्षणीय म्हणून त्यांनी कादंबरींत घातले, हें उघड आहे.

कादंबरीमुळे त्यांची आणखी एक सोय अशी झाली, की आपल्या प्रतिपक्षी-यांवर त्यांना टीकेचा वाटेल तसा मारा करतां आला. सुधारक, प्रार्थनो ब्रह्मो, अप्रगत विचारांचे राष्ट्रीय पुढारी, बंगाली लोक, श्री. न. चिं. केळकर,

---

१. पृ. २५५. २. उदा० ' मी हिंदुस्थानचा सर्वाधिकारी झालों तर ' 'चित्रा, १९३६, दिवाळी-अंक पाहा.

न्यायमूर्ति रानडे, श्री. भांडारकर वगैरेंना त्यांनी आपल्या पात्रांकरवी सरसहा झोडपून काढलें आणि ' हें माझें नव्हे ' म्हणून नामानिराळें होण्यास त्यांना निमित्त सापडलें. ज्ञानकोशाच्या कार्यांत नागपूरला ज्यांच्याशीं त्यांचा संघर्ष आला त्या लोकांचीं व्यंगचित्रेंहि निराळ्या नांवाखाली ते रंगवूं शकले आणि वैयक्तिक हेवा किंवा राग उगवून घेऊं शकले. गंभीर व शास्त्रीय लेखनांत त्यांनी प्रतिपक्षीयांवर हल्ले केले आहेत; पण त्या हल्ल्यांत त्या लेखनप्रकारामुळे कांही तरी संयम बहुतेक वेळां राहिला आहे. कादंबरी या लेखनप्रकारांत हा संयम ते पात्रचित्रणाच्या नांवाखाली सहज झुगारून देऊं शकले व त्यांचे हल्ले विशृंखल नी उद्दाम झाले.

त्यांना जें समाजचित्रण करावयाचें होतें, तेंहि कादंबरीमुळे त्यांना सुलभतेने करतां आलें. शास्त्रीय समाजचित्रणासाठी त्यांना आपल्या विकीर्ण निरीक्षणावरच केवळ विसंबतां आलें नसतें; पण विकीर्ण निरीक्षणाच्या जोरावर कादंबरींत मात्र ते निभावून नेऊं शकले. शिवाय, व्यक्ति व त्यांचे जीवनक्रम यांच्या आधाराने समाजाचें चित्रण करण्याची जी एक नवी संधि त्यांना कादंबरींत मिळाली तीमुळे समाजचित्रण जीवंत, मूर्त नी साकार झालें आणि त्याने समाजाची खरी नाडी समजण्याची सोय झाली. कादंबरींत समाजचित्रणाप्रमाणे विचार, ज्ञान वगैरे सर्व तऱ्हेचा ' बोध ' जीवंत, मूर्त नी साकार करण्याची मोठीच संधि पात्रें व कथा यांमुळे उत्पन्न होते आणि त्यांमुळे बोध अधिक आकर्षक व अधिक परिणामकारक होतो. लोक कादंबरीवाङ्मय मोठ्या प्रमाणावर वाचीत असल्यामुळे कादंबऱ्यांतील बोध बहुसंख्य लोकांत पसरतोहि. बोध अधिक आकर्षक व परिणामकारक करण्याची आणि बहुजनांत फैलावण्याची ही जी संधि तिने कादंबरीलेखनांत केतकरांना गुंतवून ठेवण्यांत बराच मोठा वाटा उचलला असावा.

याखेरीज असेंहि दिसतें, की आपला पिंड ललित लेखकाचा नाही, याची जाणीव त्यांना पुरेशी नसावी. सत्यांत सौंदर्य असलें तरी सत्य म्हणजेच सौंदर्य नव्हे, हें त्यांच्या मनांत ठसलें नसावें. त्यामुळे आपणांला जीं अनेक सत्यें दिसलीं तीं कादंबरींत मांडलीं, की कादंबरी सुंदर होईल, असें त्यांना वाटे आणि ते बोधबहुल कादंबऱ्या लिहीत. आपणांला सत्याचा बराच तळ सापडल्यामुळे व आपण तो कादंबरींत वाचकांना दाखवीत असल्यामुळे आपण

थोर कादंबरीकार आहोंत, नव्हे थोर 'ललित' कादंबरीकार आहोंत, अशी अर्थातच त्यांची समजूत असणार. अशी समजून असणें त्यांच्या असीम आत्मविश्वासाशीं अगदी सुसंगत आहे. "तुम्हां सर्वांपेक्षा मी चांगला कादंबरीकार आहे"---असे अभिमानाचे किंवा दर्पाचे उद्गार त्यांनी माडखोलकरांपाशी काढले होते.[1] ते उद्गार अशा समजुतीचे द्योतक आहेत. तेव्हा, आपला पिंड ललित लेखकाचा आहे, अशी त्यांची समजूतहि त्यांच्या कादंबरीलेखनाच्या बुडाशीं असावी. सुलभ लोकप्रियतेची इच्छा, लेखन हाच धंदा झाल्यामुळे मजकूर देण्याची निकड वगैरे किरकोळ कारणेंदेखील त्यांच्या कादंबरीलेखनाच्या बुडाशीं दाखवितां येतील. प्रा. वा. म. जोशांनी त्यांच्या कादंबरीलेखनाची जी कारणमीमांसा केली आहे ती उक्त चर्चेला पोषक अशीच आहे.[2]

## ४३. चरित्राचा कादंबरीशीं संबंध[3] :—

केतकरांच्या चरित्राचा त्यांच्या कादंबऱ्यांतील आशयाशीं अत्यंत घनिष्ठ संबंध आहे. त्यांनी जगांत जें अवलोकन केलें किंवा अनुभव घेतले तेच त्यांनी कादंबऱ्यांत उतरले आहेत. सर्वच कादंबरीकारांच्या लेखनांत स्वतःच्या अवलोकनाचा व अनुभवाचा कांही तरी अंश असतोच; पण केतकरांचा विशेष हा, की अवलोकन व अनुभव यांमध्ये कल्पिताची भर घालून त्यांनी अगदी अभिनव सृष्टि निर्माण केलेली नाही आणि प्रत्यक्ष अवलोकनाच्या व अनुभवाच्या खुणा पुरेशा पुसलेल्या नाहीत. त्यांनी कोणतें पात्र कोणावरून रंगविलें, कोणती कथा कोठून घेतली, तें थोड्या प्रयत्नाने पुढीलप्रमाणे हुडकून काढतां येतें.

'प्रियंवदें'त बंडूनानाचे तहशीलदारीमधील जे अनुभव घातलेले आहेत ते त्यांनी रा. गोविंद चिंतामण तांब्यांच्या वडिलांचे जीवनावरून घातले आहेत. तांब्यांचे वडील बंडूनानाप्रमाणेच नायब तहशिलदार होते व त्यांनी डेप्युटी

---

१. ग. त्र्यं. माडखोलकर, प्रतिभा, जुलै १९३७. २. लो. शि., मे–जून १९३७. ३. या कांडांत चरित्रविषयक जे उल्लेख आहेत त्यांची साधार माहिती माझ्या डॉ. केतकरांवरील प्रबंधांत दिलेली आहे. येथे विस्तारभयास्तव आधार दिलेले नाहीत.

कमिशनर सी. ए. क्लार्क यांच्यावर काठीहि उगारली होती. त्यांची व केतकरांची चांगली ओळख होती. तेव्हा त्यांच्याकडून ऐकलेले अनुभव केतकरांनी बंडूनानाच्या नांवावर जसेच्या तसे कादंबरींत घालून टाकले... श्री. गो. चिं. तांबे, 'गो. जो.' नामक गृहस्थांची पुढीलप्रमाणे माहिती देतात. 'हे गृहस्थ सेक्रेटरीएटमध्ये क्रंप या फायनान्शियल कमिशनरच्या हाताखाली नोकर होते. रेव्हिन्यू खात्यांत पैसे खाण्याबद्दल त्यांची ख्याति होती. जबलपूर जिल्ह्यांत, भोसल्यांचें राज्य बुडविल्याबद्दल 'प.' घराण्याला जहागीर मिळालेली आहे. त्या प. जहागीरदारांना यांनी आपली मुलगी दिली. ३–४ वर्षांचा मुलगा मागे ठेवून श्री. प. वारले तेव्हा गो.जो. आपल्या मुलीच्या इस्टेटीचे मॅनेजर झाले. ( मध्यप्रांताच्या विल्सन नामक चीफ सेक्रेटरीच्या बायकोकडे कांही कामासाठी ) मी एकदा गेलों असतां तेथे मिसेस पंडतजीला ( हें त्या मुलीचे आमच्या तोंडचें नांव ) तिच्या बापाबरोबर प्रत्यक्ष बघितलें. गो.जो.ना आपल्या मुलीचें वजन ऑफिशियल सर्कल्समध्ये वाढविण्याची इच्छा होती व म्हणून ते मुलीला घेऊन युरोपियन ऑफिसर्सशीं परिचय वाढवीत. मिसेस प.ना अनसूयाबाई काळयांनी 'गव्हर्नमेंट हाउसची सवाष्ण' असें नांव ठेविलें होतें. माझी पूर्ण खात्री आहे, की अनंतराव घरकुट्यांचें पात्र गो.जो.-वरून केतकरांनी रंगविलें आहे."[1] रा. तांब्यांनी सांगितलेली गो. जो.ची ही माहिती ऐकली व ती 'प्रियंवदे'मधील अनंतराव घरकुट्यांच्या माहितीशीं पडताळली, की गो.जो.वरून अनंतराव घरकुट्यांचें पात्र केतकरांनी रंगविलें, याबद्दल सर्वांचीच खात्री पटेल...' प्रियंवदें 'तील शारदाबाईबद्दल कु दुर्गा भागवत म्हणतात,[2] की " माझ्या माहितीप्रमाणे शारदाबाईचें चित्र हें खरोखरीच एका अत्यंत हुशार व पंडित म्हणून नागपूरच्या भागांत गाजलेल्या पदवीधर विधवा विदुषी कै. तापीबाई हर्डीकर यांच्या पूर्वचरित्रावरून बरेंचसें रंगविलें आहे."

'प्रियंवदें'तील व 'ब्राह्मणकन्यें'तील वैजनाथशास्त्री म्हणजे इतिहासाचार्य राजवाडे ही गोष्ट सर्वमान्यच आहे. वैजनाथशास्त्री व राजवाडे यांचा पोषाख, लकबी, भाषापद्धति, निवासस्थानें, जीवनक्रम, काळ, विचार वगैरे सर्व गोष्टी तंतोतंत सारख्या आहेत आणि त्यांत फारच थोडे फरक केतकरांनी केले आहेत.

---

१. आठवणी. २. सत्यकथा, ऑगस्ट १९४९.

राजवाड्यांचे चरित्रकार रा. भास्कर वामन भट यांनी केलेला पुढील उल्लेख वैजनाथशास्त्री व राजवाडे यांमधील आत्यंतिक सादृश्यावर चांगलाच प्रकाश टाकतो. रा. भट म्हणतात, 'प्रियंवदा' या कादंबरींत "वैजनाथशास्त्री या नांवाचें एक पात्र राजवाड्यांचें स्वभाववर्णन करण्यास्तव केतकरांनी रेखाटलें आहे...सर यदुनाथ सरकार यांनी या कादंबरींत वर्णिलेला पुनर्विवाहाचा कथाभाग सत्य मानून राजवाड्यांच्या निधनानंतर मॉडर्न रिव्ह्यू मासिकांत, राजवाड्यांच्या मृत्युलेखांत, त्यांचा पुनर्विवाह करण्याचा विचार होता, असें विधान केलें आहे. साध्या भोळया यदुनाथांची केतकरांच्या कादंबरींतील वर्णनाने चांगलीच फसगत झाली !"[1] केतकरांचा व राजवाड्यांचा अत्यंत निकटचा संबंध असल्यामुळे राजवाड्यांचें हुबेहुब चित्र केतकर चितारूं शकले, हें उघड आहे.

'परागंदे'मधील लाला गजपतराय हें लाला लजपतरायांचें विडंबनात्मक चित्र आहे, असें आजवर अनेकांनी म्हटलें आहे[2] व तें गजपतराय व लजपतराय यांच्या नांवांवरून व जीवनांच्या तुलनेवरून पटतेंहि...'परागंदे'तील इतर पात्रें सत्य व्यक्तींचींच चित्रणें आहेत, याबद्दल अमेरिकेंतून केतकरांना आलेल्या पुढील पत्राची साक्ष उल्लेखनीय आहे. या पत्रांत रा. वि. ना. लिखिते केतकरांना म्हणतात, की "आपलीं सर्व पात्रें अगदी निकट परिचयाचीं वाटतात. आपण ठेविलेल्या नांवांनी तर हे सर्व लोक तेव्हाच ओळखतां येतात."[3]...रा. य. रा. दात्यांची कल्पना अशी आहे, की मिस वाजकर नांवाची ज्यू किंवा पाठारे जातीची तरुणी केतकरांना अमेरिकेंत भेटली होती व तिच्यावरून केतकरांनी मत्तमयूरी निर्माण केली असावी आणि प्रा. गोगटे हे अमेरिकेंतील आर. व्ही. गोगटे असावे किंवा प्रो. गोखल्यांचें तें बदललेलें नांव असावें.[4]...डॉ. सरंजाम्यांचे विचार व त्यांचा जीवनक्रम पाहिला म्हणजे केतकरांच्या विचारांशीं व जीवनक्रमाशीं त्यांचें इतकें साम्य दिसतें, की सरंजाम्यांचें पात्र स्वतःवरूनच केतकरांनी उत्पन्न केलें असावें, असा कयास होतो.

---

१. 'राजवाडे चरित्र, पृ. ४९७. २. उदा० माडखोलकर ग. त्र्यं., प्रतिभा, जुलै १९३७; कु. दुर्गा भागवत, सत्यकथा, सप्टें. १९४९. ३. पत्र २८-३-२७ चें इथका येथून पाठविलेलें. हें पत्र रा. चिं. ग. कर्वे यांच्या संग्रहीं आहे. ४. आठवणी.

'आशावादीं'तील ब्रह्मगिरी म्हणजेहि स्वतः डॉ. केतकर होत, याबद्दल शंका नाही. ब्रह्मगिरीच्या चित्रणांत मूळ सत्याची कांही तोडजोड आहे व कल्पिताची भरहि आहे. पण ब्रह्मगिरींचे विचार, परदेशांतील भटकेपणा, आशावादीपणा आणि हिंदुस्थानांतील आगमनानंतर त्यांचें झालेलें प्रवाह-पतितासारखें वागणें यांवरून ब्रह्मगिरींचें चित्रण केतकरांनी स्वतःवरून बहुंशीं केलेलें आहे, हें स्वच्छ दिसतें. ब्रह्मगिरी मुळचे उमरावतीचे, आईच्या मृत्यूने ते भटके होतात, परदेशांत ते हलकीं कामेंहि करतात, त्यांना कपिलेने आणलेले लाडू प्रिय असतात वगैरे बारीकसारीक गोष्टींतहि ब्रह्मगिरी व केतकर यांच्यांत विलक्षण साम्य आहे....'आशावादीं' तील गेंगणे, अलंकार व भोंगळवार हें त्रिकूट म्हणजे ज्ञानकोशामुळे केतकरांचा ज्यांच्याशीं संबंध आला ते नागपूरचे रा. नीलकंठराव डेंगणे (तथा उधोजी), रा नारायण रंगनाथ अळेकर व रा. नीळकंठ बळवंत भवाळकर हे होत, याबद्दल माहितगार मंडळींना खात्री आहे. या तिघांचींच व्यंगचित्रें केतकरांनी रंगविलीं आहेत, असें रा. य.रा. दाते, रा. गो. चिं. तांबे, रा. मा. कृ. पाध्ये, रा. दि. य. फाटक वगैरे माहितगार मंडळी सांगतात.[१] शिवाय नागपूरांत प्रत्यक्ष चौकशी केली तर गेंगणे–अलंकार–भोंगळवार या त्रिकुटांत डेंगणे–अळेकर–भवाळकर यांचीं वैशिष्ट्यें केतकरांनी घातलीं आहेत व त्यांचें विडंबन केलें आहे, याविषयी विश्वास पटतो. 'प्रजापक्ष'ने 'आशावादी' वर अभिप्राय लिहितांना म्हटलें होतें, की त्या कादंबरींत केतकरांनी "एके काळच्या आपल्या दोस्तांवर हात चालविला" आहे व "आपला वैयक्तिक सूड" उगविला आहे.[२] 'प्रजा-पक्षा' चें हें म्हणणें डेंगणे–त्रिकुटाबद्दलच होतें, हें यावरून दिसून येईल.... डॉ. नंदिकेचें पात्र कोणावरून रंगविलें आहे, त्याचा मागोवा डॉ. द्वा. क. यांची रा. गो. चिं. तांब्यांनी पुरविलेली पुढील माहिती वाचली म्हणजे बरोबर घेतां येतो. रा. तांबे म्हणतात,[३] की "डॉ. नंदिका हें पात्र डॉ. द्वा. क. यांच्यावरून...सुचलें असणें शक्य आहे. द्वा. क. यांची आई र. के. या अकरमाशांपैकी होत....द्वा.बाईचें लग्न १४–१५ व्या वर्षी

१. आठवणी. २. 'आशावादी कादंबरीवर लोकमत' वि. से., एप्रि. १९२८. ३. आठवणी.

श्रीयुत क. यांच्याबरोबर झालें. It was a run away marriage. श्री. क. मद्रासला असत. त्यांनी द्वा. बाईंचें कष्टानें शिक्षण केलें. त्यांना इंग्लंडची स्कॉलरशिप मिळून त्या इंग्लंडला जाऊन आल्या. ‘ वुइमेन्स इन्डियन मेडिकल सर्व्हिस ’ मध्ये त्या डफरीन फंडांत नेमल्या गेल्या. त्या नोकरीसाठी हिंडत. १९१७–१८ मध्ये त्या येथें आल्या तेव्हा आम्ही पाहिल्या. श्रीयुत क. ना घरांत बरी ट्रीट्मेंट मिळत नसे, असें ऐकिवांत आहे. ” रा. तांब्यांच्या या माहितीवरून डॉ. नंदिका व लालनाथ यांचें चित्रण केतकरांनी डॉ. द्वा. क. व श्रीयुत क० यांच्या आधारें केलें, याविषयी शंका राहात नाही. सुप्रसिद्ध डॉ. आनंदीबाई जोशी व रा. गोपाळराव जोशी यांच्या जीवनाचा कांही आधारहि त्यांनी घेतला असावा.

“ ब्राह्मण कन्या या कादंबरीस पुण्यांतीलच एक प्रसंग सूचक झाला आहे. ”—असें रा. य. रा. दाते लिहितात.[१] हा प्रसंग कोणता, याची चौकशी केली तर अशी माहिती मिळते, की पुण्यांत एक ब्राह्मण बॅरिस्टर होते व त्यांनी एक सोनारीण रखेली बाळगली होती. या सोनारणीपासून बॅरिस्टरांना एक मुलगी झाली व तिच्या लग्नाची त्यांना पंचाईत पडली. पुढे आपणांकडे येणाऱ्या एका नवख्या वकिलाला प्रॅक्टिस देण्याचें अभिवचन देऊन व इतर आमिष दाखवून त्यांनी ती मुलगी त्या वकिलाच्या गळयांत बांधली. हे वकील व त्यांची बायको अद्यापि हयात आहेत. या वकिलांच्या लग्नाचा विषय केतकर अमेरिकेस गेले त्यापूर्वी लोकचर्चेचा व कुतूहलाचा विषय होता.[२] ‘ ब्राह्मणकन्ये’तील कालिंदीच्या कथेची सूचना या प्रसंगावरून केतकरांना मिळाली असावी, हें या प्रसंगांतील व कालिंदीच्या कथेंतील साम्यावरून स्पष्ट होतें....‘ ब्राह्मणकन्ये’त गिरणजगाचें, कामगार पुढाऱ्यांचें वगैरे जें वर्णन येतें त्याची उपपत्ति श्री. लालजी पेंडसे पुढीलप्रमाणे देतात. “ ब्राह्मणकन्येंतील बराच भाग माझ्या व एस. ए. डांग्यांच्या घरांत तयार झाला. आमच्यामध्ये ज्या गप्पा होत त्या त्या कादंबरींत उमटल्या आहेत. त्यांतील कम्युनिस्ट म्हणजे बरेचसे डांगे व थोडासा मी होय. ” ‘ ब्राह्मणकन्ये’तील रामरावाची

१. सान्निध्य, पृ. १०. २. आठवणी रा. य. रा. दाते व रा. दि. य. फाटक यांच्या.

योजना म्हणजे केतकरांचीच योजना आहे. कारण " १९३५ सालीं कामगारांचें शेअर कॅपिटल उभारून गिरणी काढण्याची कल्पना केतकरांच्या डोक्यांत जोराने वावरत होती. त्या सालीं पुष्कळ गिरण्या विक्रावयास निघाल्या होत्या. तेव्हा ते गिरणीमालकांकडे जाऊन मॅनेजिंग एजन्सी विकत घेण्याची ऑफर देत. "[१]...'ब्राह्मणकन्ये'तील बेनेइस्रायलांची माहिती शीलवतीबाईंच्यामुळे केतकरांनी मिळवली व दिली, अशी माडखोलकरांची समजूत आहे;[२] पण ती साफ चुकीची आहे. शीलवतीबाई म्हणतात, की " बेनेइस्रायल समाजाच्या प्रश्नांत ते माझ्यामुळे शिरले, असें म्हणणें अज्ञानाचें आहे. ए.आय.आर. मध्ये नागपूरला सध्या असणारे श्री. नगरकर नागपूरला परवा मला म्हणाले, की ' डॉ. केतकरांची आणि आपल्या आईवडिलांची चांगली ओळख होती. त्यांच्यापासून मिळालेली माहिती केतकरांनी आपल्या कादंबऱ्यांत समाविष्ट केली. ' बेनेइस्रायल हा समाज हिंदु समाजाशीं सदृश होऊन त्यांत मिसळूं पाहाणारा असल्यामुळे केतकरांना त्याच्याबद्दल ममत्व वाटे. " शीलवतीबाईंनी पुरविलेल्या या माहितीवरून केतकरांनी बेनेइस्रायलांची माहिती कोठून मिळविली त्याचा नेमका सुगावा लागतो.

' गावसासू 'तील पात्रांचें चित्रण कोणत्या प्रत्यक्ष व्यक्तींवरून केलें आहे तें बॅ. बी जी. काणे यांनी लंडनमधील हिंदी लोकांची जी माहिती दिली आहे तीवरून नक्की करूं शकतें. केतकर जेव्हा इंग्लंडमध्ये होते तेव्हाचीच ही माहिती आहे, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. बॅ. काणे म्हणतात, " नवीन आलेल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या भेटी घेण्याची त्यांची [ म्ह. केतकरांची ] प्रथा असे. कांही पंजाबी व बंगाली विद्यार्थ्यांशीं त्यांचे संबंध आले होते. लैंगिक सैलपणाबद्दल तेव्हा पंजाब्यांची ख्याति असे. They played havock रॉय, सकलातवाला, डलग्याडो, सॉलिसिटर मालवणकर, सेन वगैरे पांचसात इंडियन कुटुंबें तेव्हा लंडनमध्ये होतीं. मिस लीला रॉय व तिची आई लंडनमध्ये असत. लीला रॉयचें मुकर्जीशीं पुढे लग्न झालें आणि मुकर्जी आय. सी. एस.मध्ये नापास झाला. पण बडोद्याच्या महाराज-साहेबांनी त्याला स्टेटमध्ये नोकरी दिली...ड्रामा करणें, टॅब्लो करणें वगैरेबद्दल रॉय फॅमिली लंडनमध्ये

---

१. आठवणी. २. प्रतिभा, जुलै १९३७.

प्रसिद्ध होती. डॉ. कर्नल भोलानाथ हे एक आय. एम. एस. ऑफिसर तेव्हा लंडनमध्ये होते. त्यांची पत्नी मिसेस भोलानाथ ही जरा बरीच लठ्ठ बाई होती व ती सभांतून भाग घेणारी म्हणून आम्हांला ठाऊक असे."[1] या माहितीवरून मिसेस रॉय म्हणजे मिसेस कुसुमकलिका दास, लीला रॉय म्हणजे ललिता, मुकर्जी म्हणजे मोहिनी मोहन चॅटर्जी, मिसेस भोलानाथ म्हणजे मिसेस कैलासनाथ वगैरे तर्क बांधतां येण्यासारखे आहेत. शिवाय रा. गो. चिं. तांबे सांगतात, की "आय.सी.एस. विद्यार्थ्यांमधून जावई हुडकणारी मिसेस दास ही लंडनमधील बंगाली बाई केतकरांनी इंग्लंडमध्ये प्रत्यक्ष बघितलेली होती. तिचें खरें नांव त्यांनी मला सांगितलें होतें. पण आता मी विसरलों."[2] त्यावरून मिसेस दासचें चित्रण तरी नक्की खऱ्याखुऱ्या स्त्रीवरून केतकरांनी केलें होतें, यांत शंका नाही.

'विचक्षणे'तील डॉ. तर्कटयांबद्दल रा. दि. य. फाटक म्हणतात, की "डॉ तर्कटे हें पात्र आपण कोणत्या डॉक्टरवरून रंगविलें त्याचें नांव मला केतकरांनी सांगितलें होतें. तें आता विसरलों पण आठवूं शकेन. हा डॉक्टर आपलें पात्र घेऊन हिंडे आणि याचा आपले पेशंट वाढण्याकडेच उपयोग होतो, असें म्हणे."[3] ...'विचक्षणे'तील प्रा. लोंढे म्हणजे स्वतः डॉ. केतकर दिसतात. प्रा. लोंढ्यांचा कलकत्त्याचा व नंतर पुण्याचा निवास, त्यांचे विचार व विचारजीवी मनुष्याची त्यांची भूमिका, त्यांची गृहव्यवस्था वगैरेंचें केतकरांशीं खूप साम्य आहे...वल्लभपंथ व कर्सनदास मूळजीची हकीगत यांना १८९०च्या सुमारास एकदम प्रसिद्धि मिळाली होती. तीवरून व केडगाव वगैरे ठिकाणच्या स्वानुभवावरून केतकरांनी 'विचक्षणे'तील श्रीरंगाचार्यांच्या आश्रमाचें चित्रण केलेलें दिसतें.

'भटक्यां'तील स्वामी भूतानंदांचें वर्णन त्यांनी उमरावतीला पाहिलेल्या योग्यांवरून केलेलें असावें...मुंबईतील वेश्यांची पाहाणी त्यांनी प्रत्यक्ष केली होती व 'विद्यासेवकां'त त्यावर एक टिपणवजा लेखहि लिहिला होता. तेव्हा आपल्या कादंबऱ्यांतील वेश्याविषयक कांही भाग त्यांनी या पाहाणीच्या आधाराने लिहिला, याबद्दल प्रश्नच नाही....सर्वच कादंबऱ्यांतील स्थलकालांचे

---

१. आठवणी. २. आठवणी. ३. आठवणी.

उल्लेख मागे निर्दिष्ट केलेले आहेत. त्यांवरून हें स्पष्ट दिसतें, की ज्या काळीं जें स्थल केतकरांनी पाहिलें त्याच काळाला अनुसरून त्यांनी त्या स्थळाच्या समाजाचें वर्णन बहुधा केलेलें आहे. त्यांत फारसा फरक केलेला नाही. ... त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रत्यक्ष अवलोकन व अनुभव यांमुळे आलेला असा सर्व भाग वेचून काढावयाचा, असें ठरविलें तर फारच विस्तार होईल. असा विस्तार आवश्यक नाही; तेव्हा येथेच थांबण्यास हरकत नाही, असें वाटतें.

विशेष विस्तार न केला तरी आतापर्यंतच्या विवरणावरून हें नक्की कळूं शकेल, की केतकरांच्या कादंबऱ्यांचा केतकरांच्या अनुभवाशीं, अवलोकनाशीं किंवा चरित्राशीं फार दृढ संबंध आहे. इतका की त्यांच्या कादंबऱ्यांना त्यांच्या रोजनिशीचें व आत्मचरित्राचें स्वरूप थोडें फार आलें आहे. हा संबंध ज्या अर्थी फार दृढ आहे व जागोजाग उघड दिसणारा आहे त्या अर्थी प्रतिभेचा किंवा कलात्मक सृजनशक्तीचा संबंध त्यांच्या कादंबऱ्यांशीं फार थोडा आहे, हेंहि अनुषंगाने लक्षांत येऊं शकेल.

## ४४. उपसंहारः—

केतकरांच्या कादंबऱ्यांकडे विहंगम दृष्टि टाकली तर त्या कादंबऱ्यांचा प्रकार सौंदर्यवादी कादंबऱ्यांहून अगदी वेगळा आहे, ही गोष्ट सहज लक्षांत येते. केतकरांना समाजवर्णन, समाजविश्लेषण, विचारकथन व स्फुट ज्ञानदान या गोष्टी साधावयाच्या होत्या आणि व्यक्तिचित्रण व मनोविश्लेषणहि करावयाचें होतें. थोडक्यांत म्हणजे, कांही समाजशास्त्रीय व मानसशास्त्रीय ‘ बोध ’ वाचकांना ऐकवावा, हा त्यांचा उद्देश होता. त्यासाठी त्यांनी कादंबरी या वाङ्मयप्रकाराचें माध्यम वापरलें आणि त्यांतून त्यांच्या वैशिष्ट्य-पूर्ण कादंबऱ्यांचा जन्म झाला. या कादंबऱ्यांत अर्थातच कथा व पात्रें हीं कादंबरीचीं अंगें आहेत आणि ‘ बोध ’ किंवा माहिती, विवेचन व विचारकथन हीं प्रबंधाचींहि अंगें आहेत. मात्र या अंगांची नुसती बेरीज किंवा युगपद् उपस्थिति त्यांत नाही; तर तीं उभयविध अंगें एकमेकांत मिसळलीं आहेत व एकमेकांवर परिणामकारक झालीं आहेत. त्यांचें पूर्णतः एकजीव असें रसायन त्यांच्यामध्ये तयार झालेलें नाही; पण एक अर्धेबोबडें अर्धरसायन नक्कीच झालेलें आहे. कादंबरी व प्रबंध या भिन्नजातीय वाङ्मयप्रकारांचें या कादंबऱ्यांत असलें,

मिश्रण झाल्यामुळे त्यांना ‘ कादंबऱ्या ’ न म्हणतां ‘ कादंबरीप्रबंध ’ म्हणणें अधिक शोभून दिसेल.[1] या पुस्तकांत केवळ व्यवहाराच्या सोयीसाठी त्यांना ‘ कादंबऱ्या ’ म्हणून संबोधलें आहे; पण त्यांचें खरें स्वरूप ‘ कादंबरीप्रबंधां ’चेंच आहे.

या ‘ कादंबरीप्रबंध ’स्वरूपी विशिष्ट वाङ्मयप्रकारांतहि केतकरांच्या व्यक्तित्वाने व चरित्राने आणखी खास वैशिष्ट्यें उत्पन्न केलीं आहेत. केतकरांचें व्यक्तित्व विविध, संपन्न, जटिल व प्रभावी होतें. त्यांचें चरित्रहि अनुभवकक्षा, जीवनक्रम व कर्तृत्व यांच्या असाधारणपणामुळे सामान्य जनांच्या चरित्राहून भिन्न होतें. या दोहोंचा परिणाम आपल्या कादंबऱ्यांवर त्यांनी मुक्तपणें होऊं दिला आणि त्यांच्या कादंबऱ्यांचें अंतर्बाह्य स्वरूप त्यामुळे कणाकणांत पालटून गेलें. त्यांच्या कादंबऱ्या नुसत्या ‘कादंबरीप्रबंध’च न होतां त्या ‘ केतकरी ’ कादंबरीप्रबंध बनल्या. त्यांच्या कादंबऱ्या इतक्या वेगळ्या प्रकारच्या व इतक्या वैशिष्ट्यपूर्ण असल्यामुळे त्या कादंबऱ्यांचें परीक्षण किंवा वाचन रूढ भूमिका सोडून स्वतंत्र भूमिकेवरून करावें लागतें.

जेव्हा नवा वाङ्मयप्रकार पुढे येतो तेव्हा टीकाकारांना जुन्या वाङ्मयप्रकाराने उत्पन्न झालेले बरेवाईट पूर्वग्रह बाजूस सारावे लागतात, आधीच्या अपेक्षा गुंडाळून ठेवाव्या लागतात आणि मोकळ्या मनाने त्या वाङ्मयप्रकाराचें स्वागत करावें लागतें. त्या वाङ्मयप्रकाराचे अंगभूत विशेष पाहून व त्याचा पिंड ठरवून त्यानुसार टीकाकारांना एक आदर्श गुणसमुच्चय कल्पावा लागतो आणि त्याच्या तुलनेने त्या वाङ्मयप्रकारांतील लेखनाचें मूल्यमापन करावें लागतें. केतकरांनी कादंबरी–प्रबंध हा वाङ्मयप्रकार मराठींत कांहीं नव्याने आणलेला नाहीं; पण मराठींत त्या प्रकारामधलें लेखन अल्प आहे

---

१. केतकर एका ठिकाणीं म्हणतात, “ १९०२ सालीं इंटरमीजिएटच्या वर्गामध्ये होतों, तेव्हा ‘ लॉबन्स एसेज ’ नांवाचा एक निबंधसंग्रह अभ्यासाला नेमला होता. त्यांत इंग्रजी निबंधावरून कादंबरी कशी अवतरली हें वाचलें होतें. आणि त्यामुळें निबंध आणि कादंबरी या दोहोंचें मिश्रण माझ्या हातून कांहीं अलक्षितपणें तयार झालें असावें, असें माझ्याविषयी विचार केला असता वाटतें.” पाहा, माझें कादंबरी-लेखन, संपादक प्रा. या. मु. पाठक, पृ. ५३-५४

आणि त्या प्रकाराचा साहित्यशास्त्रीय विचार तर अत्यल्प आहे. तेव्हा, नव्या वाङ्मयप्रकाराचा परामर्श घेतांना घ्यावयाच्या सर्व दक्षता त्यांच्या कादंबऱ्यांवर लिहितांना घ्याव्या लागतात. शिवाय आपल्या अस्मितेने केतकरांनी स्वतःच्या कादंबऱ्या फारच प्रथगात्म केल्यामुळे टीकाकारांची जबाबदारी जास्तच वाढते. प्रस्तुत पुस्तकांत, याची शक्य तेवढी जाणीव ठेवून केतकरांच्या कादंबऱ्यांचें स्वरूप निश्चित केलें आहे, त्या स्वरूपानुसार एक आदर्श गुण-समुच्चय कल्पिला आहे व मग मूल्यमापन केलें आहे. प्रस्तुत पुस्तकांतील टीकेचें स्वरूप थोडेंफार वेगळें वाटलें तर त्याचें कारण म्हणजे टीकेची ही विशिष्ट भूमिका होय.

टीकाकारांप्रमाणे सर्वसामान्य वाचकांनीहि आपली भूमिका ठेवली तर त्यांना केतकरांच्या कादंबऱ्यांचा आस्वाद अधिक पूर्णतेने घेतां येईल. वाचकांनी जर पूर्वग्रह व पूर्वीच्या अपेक्षा पुसून टाकल्या आणि प्रत्यक्ष वाचनांतून उत्पन्न होणाऱ्या अपेक्षा मनाशीं बाळगल्या तर त्यांना या कादंबऱ्या अधिक आकर्षक नि आस्वाद्य वाटतील. सौंदर्यवादी कादंबरींत अपेक्षित असणारे अनेक गुण या कादंबऱ्यांत मुळीच नसले आणि कादंबरीप्रबंधांत अपेक्षित असणारे कांही गुणहि या कादंबऱ्यांत उणे असले तरी या कादंबऱ्यांत कांहीतरी हृद्य, बुद्धि-वेधक व वाचकाचें सर्वस्व गुंगवून टाकणारें द्रव्य नक्कीच आहे.



परिशिष्ट

# कादंबऱ्यांतील कथानकांचा सारांश

## १. गोंडवनांतील प्रियंवदा: —

१८९३–९४ सालीं नागपूरच्या मॉरिस कॉलेजमधून रामभाऊ गोडबोले इंटरच्या परीक्षेस बसतो; पण नापास होतो. परीक्षेपूर्वी, प्रियंवदा नांवाच्या १७–१८ वर्षांच्या, मॅट्रिक झालेल्या, शृंगारप्रिय, देखण्या मुलीशीं त्याचें लग्न झालेलें असतें आणि नववधूबरोबर सुखाने काल घालविण्यांत त्याचें अभ्यासाकडे दुर्लक्ष झालेलें असतें. वडिलांच्या आजाराने व मृत्यूनेंहि त्याच्या अभ्यासांत व्यत्यय आलेला असतो. नापास झाल्याने त्याला वाटतें, की प्रियंवदेच्या मानाने आपण अशिक्षित ठरूं आणि प्रियंवदेचा आपल्याविषयीचा आदर कमी होईल. तेव्हा बॅरिस्टर होण्याच्या आकांक्षेने तो विलायतेस जातो. विलायतेस असतांना प्रियंवदेच्या प्रेमबंधनामुळे तो कोणाहि इंग्रज मुलीच्या पाशांत अडकत नाही. उलट शशिपाद लाहा हा बंगाली विद्यार्थी आयडा नामक इंग्रज मुलीच्या प्रेमांत सापडून तिच्याशीं लग्न करायला निघतो तेव्हा तो त्याला तशा लग्नाविरुद्ध इशारा देतो. योग्य वेळीं बॅरिस्टर झाल्यावर हिंदुस्थानांत परत येऊन तो खूप पैसा मिळवतो आणि प्रियंवदेसह सुखाने संसार करतो. तो दूर असतां प्रियंवदा मोहक पत्रें घालून त्याच्यावरील आपली छाप कायम ठेवते आणि नोकरी करून त्याला थोडा आर्थिक हातभारहि लावते. विरहकालांत स्त्रियांच्या हक्कांविषयी बंडखोर विचार तिच्या मनांत घोळतात; पण रामभाऊ परत येऊन संसार मुलाबाळांनी भरल्यावर ते विचार विलय पावतात. ती मुलांत नि नवऱ्यांत दंग होते.

बंडूनाना घरकुट्टे हा रामभाऊचा मित्र. तो मॅट्रिकमध्ये तीनदा नापास होतो आणि वडिलांच्या वशिल्याने सिरोंचा येथे नायब तहशीलदार बनतो. तहशील-दारींतील अधिकाऱ्यांना त्याचा चोखपणा न परवडल्याने कारस्थान करून ते त्याला नोकरीवरून काढून लावतात. तेव्हा वडिलांच्या यत्नाने निघालेल्या 'भोसला विजय मिल्स'चा तो व्यवस्थापक बनतो. मिलचें भांडवल कांही अंशीं कर्ज काढून उभारलेलें असल्याने, डायरेक्टर मंडळी घरें भरण्याच्या मागे असल्याने व बंडूनानास अनुभव नसल्याने मिल चालविणें त्याला फार कठिण जातें; पण खटपटी स्वभावामुळे तो शेवटीं यशस्वी होतो. आपले अनुभव ग्रथित करणारीं पत्रें तो वेळोवेळीं इंग्लंडमध्ये रामभाऊस पाठवीत असतो.

बंडूनानाचे वडील अनंतराव वरिष्ठाची मर्जी राखून व लटपटी करून ई. ए. सी. च्या हुद्यापर्यंत चढलेले असतात. हरिहरराव तांबडे या अल्पशिक्षित मालगुजाराशीं आपली मुलगी बिंबा हिचें लग्न लावून, पेन्शनीच्या काळांत तांबड्यांच्या मालगुजारीची व्यवस्था आपणांकडे येण्याची सोय त्यांनी केलेली असते. हरिहरराव वारल्यावर विधवा बिंबेच्यामार्फत युरोपीय स्त्रियांत व अधिकाऱ्यांत ते वशिला लावूं पाहातात आणि त्यासाठीं बिंबेला इंग्रजी व गायन शिकवितात. बिंबेचा गायनशिक्षक हरिभय्या मोघे आणि बिंबा यांचें पुढे प्रेम जमतें आणि बिंबेचा हरिभय्याशीं पुनर्विवाह होतो. आता माल-गुजारीची व्यवस्था हरिभय्याकडे जाणार म्हणून अनंतरावांना वाईट वाटतें; आणि नाइलाजाने ते हातचोळीत स्वस्थ बसतात.

शारदाबाई सोमण ह्या बिंबेच्या इंग्रजीच्या शिक्षिका. त्या पदवीधर व बुद्धिमान् असतात; पण वैधव्यांत जीवनाला कांही हेतु न लाभल्याने दुःखी असतात. एकदा ऐतिहासिक अवशेष पाहाण्याच्या निमित्ताने बिंबेसह त्या रत्नपूरला गेलेल्या असतांना तेथे त्यांची वैजनाथशास्त्री या प्रसिद्ध इतिहास-संशोधकाशीं गाठ पडते. वैजनाथांशीं त्यांचे नाना विषयांवर संवाद होतात आणि विधुर वैजनाथांचें पत्नीपद पटकावून त्या आपल्या जीवनाला एक हेतु उत्पन्न करतात. त्यांचें प्रियंवदेशीं दूरचें नातें असतें. वैजनाथांना आकृष्ट करून त्यांनी वैजनाथांशीं विवाह करावा म्हणून प्रियंवदेनेच त्यांना प्रेरणा दिलेली असते.

होरमसजी पेनांगवाला हा पार्शी कंत्राटदार बंडूनानाच्या मिलचा एक डायरेक्टर असतो. डायरेक्टरांनी मिलच्या जिवावर स्वार्थ कसा साधावा, ' बिझिनेस सेन्स ' ऊर्फ लबाडी म्हणजे काय वगैरे विषयांवर तो बंडूनानाला बऱ्याच गोष्टी ऐकवतो. त्याच्या बायकोच्या मोठमोठ्या ओळखींमुळे त्याला कंत्राटें मिळत असत. त्यामुळे बायको आश्रयदाती व तो आश्रित, असें नातें उत्पन्न होऊन त्याचें वैवाहिक जीवन बिनसलें. पुढे बायकोच्या मृत्यूनंतर पुतळीबाई या आपल्या मुलीस तो मोठी करतो. किशोरावस्थेंत पुतळीचें प्रेम अनेकांवर बसतें; पण समजूं लागल्यावर काकाजी या पार्शी बॅरिस्टराशीं लग्न करून ती नेटका संसार थाटते. तिची प्रियंवदेशीं व काकाजीची रामभाऊशीं मैत्री असते आणि प्रियंवदा काकाजीला व ती रामभाऊला मोहक वाटते. त्यामुळें काकाजी व गोडबोले या कुटुंबांचे धागे एकमेकांत गुंतलेले असतात

## २. परागंदा:—

गोविंदराव कामत मुंबईला एका परदेशी कंपनींत नोकरीला असतात; कंपनीच्या मालकाबरोबर १८९५ च्या सुमारास अमेरिकेंत जाण्याची संधि त्यांना मिळते आणि व्यापारी म्हणून ते अमेरिकेंत स्थायिक होतात. शांताबाई हें त्यांच्या पत्नीचें नांव नि रघुनंदन, लीला व सुंदर हीं त्यांच्या मुलांचीं नांवें. मुलें अमेरिकेंत जन्मल्याने व वाढल्याने त्यांच्या आशाआकांक्षा आईवडिलांच्या आशाआकांक्षांहून वेगळया बनतात आणि मुलांचें हिंदुत्व कसें टिकवावें, हा आईबापांपुढे मोठा प्रश्न उभा राहातो.

गोविंदरावांच्या मुलांना मराठी शिकवणारा गंगाधर परभणीकर हा एक शिक्षक असतो. तो मूळचा इंदूरचा. शिवाजी-उत्सवांत भाग घेतल्यावरून त्याला कॉलेजांतून काढून टाकण्यांत आलेलें असतें आणि पारतंत्र्याचा उद्वेग वाटून तो अमेरिकेंत आलेला असतो. तो स्वावलंबनपूर्वक अमेरिकेंत शिक्षण घेतो व ' गदर ' च्या क्रांतिकारक उठावांत सामील होऊन देशसेवा बजावतो. १९१४ सालीं मत्तमयूरी रायतूरकर ही श्रीमंत, सुस्वरूप तरुणी डॉक्टरी शिक्षणासाठी अमेरिकेंत येते. ती त्याच्यावर मोहित होते; पण आपण विवाहित असल्याचें सांगून तो तिला निग्रहाने दूर ठेवतो. लीला कामत या शिष्येलाहि

त्याच्याबद्दल आदर व प्रेम असतें; पण तिच्या भावनांनाहि तो उत्तेजन देत नाही. हिंदुस्थानांत परत जाणें धोक्याचें असल्याने रुक्मिणी या आपल्या पत्नीलाच तो अमेरिकेंत बोलावतो. तो अमेरिकेला गेल्यानंतर रुक्मिणी इंदूरहून वाईला आपल्या माहेरीं आलेली असते व मिस स्वीटलंडच्या हाताखाली मिशन-हॉस्पिटलांत नोकरी करून काळ कंठीत असते. नवऱ्याचें पत्र आल्यावर ती मुंबईला येते. तोंवर मुंबईस येऊन प्रॅक्टिस करूं लागलेल्या डॉ. मत्तमयूरीकडे तिला काम मिळतें. मत्तमयूरी तिला गंगाधरची खुशाली कळवते व आपणां-बरोबर इंग्लंडपर्यंत आणून तिला सोडते. पुढे लाला गजपतराव नामक पुढाऱ्यांच्या सोबतीने ती अमेरिकेंत येते आणि तिचें व गंगाधरचें मधुर पुनर्मीलन होतें.

मत्तमयूरी एका वेश्यापुत्राची व वेश्याकन्येची श्रीमंत मुलगी असते. डॉक्टरीच्या उच्च शिक्षणासाठी जेव्हा ती अमेरिकेस जाते तेव्हा कामतांकडे प्रारंभीं उतरते व तिच्याहून दोन वर्षांनी लहान असणारा रघु कामत तिच्याशीं अनेक शृंगारचेष्टा करतो. त्याच्या शृंगारचेष्टा म्हणजे ‘ फ्लर्टिंग ’ ऊर्फ पोरखेळ आहे असें तिला वाटतें; आपणांहून लहान असणाऱ्या तरुणाला प्रियकर म्हणून पतकरण्यास तिचें मन घेत नाही आणि ती रघूबद्दल उदासीन राहाते. पुढे गंगाधराकडे तिचें मन वेधतें पण गंगाधर तिची निराशा करतो. अमेरिकेहून चार वर्षांनंतर परतण्याच्या वेळीं जेव्हा ती रघूला भेटत तेव्हा रघु तिला चांगला वयांत आलेला दिसतो व तिची रघूबद्दलची उदासीनता कमी होते. ती हिंदुस्थानांत आल्यावरहि रघु पत्रांतून तिचें आराधन करीत असतो. ती रुक्मिणीला घेऊन इंग्लंडला जेव्हा जाते तेव्हा रघूहि कांही काम काढून इंग्लंडांत जातो. तेथे दोघांचें प्रेममीलन होऊन लग्न होतें.

रघूची वहीण लीला गंगाधरावर प्रेम करते; तर तिच्यावर डॉ. सरंजामे हा स्वावलंबी पदवीधर विद्यार्थी प्रेम करतो. लीला व सरंजामे यांचें प्रेममीलन बराच काळ होत नाही; पण रुक्मिणी अमेरिकेंत येऊन जेव्हा लीलेची गंगा-धराविषयी पूर्ण निराशा होते तेव्हा तें मीलन सुलभ होतें. मीलन झाल्यावर, आपणांला हिंदु व महाराष्ट्रीय जावई मिळाल्याचा कामत पतिपत्नींस आनंद होतो.

प्रा. शंकरराव गोगटे इंदूरला गंगाधरचे गुरुजी असतात. विद्यार्थ्यांत देश-

भक्ति फैलावण्याचा यत्न केल्यामुळे त्यांची नोकरी जाते आणि ते गंगाधरानंतर अमेरिकेस येतात. तेथे चढत चढत त्यांना एका कारखान्याच्या दुय्यम मॅनेजरची जागा मिळते. अमेरिकेंत स्थायिक झालेल्या हिंदी लोकांच्या उन्नतीसाठी ते डॉ. सरंजाम्यांच्या सहकार्याने ' हिंदुस्थानी सेट्लर्स असोसिएशन ' ही संस्था काढतात. स्थायिक झालेल्या हिंदी लोकांच्या भवितव्याबद्दल व कर्तव्याबद्दल त्यांचे व डॉ. सरंजाम्यांचे कांही स्वतंत्र विचार असतात. लाला गजपतराय हे कॉंग्रेसचे पुढारी जेव्हा अमेरिकेंत येतात तेव्हा आपले विचार ते त्यांना ऐकवतात.

शिवराजसिंग हा हिंदी एंजिनियर गदर पक्षाचा एक कार्यकर्ता असतो. त्याचे एका आयरिश मुलीशीं लग्न होऊन त्याला मुलें होतात. त्याच्या व त्याच्या बायकोच्या डोक्यांत रूढ धर्मकल्पनांना स्थान नसतें; पण मुलांत विशिष्ट नीतिकल्पना उत्पन्न व्हाव्यात म्हणून कांही धर्मकल्पना हव्यात, असें त्यांना वाटत असतें. मुलांमध्ये हिंदु संस्कार राहावा, म्हणून अमेरिकेंत संस्कारकर्म करणारे भटजी यावेत, असेंहि त्यांना वाटतें. तीं दोघें आपले विचार गंगाधराजवळ सांगतात.

विल्कॉक्स हा स्वामी रामतीर्थांचा एक अमेरिकन शिष्य असतो. आर्थिक भावनांचा क्षय होऊं न देतां रामतीर्थांनी त्याच्या ठिकाणीं उच्चतर भावना जागृत केलेल्या असतात व त्याच्या जीवनाला हेतु दिलेला असतो. त्यामुळे रामतीर्थांबद्दल कृतज्ञ राहून तो हिंदी अमेरिकन मंडळींत नेहमी मिसळतो.

## ३. आशावादीः—

देवीदासपंत अत्रे मूळ उमरावतीचे त्यांच्या बायकोचें नांव गोदावरी. लग्न झाल्यानंतर देवीदासपंत कांही कारणाने परदेशांत जातात आणि आफ्रिका, इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांत भटकतात. ते परदेशांत गेल्यावर गोदावरी त्यांच्या भावाकडे राहाते. पण गोऱ्यागोमट्या गोदावरीवर आपला नवरा भाळेल या समजुतीने गोदावरीची जाऊ गोदावरीला घराबाहेर काढते. गोदावरी मेली, असें देवीदासपंतांचा भाऊ त्यांना कळवतो आणि देवीदासपंत आफ्रिकेंत संन्यास घेतात. संन्यासाश्रमांतलें त्यांचें नांव स्वामी ब्रह्मगिरी असें असतें. जगाचा बहुविध अनुभव घेतल्यावर, हिंदी लोकांत आशावाद उत्पन्न

करून त्यांना समुत्कर्षाची चोदना उत्पन्न करावी म्हणून ते हिंदुस्थानांत येतात.

हिंदुस्थानांत आल्यावर बॅ. सुतारे या जुन्या मित्राशीं व सॉलिसिटर खरे वगैरेंशीं हिंदी परिस्थितीबद्दल त्यांच्या चर्चा होतात. या वेळीं नागपूरहून व्याख्यानासाठी प्रतिसहकारवादी पक्षाच्या मंडळींकडून त्यांना आमंत्रण येतें. दादासाहेब गेंगणे, बापू भोंगळवार व नारायणराव अलंकार ही मडळी त्या पक्षांतील पुढारी असतात. देवीदासपंतांचीं व्याख्यानें गीतेवर किंवा कर्मयोगावर करवून आपल्या पक्षास बळकटी आणावी, असा त्यांचा अंतस्थ हेतु असतो. नागपूरास जात असतां आगगाडींत बॅ. मोरे व पर्वते यांच्याशीं देवीदासपंतांचें संभाषण होतें व बॅ. मोरे त्यांना सुशिक्षित ब्राह्मणेतरांचा दृष्टिकोण समजावून सांगतात. नागपूरास गेल्यावर गीतेवर अत्यंत क्रांतिकारक मतें ते मांडतात व प्रतिसहकारपक्षाच्या अंतस्थ हेतूला उधळून लावतात. अर्थात् ज्या दादासाहेब गेंगण्यांकडे त्यांचें वास्तव्य असतें त्या दादासाहेब गेंगण्यांकडून त्यांना प्रतिष्ठितपणें हुसकून लावलें जातें. ते स्वतंत्र खोली घेऊन राहूं लागतात. डॉ. नंदिका या डॉक्टरी व्यवसायांतील स्त्रीशीं त्यांची पूर्वाश्रमींची हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील ओळख असते. डॉ. नंदिकेच्या प्रसूतिगृहांत पद्मावती नामक विधवा नर्सला विवाहबाह्य संबंधापासून एक मुलगी होते. ती मुलगी कोणाकडे तरी बाळगायला देण्याचें काम ते पतकरतात. त्यासाठी घरोघर हिंडत असतां चुकून ते एका वेश्यागृहांत शिरतात व तेथे कपिला या सुशिक्षित वेश्याकन्येशीं त्यांची गाठ पडते. वेश्या व पतिता यांच्या उन्नतीबद्दल अनेक नवे विचार कपिलेच्या संभाषणांत त्यांना ऐकावयास मिळतात.

इकडे, ते जिला मृत समजत असतात ती गोदावरी मिसेस हंटर या ख्रिस्ती बाईच्या ‘ उद्योगमंदिरां ’त मुंबईला येऊन राहिलेली असते. तेथे ती ख्रिस्ती होऊन मिस एल्मा हंटर म्हणून वावरते. विवाहबाह्य संततीमुळे कलंकित झालेलें तोंड लपविण्यासाठी एखाद्या ख्रिस्ती आश्रमांत जाण्याची इच्छा उपर्युक्त पद्मावतीस होते. तेव्हा डॉ. नंदिका तिच्यासाठी उद्योगमंदिरांत चौकशी करते आणि तिला नेण्यासाठी गोदावरी ऊर्फ एल्मा हंटर नागपूरास येते. यापूर्वी आपल्या पतीचा शोध मिसेस हंटरच्या सहकार्याने तिने चालविलेला असतो व देवीदासपंत परदेशांतून परत येऊन नागपूरांत हिंडत

असल्याचें तिला कळलेलें असतें. त्यामुळे नागपूरास आपल्या पतीचें चिरवांच्छित दर्शन होईल, अशीहि तिची अपेक्षा असते. पद्मावती तिच्या ताब्यांत आल्यावर तें देवीदासपंतांना कळतें आणि तिच्याकडे पद्मावतीला ख्रिस्ती आश्रमांत जाण्यापासून परावृत्त करण्याकरिता ते येतात. या वेळीं आपण गोदावरी असल्याचें ती प्रकट करते आणि देवीदासपंतांचें व तिचें पुनर्मीलन होतें. तिच्या शुद्धीकरणाची देवीदासपंतांना आवश्यकता वाटत नाही; कारण शुद्धि म्हणजे बाप्तिस्म्यास संमति, असा त्यांचा युक्तिवाद असतो.

गोदावरी ज्या मिसेस हंटरच्या ‘ उद्योगमंदिरां ’त राहिलेली असते ती मिसेस हंटर लहानपणीं इंग्लंडमध्ये देखणी, फॅशनेबल तरुणी म्हणून प्रसिद्ध असते. तिचें रिचर्ड कार्नी या पक्षघात झालेल्या तरुणावर प्रेम जडतें व त्याच्यामुळे दीनरक्षणाचें ध्येय तिच्या मनांत बिंबतें. कार्नीवर तिचें प्रेम असलें तरी तिच्या बापाचा आर्थिक साह्यक जॉर्ज हंटर याच्याशीं आईबापांच्या आग्रहामुळे तिला लग्न करणें भाग पडतें. जॉर्ज आफ्रिकेंतील एक सधन मळेवाला असतो. त्याच्याकडे गेल्यावर ती नीट वागत नाही आणि काडी-मोड घेते. इंग्लंडांत परत आल्यानंतर एक आत्मचरित्रपर गोष्ट ती लिहिते. त्या गोष्टीवरून जॉर्जला तिच्या खऱ्या मनाची ओळख पटते आणि तो दीन-रक्षणाच्या तिच्या ध्येयार्थ एक मोठी रक्कम तिच्याकडे धाडतो. अशीच रक्कम रिचर्डनेहि तिच्यासाठी ठेवलेली असते व तो मृत्युमुखीं पडलेला असतो. जॉर्जने रकमेबरोबर जें पत्र पाठविलेलें असतें त्यामुळे त्याच्या मनांत उदात्त भावना असल्याचें तिच्या ध्यानांत येतें. पण ती त्याच्याकडे पुन्हा जाण्यापूर्वी तो कालवश होतो. तेव्हा, कोणताच मायापाश न उरून ती हिंदुस्थानांत येते आणि ‘ उद्योगमंदिर ’ काढून दीन स्त्रियांच्या उद्धाराचें कार्य हातीं घेते.

ठकूबाई नांवाच्या विधवा शिक्षिकेशीं अनिरुद्ध नगरकर हा तरुण विवाहबद्ध होतो आणि त्याला जी मुलगी होते तीच नंदिका होय. तिचा लालनाथ या कारकुनाशीं विवाह होतो; पण नेकीने वागून लालनाथ तिला इंग्लंडांत डॉक्टरी शिक्षणासाठी पाठवितो. परत आल्यावर आपण व लालनाथ यांमध्ये शैक्षणिक व सांस्कृतिक अंतर खूपच असल्याचें तिच्या ध्यानीं येऊन ती असमाधानी बनते. या सुमारास डॉ. परमानंद या प्रौढ अविवाहित मनुष्याशीं समव्यवसायामुळे तिचा संबंध वाढतो आणि परमानंदाकडून अनुनय करून

घेण्याचा मोह तिला होतो. तिला शांपेन पाजून तिचा उपभोग घ्यावा, असा प्रयत्न एकदा परमानंद करतो; पण तो फसतो. नंतर परमानंदापेक्षा लालनाथाचें प्रेम अधिक स्थिर व आदरणीय असल्याचें तिला समजतें आणि ती लालनाथाशीं एकनिष्ठपणें राहूं लागते. पुढे तिच्याकडे नर्स पद्मावती बाळंतपणासाठी येते. तेव्हा, तिला पद्मावतीकडून कळतें, कीं तिच्यापूर्वी पद्मावतीला शांपेन पाजून डॉ. परमानंदाने फसविलेलें असतें. पद्मावतीला जी मुलगी होते ती डॉ. परमानंदापासूनच झालेली असते. गोदावरीसह पुनर्मीलन झाल्यानंतर देवीदासपंत डॉ. परमानंदाची गाठ घेतात आणि त्याला पद्मावतीचा व मुलीचा स्वीकार करण्यास प्रवृत्त करतात.

डॉ. नंदिकेचें बॅ. विश्वामित्र यांच्याकडे जाणेंयेणें असतें. सर दामोदर या आपल्या वडिलांच्या इच्छेप्रमाणे विश्वामित्र आय. सी. एस. होत नाहीत. तर वडिलांच्या इच्छेविरुद्ध बॅरिस्टर होऊन ते इंग्लंडांतून परतलेले असतात. त्यांचें सामाजिक व राजकीय चळवळींकडे बरेंच लक्ष असतें. त्यांनी अशा चळवळींत लक्ष घालून बॅरिस्टरी करण्याऐवजी बडी नोकरी धरावी, असें त्यांची पत्नी विहंगमा हिला वाटतें; कारण तिची बहीण अलकनंदा हिचा पति आय. सी. एस. कलेक्टर असतो. विहंगमा व विश्वामित्र यांच्या आकांक्षा अशा भिन्न असल्याने त्यांच्यांत द्वैत उत्पन्न होतें. विश्वामित्रांचें लक्ष त्यामुळे कांहीं काळ विहंगमेवरून उडून डॉ. नंदिकेकडे वेधतें. पण पुढे डॉ. नंदिकाच विहंगमेला विश्वासांत घेते; अलकनंदेच्या पत्रांवरून बड्या नोकरदारांची हीन द्रव्यलालसा व सांसारिक दुःखें विहंगमेला समजतात आणि विहंगमा विश्वामित्राशीं मिळतें घेते. याच सुमारास विश्वामित्र स्वराज्य पक्षातर्फे निवडणुकीस उभा राहातो व निवडून येतो. तेव्हा आपला पति खूपच मोठा मनुष्य झाला, असें वाटून विहंगमा त्याच्याशीं पूर्ण समरस होते.

**४. ब्राह्मणकन्या:--**

मंजुळा ही स्कॉलर्शिपच्या आशेने अव्वल स्त्रीशिक्षणाच्या काळांत सहासात इयत्ता शिकलेली एक ब्राह्मणेतर विवाहित स्त्री असते. तिला मास्तरणीची नोकरी लागल्यावर अडाणी नवऱ्याच्या घरीं जाणें आवडत नाही व ती नवऱ्याला स्वतःवरचा हक्क सोडायला लावते. पुढे अनेक प्रेमसंबंध जुळवून

अखेर ती डॉ. चिंतोपंत यांची रखेली बनते. डॉ. चिंतोपंतांपासून तिला जीं मुलें होतात त्यांपैकी शांता ही एक होय. अकुलीनपणामुळे शांतेचें लग्न न झालें तरी तिला पोटाची पंचाईत नसावी म्हणून मंजुळा तिला इंग्रजी ४–५ इयत्तांपर्यंत शिकविते. पण जातिभेद मोडण्याच्या ध्येयासाठी व शांतेने ख्रिस्ती वगैरे परधर्म स्वीकारूं नये म्हणून अप्पासाहेब डग्गे नांवाचे तरुण वकील शांतेशीं विवाह करतात. या विवाहानंतर लौकरच डॉ. चिंतोपंत वारतात व बारा वर्षांनी मंजुळा परलोकवासी होते.

कालिंदी ही अप्पासाहेबांची नि शांतेची मुलगी. ती एका रखेलीच्या मुलीची मुलगी असल्याने तिचा कोणा ब्राह्मणाशीं विवाह होणें कठिण असतें. असा विवाह झाला तरी तो दुःखकारक होईल व शिवाय संतति अधार्मिक किंवा अकुलीन गणली जाईल, असें भय असतें. तेव्हा, विवाहावरचा कालिंदीचा विश्वासच उडतो. अप्पासाहेबांचा एक लिंगायत पक्षकार शिवशरण याच्याशीं या वेळीं तिचा परिचय होतो आणि त्याच्या दुःखी वैवाहिक जीवनाबद्दल करुणा उत्पन्न होऊन ती लग्नाशिवाय त्याच्यापाशी रखेली म्हणून राहाते. शिवशरणचें लग्न त्याच्या चुलत्यांनी व वडिलधाऱ्या दिवाणजींने संगनमत करून स्त्रीत्व नसलेल्या एका स्त्रीशीं लावलेलें असतें. हेतु हा की शिवशरण मेल्यावर त्याची इस्टेट आपल्याला मिळावी. पत्नीचें न्यून लाजेने शिवशरण प्रथम कोणास सांगत नाही. पुढे त्याच्याच न्यूनाने मूल होत नाही, असें त्याचा दिवाणजी उठवून देतो. त्यामुळे त्याला दुसरी बायको मिळणें अशक्य होतें. अशा स्थितींत कालिंदीवर त्याचें प्रेम बसतें व तो रखेली म्हणून तिचा स्वीकार करतो. प्रारंभीं कालिंदीची तो उत्तम बडदास्त ठेवतो; पण कालिंदीच्या नादांत दुकानाकडे दुर्लक्ष होऊन तें डबघाईला आल्यावर तो तिची टाळाटाळ चालवतो बंगल्यांतून वेश्यावस्तीजवळच्या अंधाऱ्या खोलींत जेव्हा तो कालिंदीची रवानगी करतो तेव्हा कालिंदी त्याला सोडून जाते.

शिवशरणने असहाय केल्यावर निराशेच्या भरांत कालिंदी जीव देण्याचा बेत करते. पण आयत्या वेळीं एसतेर ही बेनेइस्रायल मैत्रीण तिला भेटते व आपल्या घरीं घेऊन जाते. एसतेरच्या साहाय्याने कालिंदीला मुंबईस 'लेबर डिपार्टमेंट'मध्ये नोकरी मिळते. शिवशरणपासून झालेला मुलगा पुण्याला एसतेरकडे ठेवून कालिंदी मुंबईस जाते आणि तेथे तिच्या नव्या जीवनास

प्रारंभ होतो. रामराव धडफळे या मजूर पुढाऱ्याशीं तेथे तिची ओळख होऊन त्या ओळखीचें रूपांतर प्रेमांत होतें. तिनें पूर्वी टोपण नांवाने एक गोष्ट लिहिलेली असते. त्या गोष्टींतला नायक नानाभाई बरेच दिवस नायिका उपेंद्रवज्रा हिच्यावर प्रेम करतो; तिच्याशीं आलिंगनचुंबनादि शृंगार खेळतो; पण शेवटीं पैशासाठी दुसऱ्या स्त्रीशीं लग्न करतो. गोष्टींत असा प्रश्न उत्पन्न केलेला असतो, की उपेंद्रवज्रेने पुढे काय करावें? या गोष्टीला उत्तर म्हणून रामरावाने एक आत्मवृत्तपर गोष्ट लिहिलेली असते. तीमध्ये करुणसुंदरी नामक गुर्जर तरुणी आपल्या शिक्षकाशीं प्रेमचेष्टा करते आणि त्या शिक्षकाने लग्नाची गोष्ट काढल्यावर आपला वाङ्‌निश्चय पूर्वीच झाल्याचें त्याला सांगते. तिचा नियोजित पति अल्पवयी व अशक्त असल्याने शृंगारासाठी तिचें लक्ष त्या शिक्षकावर असतें आणि नियोजित पतीकडून बराच पैसा मिळालेला असल्याने ती ठरलेलें लग्न मोडण्यास प्रतिकूल असते. गोष्ट लिहिण्याचा हेतु असा असतो, की उपेंद्रवज्रेप्रमाणे फसून कलंकित झालेले पुरुषहि असतात व पुढे काय करावें, हा प्रश्न त्यांच्यापुढेहि असतो. या गोष्टी आपण दोघांनी लिहिल्या आहेत, हें ओळखीनंतर संभाषणांत कालिंदीला व रामरावाला समजतें. रामराव हेंहि स्पष्ट करतो, की गोष्टींतील शिक्षकाचा अनुभव म्हणजे त्याचा स्वतःचाच अनुभव असतो व तो स्वतः कलंकित असतो. या स्वानुभवामुळे व कम्युनिस्ट धर्तीच्या मतांमुळे कालिंदीच्या पूर्वाचरणाचें तो कांही मानीत नाही व तिचा पत्नी म्हणून तो स्वीकार करतो.

इकडे शिवशरणचा डबघाईस आलेला व्यापार आणखी डबघाईस येतो; कारण तो कालिंदीच्या संगतींत दंग असतांना त्याचा दिवाणजी मल्लिकार्जुन मडकी याने हव्या त्या मार्गाने त्याच्या दुकानाची लूट केलेली असते. तो व्यापार सावरण्याचा यत्न करतो पण तें अशक्य होतें. तेव्हा निराश नि बेफाम बनून तो सट्टे व जुगार खेळतो आणि दारू पितो. शेवटचा सट्टा बुडाल्यावर तो अफू खाऊन आत्महत्त्या करतो. आपल्या मृत्युपत्रांत आपल्या व कालिंदीच्या मुलासाठी तो कांही इस्टेट ठेवतो आणि कालिंदविरील आपलें प्रेम व्यक्त करतो. केवळ पेचांत सापडल्यामुळेच कालिंदीकडे त्याने दुर्लक्ष केलेलें असतें.

कालिंदीचा सत्यव्रत हा भाऊ व उषा ही बहीण. सत्यव्रताचा कालिंदीमुळे

एसतेरशीं परिचय होतो व त्या दोघांचें प्रेम जमून लग्न होतें. एसतेर सुशिक्षित पण गरीब असते. त्यामुळे अशिक्षित तरुण तिच्या सुशिक्षितपणाला भितात; तर श्रीमंत तरुण गरीब म्हणून तिला नाकारतात. मिळून ती लग्नाशिवाय राहिलेली असते. त्यामुळे सत्यव्रतासारख्या अशिष्ट संततीशीं जातीबाहेर लग्न करण्यास ती अनुकूल होते. सत्यव्रताचें त्याच्या आशिष्ट उत्पत्तीमुळे ब्राह्मण मुलीशीं लग्न होणें कठिण असतें. शिवाय जातिभेद मोडण्याचें ध्येयहि त्याच्या मनांत असतें. त्यामुळे तोहि एसतेरसारख्या बेनेइस्रायल मुलीशीं लग्नास तयार होतो. एसतेरचा एक दूरचा नातेवाईक बेंजामिन कोरलेकर याच्याशीं उषेचें याचप्रकारें लग्न होतें.

स्वतःच्या अशिष्ट लग्नानें उत्पन्न झालेल्या प्रश्नांची चर्चा करण्यासाठी अप्पासाहेब डग्गे सत्यव्रताबरोबर वैजनाथ नामक प्रसिद्ध इतिहास-संशोधकाकडे व समाजशास्त्रज्ञाकडे मधून मधून जातात. वैजनाथ त्यांना विवाहसंस्थेविषयी अत्यंत क्रांतिकारक विचार ऐकवतात. त्या विचारांच्या अनुरोधानें नवसमाजनिर्मिति करावी, असा वैजनाथ, अप्पासाहेब, सत्यव्रत वगैरेंचा विचार असतो. पण वैजनाथ अचानक मृत्युमुखीं पडल्यानें तो जागच्याजागीं जिरतो.

## ५. गावसासू:—

लिझी ही लंडनमधल्या एक खाणावळवाल्या बाईची मुलगी असते. तिला पैसेवाला नवरा मिळावा म्हणून ती व तिची आई खूप लटपटी करतात. बॅरिस्टर होण्यासाठी इंग्लंडांत आलेला एककवडी मैत्र जेव्हा या खाणावळवालीकडे बोर्डर म्हणून राहातो तेव्हा आईच्या प्रोत्साहनानें लिझी त्याला आपल्या पाशांत पकडते. पुढे लिझी व एककवडी मैत्र पळून जाऊन लग्न करतात. असें लग्न केल्यानें लग्नांतील रूढिभंगाचा ठपका आईबापांवर येत नाहीं; आईबापांवर लग्नाचा खर्चहि पडत नाहीं आणि लग्नाची फुकट जाहिरात होते. म्हणूनच आईशीं आधी संगनमत करून लिझीनें असें लग्न लावलेलें असतें. लिझी हिंदुस्थानांत आल्यावर तिला जीं चारदोन मुलें होतात त्यांपैकी कुसुमकलिका ही एक होय.

कुसुमकलिकेला पैसेवाला नवरा मिळावा म्हणून कुसुमकलिका व लिझी नाना भानगडी करतात. प्रथम प्रो. हेरंब गुह यांना कुसुमकलिका जाळ्यांत

पकडते; पण पुढे अधिक पैसेवाले उपेंद्र दास दृष्टिपथांत येतांच ती त्यांना झिडकारून टाकते. उपेंद्र दासांशीं संबंध असतांना ती मुजुमदार नामक आय. सी.एस.लाहि जाळ्यांत गुंतवून ठेवते. हेतु हा की दोन्हीपैकी एक जण तरी खात्रीने पदरांत पडावा. पुढे, एक लक्ष रुपये हुंडा देऊन एक जमिनदार मुजुमदारला जावई करून घेतो. तेव्हा, कुसुमकलिकेचें लग्न उपेंद्रनाथ दासांशीं होतें. उपेंद्रनाथ बिजवर असतात; त्यांना पाहिल्या संबंधापासून प्रफुल्ल नामक मुलगा झालेला असतो; पण अधिक श्रीमंत नवरा डोळ्यासमोर नसल्याने कुसुमकलिकेला त्यांना पतकरावें लागतें.

कुसुमकलिकेला ललिता व सुनीति अशा दोन मुली होतात. नवऱ्याची इस्टेट सावत्र मुलाला म्हणजे प्रफुल्लला जाणार म्हणून प्रफुल्लचा ती छळ करते. तिच्या अनेक युरोपीय अधिकाऱ्यांशीं ओळखी असतात. बायकोच्या अशा ओळखी असल्यास आपलें सरकारी अधिकाऱ्यांत वजन आहे, असा गवगवा होऊन बॅरिस्टरी चालविण्यास कुळें अधिक मिळतात, असें उपेंद्र दासांना वाटतें. युरोपीय अधिकाऱ्यांशीं बायकोचे वामसंबंध आहेत, अशा कंड्या उठल्या तरी त्यांकडे त्यामुळे तो दुर्लक्ष करतो. पण त्याचें दुर्लक्ष म्हणजे स्वैर वागण्याची मुभा अशी समजूत करून घेऊन कुसुमकलिका खरोखरच तसें वागूं लागते. तेव्हा तिची ब्याद जवळ नको, मुलालाहि तिचा जाच नको, म्हणून उपेंद्र दास तिला मुलींच्या शिक्षणाच्या निमित्ताने इंग्लंडांत पाठवितात.

आपल्या आईकडून व आजीकडून मिळालेलें सारें कौशल्य खर्च करून कुसुमकलिका आपल्या मुलींना श्रीमान् आय.सी.एस. नवरे बघून देण्याचा उद्योग इंग्लंडमध्ये करते. चॅटर्जी नांवाचा हुशार तरुण खात्रीने आय. सी. एस. होणार या आशेने ती ललितेचें प्रेम चॅटर्जीशीं जमवून देते. पण चॅटर्जी नापास होतो आणि त्याला सोडून देण्याचा तिचा सल्ला ललिता मानीत नाही. त्यामुळे आय. सी. एस. न झालेल्या चॅटर्जीशीं ललितेचा विवाह होतो. पुढे लटपटपूरच्या महाराजांचा स्वागतसमारंभ घडवून आणून कुसुमकलिका त्यांच्यावर छाप पाडते व त्यांच्या संस्थानांत चॅटर्जीला बडी नोकरी मिळवून देते.

सुनीतीला श्रीमंत नवरा मिळावा, म्हणून कुसुमकलिका अनेक तरुणांना सुनीतीच्या जवळ येऊं देते व दूर लोटते. चंदनानी या सिंधी आय. सी. एस. तरुणाशीं सुनीतीचें संघटन ती बरेंच वाढूं देते. संघटन आलिंगनचुंबनापर्यंत

गेल्यानंतर चंदनानी सांगतो, की आपलें लग्न झालेलें असून आपणांला एक मुलगाहि आहे ! तेव्हा कुसुमकलिकेला फार राग येतो व ती सूड उगवण्यासाठी चंदनानीविरुद्ध कुभांड रचते. ती लोकांना सांगते, की चंदनानीनें सुनीतीला कांहीं असभ्य सूचना केल्यावरून त्या दोघांचें फिसकटलें. तिच्या सांगण्यावरून जाह्नवी कैलासनाथ या सासूपणा गाजवणाऱ्या बाई चंदनानीची खरडपट्टी काढण्यास जातात; पण चंदनानी त्यांना कांहीं वेगळयाच गोष्टी ऐकवितो. त्याचें लग्न झालेलें नसतें नि त्याला मुलगाहि अर्थातच झालेला नसतो. आय. सी. एस. होण्यापूर्वी सुनीतीनें त्याला तुच्छतेनें वागविलेलें असतें; पण आय. सी. एस. होतांच सुनीति व कुसुमकलिका यांनी त्याला अगत्यानें जवळ केलेलें असतें. या वागण्याचा राग येऊन दोघींची खोड मोडण्यासाठी त्यानें लग्नाची थाप मारून केवळ गंमत केलेली असते. वास्तविक सुनीतीवर त्याचें प्रेमच असतें. त्यानें ऐकवलेली ही हकीगत जाह्नवीबाई लगेच सुनीतीला व कुसुमकलिकेला सांगत नाहीत. त्यामुळे चंदनानीनें आपणांस फसविलें अशाज समजुतींत त्या राहातात.

मध्यंतरीं आईच्या नियंत्रणाचा सुनीतीला वीट येतो व ती स्वावलंबी बनण्याचें ठरविते. शेपर्डबुशच्या म्युझिक हॉलमध्ये तिला गायनाचें काम मिळून ती हिंदी विद्यार्थ्यांत एकदम लोकप्रिय होते. पूरणसिंग नांवाचा एक शीख तरुण या वेळीं तिच्याशीं परिचय वाढवितो व ती त्याला उत्तेजन देते. आपण ऐकवलेली हकीगत जान्हवीबाईंनी सुनीतीला व कुसुमकलिकेला सांगितली असेल, अशी चंदनानीची कल्पना असते. तरीहि सुनीति पूरणसिंगास उत्तेजन देते, हें बघून तो संतापून जातो.

या सुमारास इंग्लंडांतील हिंदी विद्यार्थ्यांच्या नैतिक स्खलनावर जाह्नवीबाई एका व्याख्यानामध्ये विदारक प्रकाश टाकतात. उपवक्ता म्हणून बोलत असतां पूरणसिंग स्वतःचें नैतिक स्खलन झाल्याचें जाहीरपणें कबूल करतो. त्यामुळे त्याची संगति सुनीतीला अप्रिय होऊं लागते. व्याख्यानाच्या प्रसंगानंतर जाह्नवीबाई आपल्या घरीं सुनीतीला व कुसुमकलिकेला सायंभोजनास बोलावतात आणि चंदनानीबद्दलच्या सर्व खऱ्या गोष्टी त्यांच्या कानावर घालतात. त्या ऐकून त्यांचें मन चंदनानीविषयी साफ होतें. त्याच्याशीं सुनीतीचा विवाह व्हावा, असेंहि त्यांना वाटतें. सायंभोजनाला जान्हवीबाईंनी

आधीच चंदनानीस आमंत्रण दिलेलें असतें. तो आला, की साहजिकच त्याचें व सुनीतीचें पुनर्मीलन होतें. सारांश, श्रीमंत आय.सी.एस. जावई मिळवण्याची कुसुमकलिकेची महत्त्वाकांक्षा सुनीतीच्या बाबतींत तरी सफल होते.

**६. विचक्षणाः—**

प्रा. प्रभाकरपंत लोंढे हे पुण्यांत राहाणारे एक विचारजीवी विधुर असतात. मधुमालती, विचक्षणा व बाळोबा हीं त्यांच्या मुलांचीं नांवें होत. त्यांच्याकडे येणाराजाणारा त्यांचा विद्यार्थी माधव छत्रे याच्यावर मधुमालती व विचक्षणा या दोघींचें मन गेलेलें असतें. मधुमालती विधवा नि सुंदर असते; तर विचक्षणा कुमारी नि साधारण रूपाची असते. कमी शिक्षण झाल्याने मधुमालती घर सांभाळते आणि बी. ए. होऊन विचक्षणा शिक्षिकेची नोकरी करते. संकर्षण आठवले नामक चित्रकाराने मधुमालतीला अनेकदा फिरायला जातांना पाहिलेलें असतें. तो कांही चित्रें हुबेहुब मधुमालतीसारखीं काढतो आणि त्याचा व मधुमालतीचा संबंध असल्याची कंडी पिकते. तीवरून विचक्षणेला वाटतें, की मधुमालतीचें व संकर्षणचें जमवून द्यावें, म्हणजे माधव छत्रे मधुमालतीऐवजी आपणांलाच मिळेल. त्याप्रमाणे ती मधुमालतीची व संकर्षणची ओळख करून देते आणि त्या दोघांचें प्रेम जमतें. लग्नाला प्रा. लोंढ्यांची संमति मिळणार नाही, अशा समजुतीमुळे दोघें मुंबईस लग्न लावण्याच्या उद्देशाने पळून जातात. पण पाठोपाठ प्रा. लोंढे मधुमालतीला जी तार करतात तीवरून लग्नाला त्यांचा विरोध नाही, हें स्पष्ट होतें. तेव्हा दोघें पुण्यास तशींच परत येतात आणि कालांतराने विवाहबद्ध होतात. सौंदर्याच्या जोरावर व पैशांच्या लालचीने सिनेमांत नटी म्हणून जाण्याचा विचार लग्नापूर्वी मधुमालतीच्या डोक्यांत आलेला असतो; पण सिनेमांत गेल्यास कुलस्त्रीचें जीवन जगतां येणार नाही म्हणून तिने तो सोडून दिलेला असतो. तिच्या लग्नानंतर विचक्षणेचें माधवबरोबर लग्न होतें.

डॉ. तर्कट हे प्रा. लोंढ्यांचे जुने मित्र. तरुण असतां एका उत्सवप्रसंगीं ते एका वेश्येकडे जातात आणि रंगू या वेश्याकन्येवर त्यांचें मन जातें. पैसा नसल्याने तरुणपणांत पुष्कळ धडपडूनहि रंगू त्यांना मिळत नाही. पण विलाय-

तेहून परतल्यावर ते तिला कुंटिणीकडून सोडवून स्वतःची रखेली म्हणून बाळगतात. तिला ते गायन शिकवतात आणि गायनावर खूप पैसा मिळवून ती स्वतंत्रपणें पण एकनिष्ठपणें राहाते. डॉ. तर्कट्यांच्या लग्नाला ती विरोध करीत नाही. तिला डॉ. तर्कट्यांपासून मंजुळा ही मुलगी होते. डॉ. तर्कटे मंजुळेला बी. ए. पर्यंत शिकवतात आणि गायननर्तनादि धंद्यांतच पडण्यास सांगतात. पण तिची इच्छा असते, की एखाद्या उच्चजातीय तरुणाशीं लग्न करून आपण कुलस्त्रीचें जीवन जगावें.

प्रा. लोंढ्यांचा मुलगा बाळोबा मुंबईस वार्ताहराचें काम करतो. त्याच्या प्रामाणिकपणामुळे मजूरसंघांच्या खजिनदाराचेंहि काम त्याला मिळतें आणि गिरणजगाशीं त्याचा संबंध येतो. मुंबईस असतां डॉ. तर्कट्यांकडे तो उतरतो. तर्कटे स्वतःच्या दोन औरस मुलींशीं त्याची ओळख होऊं देतात; पण मंजुळेची नि त्याची ओळख होऊं नये म्हणून जपतात. तरीहि तो मंजुळेकडे ओळख काढून जातो आणि मंजुळेशीं त्याचें थोडेंफार प्रेम जमतें. मंजुळेचा उद्धार करावा, ही त्याची इच्छा असते; तर त्याच्यासारख्या ब्राह्मण तरुणाबरोबर विवाह करून शिष्ट समाजांत शिरावें, ही मंजुळेची इच्छा असते. पुढे, सत्यबाला चौधरी या विलायतेहून आलेल्या, मजूर पुढाऱ्यांत वावरणाऱ्या व घटस्फोटित स्त्रीशीं बाळोबाची ओळख होते. मंजुळेपेक्षा तिचाच उद्धार करावा, ती अधिक सुशिक्षितहि आहे, असें वाटून तो मग तिच्यामागे लागतो. पण इकडे त्याचा प्रामाणिकपणा व करडा कारभार महाग वाटून मजूर पुढारी त्याला मजूरसंघांच्या खजिदारीवरून दूर करतात. वडिलांच्या ओळखीने चिमणशेट व मोतीलालशेट यांच्या एका गिरणीचें 'सेक्रेटरी-पद' याच वेळीं त्याने स्वीकारलेलें असतें. तें निमित्तहि त्याला खजिनदारीवरून दूर करतांना मजूरपुढाऱ्यांना सापडलेलें असतें. त्याचें वजन मजूरसंघांत असें कमी झाल्यामुळे सत्यबाला त्याला सोडून देते. रे. गणपतराव हे ख्रिस्ती गृहस्थ प्रा. लोंढ्यांच्या परिचयाचे असतात. त्यांची मुलगी कृपाबाई पुण्याला विचक्षणेच्या शाळेंत शिक्षिका असते. तिचा नि बाळोबाचा अर्थातच परिचय असतो. तिचें मनहि बाळोबावर गेलेलें असतें. एके दिवशीं पूर्वेतिहास निघतां निघतां कृपा आपली दूरदूरची मावसबहीण लागते, हें बाळोबाला समजतें. कृपेची आई असहाय स्थितींत ख्रिस्ती झालेली असते. तिला बाळोबाच्या

आजोबांनी ( म्हणजे आईच्या वडिलांनी ) ती त्यांच्या बायकोची मावसबहीण असतांहि साह्य केलेलें नसतें. ख्रिस्ती झाल्यावर एका हीनजातीय ख्रिस्त्याशीं लग्न करण्याचें संकट तिच्यावर येतें. पण तिचे ब्राह्मण शिक्षक गणपतराव तिच्या साह्याला धावून येतात. ते स्वतः ख्रिस्ती होतात नि तिचा स्वीकार करतात. हा पूर्वेतिहास समजल्यावर बाळोबाला वाटतें, की आपल्या आजोबांनी कृपेच्या आईला साह्य केलें नाही; तर आपण कृपेला साह्य करून त्याची भरपाई करावी. तो कृपेच्या सौंदर्यानें आकृष्टहि झालेला असतो. तेव्हा कृपाबाईचा नि त्याचा विवाह होतो.

श्रीरंगाचार्य हे वल्लभ पंथांतील पदभ्रष्ट गुरु असतात आणि स्वतंत्र पीठ-स्थापना करावी, असा त्यांचा विचार असतो. पुण्याला आपल्या आश्रमाचें प्रस्थ ते खूपच वाढवितात. पद्मनाभ मंडपे हा प्रा. लोंढ्यांचा विद्यार्थी त्यांचा चेला बनतो व त्यांच्या आश्रमाचीं सूत्रें अंतस्थपणें हलवतो. आश्रमाची जाहि-रात व्हावी म्हणून डॉ. तर्कट्यांची रखेली रंगू ऊर्फ रंजिता वेरेंकर हिचें गायन तो आश्रमांत करतो. एका लैंगिक विषयावरील व्याख्यानसत्राच्या निमित्तानें प्रा. लोंढे व डॉ. तर्कटे यांनाहि तो आश्रमाशीं निगडित करतो. प्रा. लोंढ्यांचे मित्र मोतीलाल शेठ यांना मूल होत नाही. मूल न होण्याचें कारण त्यांच्यांतच कांही न्यून असतें. आपल्या प्रचंड इस्टेटीला वारस असावा, ती नातलगांच्या घशांत जाऊं नये म्हणून मूल व्हावेसें त्यांना फार वाटतें. मुलगा दत्तक वगैरे न घेतां स्वतःच्या बायकोलाच मूल व्हावें, अशीहि त्यांची इच्छा असते. तेव्हा गुरुकडून किंवा गुरुशिष्यांकडून पुत्रोत्पत्ति करवून घेण्यासाठी आपली बायको रामप्यारी हिला ते श्रीरंगाचार्यांच्या सेवेला पाठवितात. पण श्रीरंगाचार्यांचा वर्तनक्रम रामप्यारीला न आवडून ती तेथून परत येते.

प्रा. लोंढ्यांची मुलगी विचक्षणा हिचें माधवबरोबर लग्न झालें, तरी तें सुखाचें होत नाही. माधवचें लक्ष तिच्या पगारावर असतें. तो आळशी बनतो व रिकामपणांत त्याचें लक्ष इतर स्त्रियांकडे जातें. विचक्षणा सुस्वरूप नसते, हेंहि त्याचें लक्ष दुसरीकडे जाण्यास एक कारण असतें. तो कृपाबाई व मंजुळा यांच्याशीं लगट करतो. पण बाळोबाकडे त्या दोघींचा अधिक ओढा असल्यानें त्याचें त्यांच्याशीं जमत नाही. नोकरीसाठी प्रा. लोंढ्यांचें ओळख-पत्र घेऊन तो मोतीलाल शेटजींकडे मुंबईस जातो. तेव्हा मित्राचा जावई म्हणून त्याचा

चांगला सत्कार होतो. मोतीलाल त्याला आपल्या घरीं ठेऊन घेतात आणि त्याचा व रामप्यारीचा संबंध जुळवून देतात. पुढे, रामप्यारीला त्याच्यापासून मुलगा झाल्यावर मात्र ते संभावितपणें त्याचा संबंध तोडून टाकतात. इकडे, विचक्षणेला दिवस गेलेले असतात, म्हणून ती नोकरी सोडून देते. तेव्हा माधवाला द्रव्यार्जनासाठी खूप धडपडावें लागून त्याचे इतर स्त्रियांवरील लक्ष कमी होतें. पुढे त्याचा नि विचक्षणेचा संसार सुरळीत चालू होतो.

चंदू लटके हा एका सावकाराचा ब्राह्मण विधवेपासून झालेला अनौरस मुलगा असतो. वापाकडून मिळालेल्या संपत्तीच्या जोरावर तो 'चंद्रोदय' स्टुडिओ काढतो. तारा ही त्याच्या धंद्यांतील त्याची साह्यक असते व त्याची मैत्रीण किंवा रखेली असते. चंदू लटकेमुळेच मधुमालतीचें लक्ष किंचित्काल सिनेमाकडे वळलेलें असतें. तारा ही चंदूची मैत्रीण असली तरी घर करून राहाण्याची त्याला इच्छा होते. म्हणून तो डॉ. तर्कट्यांची अनौरस कन्या मंजुळा हिला मागणी घालतो. मंजुळा प्रथम त्याला नकार देते. पण बाळोबाच्या बाबतींत निराशा झाल्यावर ती त्याचा स्वीकार करते. लग्नानंतर तीं दोघें मिळून सिनेमाचा धंदा जोरांत चालवितात. रा. ब. खेडकर नांवाच्या अस्पृश्य कंत्राटदाराने आधीच मंजुळेशीं लगट केलेली असते; पण अस्पृश्याशीं लग्न करण्यांत कमीपणा वाटून मंजुळेने त्याच्या तोंडाला पानें पुसलेलीं असतात.

डॉ. तर्कट्यांचे विचार बाळोबा वृत्तपत्रांत प्रसिद्ध करतो आणि त्या विचारांना 'तर्कटनीति' हें नांव मिळतें. तर्कटनीतीला प्रा. लोंढे व पद्मनाभ मंडपे पुस्त्या जोडतात. पुस्त्या जोडलेल्या तर्कटनीतींत, कादंबरींतील सर्व पात्रांच्या जीवनावरून निष्पन्न झालेले विचार सूत्र—रूपाने ग्रथित झालेले असतात.

## ७. भटक्याः—

भाऊ वैद्य हा मुळचा कोकणांतील अंजनवेलचा राहाणारा असतो. आईवडील वारल्यावर चिपळूणला काकांकडे तो जातो व तेथेच त्याचें शालेय शिक्षण होतें. विद्यार्थीदशेंत योगसिद्धि शिकण्याच्या इच्छेने भूतानंद नामक बुवांकडे तो पळून जातो; पण बुवांजवळ सिद्धि नसल्याने तो परत येतो. मॅट्रिकमध्ये अनेकदा गोते खाल्यावर तो मुंबईस जातो आणि नेमिनाथ शेठजींकडे नोकरीस राहातो.

त्याने कामांत हुशारी दाखविल्यानंतर नेमिनाथ त्याला स्वतःच्या घरांतच राहाण्यास जागा देतात. तो जेवतोहि त्यांच्याकडेच. त्यांच्या घरीं त्यांचा भाचा चुनिलाल, त्याची पत्नी नानीबहेन, पुतण्या खूपचंद, त्याची बायको कुमुदसुंदरी वगैरे मंडळी असतात. चुनिलाल वयाने जास्त असल्यामुळे त्याची तरुण पत्नी नानीबहेन हिचें मन भाऊ वैद्याकडे जातें. नानीबहेनने खूपचंदाला आकर्षित करूं नये म्हणून तिच्या मनांत भाऊबद्दल प्रेम रुजवण्याचें काम कुमुदसुंदरीहि करते एकदा नानीबहेन भाऊला एकान्त करण्याची सूचना करते पण भाऊ ती झिडकारतो. तेव्हा त्यानेच आपणांवर हात टाकण्याचा यत्न केला, असा कांगावा नानीबहेन करते. तेव्हा भाऊला नेमिनाथांचें घर सोडावें लागतें. मात्र कामांतील हुशारीमुळे त्याला नेमिनाथ नोकरीवरून काढीत नाहीत.

नेमिनाथांचें घर सोडल्यावर भाऊचें काशी सोमणशीं लग्न होतें. काशी सोमणचे वडील रत्नागिरीस अव्वल कारकून असतात. ते आपल्या घराण्याचें सर्व कर्ज फेडतात नि मृत्युमुखीं पडतात. त्यांच्यामागे इस्टेटीची वाटणी मात्र त्यांचे भाऊ बळकावतात. अशा स्थितींत जवळच्या दागिन्यांवर काशीची आई काशीला घेऊन दिवस काढीत असते. काशीच्या या पूर्वेतिहासामुळे तिच्याविषयी सहानुभूति उत्पन्न होऊन भाऊने तिच्याशीं लग्न केलेलें असतें. लग्नानंतर १९१७ मध्ये त्याला मेसापोटेमियांत युद्धकालीन कारकुनाची नोकरी लागते. तो मेसापोटेमियांत गेल्यावर काशीला क्षय होऊन ती कालवश होते. १९२०मध्ये भाऊ हिंदुस्थानांत परत येतो.

परत आल्यावर पुण्याला डॉ. घैसासांकडे हरकाम्या म्हणून त्याला नोकरी मिळते. डॉ. घैसास सूक्ष्मजीवशास्त्र शिकून जर्मनीहून आलेले असतात. पुण्याचे आरोग्य वाढविण्याकडे आपल्या ज्ञानाचा उपयोग व्हावा म्हणून ते यत्न करतात; पण स्थानिक पक्षांच्या संकुचित दृष्टीमुळे तें जमत नाही. तेव्हा ते एका छोट्या संस्थानांत नोकरी धरतात. परंतु तेथूनहि त्यांना कांही काळाने काढून टाकलें जातें आणि मुंबईस ते खाजगी धंदा थाटतात. ते संस्थानांतून परतल्यावर त्यांच्याकडून संस्थानी राजकारणांतल्या अनेक भानगडी भाऊला समजात.

नर्मदाबाई सरवटे नर्स म्हणून डॉ. घैसासांकडे काम करतात. त्यांचें सासर मध्यप्रांतांत सागरला असतें. त्यांचे पति मनोहरपंत व्यापारी—एजंट म्हणून

मध्यप्रांतांत हिंडत असतां जबलपूरला लक्ष्मीबाई अभ्यंकर या शिक्षिकेशीं त्यांची मैत्री जमते. लक्ष्मीबाई त्यांना जेऊंखाऊं घालते नि ते ऐदीपणें तिच्याकडेच राहातात. लक्ष्मीबाईच्या तावडींतून आपल्या नवऱ्याला सोडविण्याचा यत्न नर्मदाबाई करतात पण तें साधत नाही. उलट लक्ष्मीबाईशीं भांडण्यापेक्षा ऐदी नवऱ्याचा निम्मा खर्च तिच्यावर टाकणें लाभाचें आहे, असें पटून नर्मदाबाई लक्ष्मीबाईशीं 'तहनामा' करतात. पुढे सागर सोडून नर्मदाबाई इंदूरला माहेरीं येतात व कोणा स्त्रीसह नर्स म्हणून पुण्यास येतात. तिकडे लक्ष्मीबाई वारतात आणि मनोहरपंत स्वामी बनून 'धर्मप्रसार' करूं लागतात. नर्मदाबाईचें हें सारें वृत्त डॉ. धैसासांकडे भाऊ वैद्य याला समजतें.

डॉ. धैसासांकडे असतांनाच इन्स्पेक्टर खच्चे या पोलिस अधिकाऱ्याचें व विठू घोमण या विलंदर चोराचें कांही वैशिष्ट्यपूर्ण वृत्त भाऊला कळतें.

१९२१ च्या सुमारास भाऊ वैद्य नाशिकला एका वकिलांकडे कारकून असतो. त्या वकिलांनी पुढे असहकाराच्या चळवळींत वकिली सोडल्याने त्याची ती नोकरी जाते व तो बेकार बनतो. तेव्हा, पुण्याला हरिभाऊ नांवाच्या एका इलेक्शन एजंटाशीं ओळख होऊन निवडणुकींत दलाली करणाऱ्या वर्गाची त्याला ओळख पटते. हरिभाऊच्या मध्यस्थीने त्याला वांद्र्याच्या रा. ब. आपटयांकडे नोकरीहि मिळते. रा. ब. आपटे कोणत्या तरी पक्षाच्या वतीनें उमेदवार म्हणून उभे राहाण्याच्या खटपटींत असतात. त्यामुळे त्यांच्या हाताखाली काम करतांना निवडणूकशास्त्रांतले अनेक डावपेच भाऊला शिकतां येतात. रा. ब. आपटे मूळ ब्रह्मावर्ताकडचे असतात व ते आपल्या बापाचे अनौरस पुत्र असतात आपली ही कुळकथा त्यांनी अगदी गुप्त राखलेली असली तरी बाबुराव उपासनी या नाशिककर उपध्यास परंपरागत वह्यांवरून ती समजलेली असते. त्याचा गैरफायदा घेऊन बाबुराव रा. ब. आपटयांकडून खूप पैसा उकळतो. अखेर त्याच्या जाचास कंटाळून आपटे आत्महत्त्या करतात. त्यांचे निवडणुकीचे बेत अर्थातच त्यांच्या आत्महत्त्येने थंड पडतात.

रा. ब. आपटयांच्याकडील नोकरीनंतर भाऊ वैद्य एका छापखान्यांत प्रुफ्करेक्टर म्हणून काम करतो. पुढे तो त्या छापखान्यांत निघाणाऱ्या एका वृत्तपत्राचा संपादक बनतो. वृत्तपत्रावर सरकारी तोहमत आल्यास बळी देण्यासाठीं प्यादें हवें म्हणून देशभक्त 'मुत्सद्यां'नी त्याला

संपादक बनविलेलें असतें. या सुमारास मुळे नामक बेकार कवीस तो आपल्या खोलींत पोटभाडेकरू घेतो व भाडेंवसुलीसाठीं आपल्या पत्रांत त्याला लिहावयास सांगतो. मुळे खऱ्या नांवानें व साहित्यशिखर दादा कावळे या टोपण नांवानेहि लेख लिहितो. पण कावळे या नांवाखालचे साहित्यविषयक लेख लिहिण्याचा कंटाळा येऊन पुढे तो त्या नांवाखालचें लेखन टाकून देतो. तेव्हा, भाऊला त्या नांवानें लिहावें लागून तोच साहित्यशिखर दादा कावळे बनतो.

काशी वारल्यावर बारा वर्षांनी भाऊचें दुसरें लग्न होतें. या वेळीं तो एका रुग्णालयांत आजारी पडला असतां गोदूबाई या विधवा नर्सचें त्याच्यावर मन जातें आणि पुढे बरें वाटल्यावर तो तिचें पाणिग्रहण करतो.

[ भटक्या कादंबरी अपूर्ण आहे. तिचें मुख्य कथासूत्र येथेच संपतें. पुढील कथाभाग तींत फारसा येत नाही. ]

